# जीवनरहस्य.

## ( एक सामाजिक कादंबरी )

लेखक,

**नारायण केशव बेहेरे, बी. एस्. सी.**

**फर्स्ट असिस्टंट मास्तर, हायस्कूल-भंडारा.**

मुद्रक व प्रकाशक,

**अच्युत चिंतामण भट.**

**यशवंत छापखाना, कसबा पेठ, पुणें शहर.**



१९१५

**किंमत १॥ रुपया**



# प्रस्तावना.

प्रस्तुत कादंबरी अगदीं स्वतंत्र आहे. कोणत्याही भाषेंतील कोणत्याही गोष्टीचें हें भाषांतर किंवा रूपांतर नसून महाराष्ट्रसमाजाची स्थिति अवलोकन करीत असतांना मनांत आलेल्या विचारतरंगांचें हें प्रतिबिंब आहे. ज्याप्रमाणें लेखकाचें मन आहे, त्याप्रमाणें हें प्रतिबिंब उठलें असेल. तें स्पष्ट आहे कीं अस्पष्ट आहे, हें पाहणें रसिकांकडे सोंपविलें आहे. या कथानकांतील मतें कोणाला रुचणार नाहींत, तर कोणाला तीं उत्तमही वाटतील; पण हा व्यक्तिमात्राच्या आवडीचा प्रश्न आहे. लेखकाचीं जीं कांहीं मतें असतील, तीं रंगविण्याचें काम त्यानें कुशलतेनें केलें असलें, म्हणजे कोणत्याही मताच्या रसिकाला आनंदच होईल. ही कुशलता प्रस्तुत लेखकाला कितपत साधली आहे, याबद्दल त्याची त्यालाच वानवा आहे. पण समाजस्थितीचें नीट निरीक्षण करून सजीव भासणारी सृष्टि वाचकांच्याभोंवतीं उत्पन्न करण्याचा त्यानें आपल्याकडून शक्य तितका प्रयत्न केला आहे, एवढेंमात्र खरें; पण जेथें त्याची शक्तिच परिमित आहे, तेथें त्याच्या प्रयत्नाला कितपत यश येणार, हें तो जाणून आहे.

कोणत्याही कालांतील देशस्थितीचें यथार्थ चित्र दाखवून देणारा, तो खरा कादंबरीकार ! मग त्यानें ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिल्या असोत, किंवा सामाजिक गोष्टी सांगण्यांत आपल्या लेखणीचा उपयोग केला असो. महाराष्ट्रांतील लेखकांचें या व्याख्येकडे असावें तितकें लक्ष नाहीं, याबद्दल मनाला अतोनात खेद होतो. स्वतंत्र कादंबऱ्या दुर्मिळच आहेत. भाषांतरांनीं व रूपांतरांनीं बहुतेक ललितवाङ्मयाची जागा अडवून टाकली आहे. यावरून, परभाषेंतील उत्तम ग्रंथांचें भाषांतर करणें वाईट, असें मी म्हणतों, असेंमात्र समजूं नये; पण माझ्या म्हणण्याचा एवढाच अर्थ कीं,

कोणत्याही भाषेतील वाङ्मयाची बाह्य जगावर छाप पडण्याकरितां त्या भाषेंत प्रतिभायुक्त स्वतंत्र ग्रंथ—व तेही समाजाच्या इतिहासावर उभारलेले—निर्माण झाले पाहिजेत ! प्रसिद्ध महाराष्ट्रकादंबरीकार रा. हरि नारायण आपटे यांच्याशिवाय इतरांनीं या गोष्टीकडे फारसें लक्ष दिलें नाहीं, हें कबूल करणें माझ्या अगदीं जिवावर येत आहे; पण सत्याला लपविण्यांत कांहींच अर्थ नाहीं.

आमच्या भाषेंत, रा. हरि नारायण आपटे सोडून दिल्यास, इतर कोणींही स्वतंत्र कादंबरी किंवा गोष्ट लिहिली नाहीं, असें मी म्हणत नाहीं; पण खेदाची गोष्ट ही कीं, निर्माण झालेल्या इतर स्वतंत्र गोष्टी प्रतिभेच्या दृष्टीनें बऱ्याच खालच्या दर्जाच्या आहेत. परभाषेंतील **डिकन्स, जॉर्ज इलियट, व्हिक्टर ह्यूगो** यांच्यासारख्या श्रेष्ठ लेखकांच्या ग्रंथांशीं आमच्या इकडील स्वतंत्र कादंबऱ्यांची तुलना करूं लागतांच त्या बऱ्याच खालच्या दर्जाच्या भासतात; व याचें मुख्य कारण म्हणजे आमच्या इकडील लेखकांनीं समाजाच्या खऱ्या स्थितीचें जसें योग्य निरीक्षण करावयास पाहिजे तसें केलेलें नाहीं, हेंच होय !

जगांत घडलेली गोष्ट कादंबरींत जशीच्या तशीच दिली पाहिजे, असें नाहीं. कारण, असें केलें तर प्रत्येक ऐतिहासिक कादंबरी म्हणजे इतिहास व सामाजिक कादंबरी म्हणजे चरित्र अशीच व्याख्या करावी लागेल. पण ऐतिहासिक कादंबरी लिहिणाऱ्यानें एवढी खबरदारी घेतली पाहिजे कीं, त्यानें कितीही काल्पनिक पात्रें आपल्या कादंबरींत घातलीं, तरी त्या मूळ ऐतिहासिक कथानकावर, किंवा ऐतिहासिक व्यक्तींच्या सत्य चरित्रांवर किंवा ऐतिहासिक कालच्या देशस्थितीवर कोणताच विपरीत प्रकाश पाडतां कामा नये. त्याचप्रमाणें सामाजिक कादंबरीकारानें लिहिलेली कादंबरी जरी कल्पनाचित्र असली, तरी ती वाचतांना, तें कल्पनाचित्र आहे

व समाजांत अशा गोष्टी मुळींच घडत नाहींत, अशी वाचकांची समजूत होतां कामा नये. असें झालें तरच लेखकाचें कौशल्य; नाहींपेक्षां स्वतंत्र कथालेखन फोल होय. त्यापेक्षां भाषांतरच शतपटीनें बरें !

ऐतिहासिक कादंबरीकारांना सत्याचा खून उघड उघड करतां येत नाहीं. कारण ऐतिहासिक गोष्टींना बाध लागला, तर समशेर घेतलेले टीकाकार तयार असतातच. पण सामाजिक कादंबऱ्या लिहिणारांची अशी स्थिति नाहीं. त्यांना बरीच सवलत असते. कारण समाजांत प्रत्यक्ष घडत असणाऱ्या गोष्टींशीं विसंगत अशी एखादी गोष्ट जरी त्यांनीं दडपून दिली, तरी खरा प्रकार निराळाच आहे, असें म्हणून त्यांच्या पदरांत चुकीचें भरपूर माप कोणालाच टाकतां येत नाहीं. उदाहरणार्थ, शिवाजीचा अफझुलखानानें वध केला, असें एखाद्या कादंबरीकारानें लिहिलें, तर त्याची जशी वेड्याच्या इस्पितळांत रवानगी करावी लागेल, तसा प्रकार चार पोरें असलेल्या बाईचा एका वृद्धोबाशीं पुनर्विवाह लावणाऱ्या लेखकावर होणार नाहीं. कारण जगांत अशी एखादी गोष्ट घडली असल्याचा संभव आहे, या मुद्यानें तो आपलें संरक्षण करूं पाहील; व त्यानें पुढें केलेली ढाल कितीही निर्जीव असली, तरी उघड्या अंगावर होणाऱ्या वारापेक्षां तिच्यांतून येणारा वार कमी लागेल, हें उघड आहे.

या बचावाच्या साधनामुळें सामाजिक कादंबरींचे लेखक बरेच बेफिकीर झाले आहेत. जगाचें नीट निरीक्षण न करतां वाटतील त्या गोष्टी वाटेल त्या समाजाच्या माथीं दडपून, कथानकाचा परिपोष करण्याची वहिवाट महाराष्ट्रांतील नवीन लेखकांत पडली आहे. याचा परिणाम म्हणजे स्वतंत्र कादंबऱ्या रूपांतर भासतात, व कादंबरी वाचतांना कांहीं तरी असंभाव्य गोष्टी आपण वाचीत आहों, अशी भावना होते. वर्णन केलेल्या गोष्टींत जिवंतपणा मुळींच वाटत नाहीं; व 'असंभाव्य गोष्टींची गुंतागुंत म्हणजेच

सामाजिक कादंबरी ' अशी व्याख्या होऊं पहात आहे. असल्या गोष्टींनीं ललितवाङ्मय वाढतें, असें जर कोणाला वाटत असेल तर तो भ्रम आहे.

दुसरा एक अनिष्ट प्रकार म्हणजे मराठींत लिहिलेल्या गोष्टी व त्या गोष्टींतलीं पात्रें शक्य तितकीं कलकत्त्याचे मनमोहन, फुलवंती हीं असावयाचीं! समाजस्थिति पंजाबची व वर्णव्यवस्था मद्रासची किंवा इतर एखाद्या प्रांताची! अशा स्थितीनें मराठी भाषेचें–मराठी वाङ्मयाचें–राष्ट्रीयत्व काय राहिलें? आमच्या सामाजिक कादंबऱ्या महाराष्ट्रांतील समाजस्थितीचें चित्र रेखाटण्याकारितां लिहिल्या गेल्या पाहिजेत. दुसऱ्या प्रांताची सामाजिक माहिती त्यांच्या वाङ्मयाच्या भाषांतरानें होऊं शकेल. स्वतंत्र कादंबरी लिहिण्याचा यत्न करणाऱ्यानें कलकत्ता पाहिल्याशिवाय किंवा तिकडल्या चालीरीतींची माहिती करून घेतल्याशिवाय तिकडील परिस्थितीचें चित्र रेखाटलें, तर तें सत्य होऊं शकत नाहीं. याशिवाय असले प्रयत्न अस्थानीं ठरण्याचें दुसरें एक सबळ कारण आहे; महाराष्ट्रांतील समाजस्थितीचीं यथार्थ चित्रें दाखविणाऱ्या गोष्टी आमच्या वाङ्मयांत इतक्या थोडया असतांना कलकत्ता व मद्रास या प्रांतांतील सामाजिक परिस्थितीवर कादंबरी लिहिणें म्हणजे घरचे वांसे मोडून दुसऱ्याला जाळायला सर्पण देण्यासारखेंच अस्थानीं आहे. आमच्या महाराष्ट्राचा इतिहास–गत व सद्यःस्थितीचा–लिहून आमचें वाङ्मय आम्हांला वाढविलें पाहिजे.

दुसऱ्या कांहीं गोष्टींत पात्रें महाराष्ट्रीय असलीं तरी त्यांचें महाराष्ट्रीयत्व नांवापुरतेंच असतें. ठरलेला तिमाजीनाईक, एखादा प्रेमानें वेडा झालेला पोर, एखादी चहा घेऊन येणारी पोरगी, आयागोसारखा प्रेमांत बिब्बा घालणारा नीच मनुष्य, हीं ठराविक पात्रें रेखाटणें, म्हणजे आमची सामाजिक कादंबरी! नावें मराठी दिलीं, कीं ती महाराष्ट्राच्या परिस्थितीची दर्शक झाली असें समजावें! या सर्व गोष्टींचें कारण एवढेंच

आहे कीं, समाजस्थितीची नीट माहिती करून न घेतां या कादंबऱ्या व गोष्टी परकीय भाषेतील पुस्तकें वाचून सुचलेल्या कल्पनांवरून लिहिल्या जातात. **जेन-ऑस्टेन**सारख्या कादंबरीकर्त्रीनें लिहिलेली प्रत्येक कादंबरी म्हणजे खरी घडलेली गोष्ट आहे, असा प्रकार मुळींच नाहीं; कारण कादंबरी म्हटली म्हणजे ती काल्पनिकच असावयाची. पण तिची कोणतीही कादंबरी वाचतांना त्या वेळच्या इंग्लंडच्या समाजस्थितीची योग्य कल्पना करतां येते. अशाच कादंबऱ्यांना सामाजिक कादंबऱ्या हें नांव शोभूं शकेल. ज्या कादंबऱ्या किंवा गोष्टी आजपासून शंभर वर्षांनीं वाचल्या तरी देखील त्यांच्या वाचनानें शंभर वर्षांच्या पूर्वींची देशस्थिति वाचकांच्याभोंवतालीं उत्पन्न होते, त्यांनींच राष्ट्राचें वाङ्मय नांवारूपाला येतें. इतर सर्व दहावीस वर्षांच्या अवधींतच काळाच्या उदरांत दडून जाणार हें ठरल्यासारखें असतें.

स्वभावपरिपोष म्हणजे काय, याची तर आमच्या लेखकांना जवळ जवळ कल्पनाच नाहीं म्हटलें तरी चालेल. जगांत आपणांला ज्या भिन्न भिन्न व्यक्ति आढळतात, त्यांचीं कृत्यें त्यांच्या स्वभावाला परिपोषक अशींच असतात. एखाद्या मनुष्याच्या आयुष्यांतील बारीकसारीक गोष्टींचें जर आपण नीट निरीक्षण केलें, तर आपल्याला त्याच्या स्वभावाची पूर्ण ओळख पटते. तीच स्थिति कादंबऱ्या व गोष्टी यांनाही लागू आहे. आपण ज्या ज्या व्यक्तींचीं चित्रें रेखाटतों, त्यांच्या स्वभावाची यथातथ्य कल्पना वाचकांना झाली पाहिजे. इतकेंच नव्हे, तर प्रथमदर्शनीं त्यांच्या हातून जी काय कृति व्हावी म्हणून अपेक्षा असते, तीप्रमाणें खरोखरच स्थिति घडल्यास स्वभावाचा परिपोष उत्तम प्रकारें झाला असें म्हणतां येईल. **जॉर्ज इलियटला** ही कला उत्तम प्रकारें साधली आहे. याशिवाय कोणत्याही बिकट प्रसंगांत सांपडलेल्या मनुष्याच्या मनाची जी कांहीं तारांबळ

उडते, व काय करावें व काय करूं नये असें जें त्याला होतें, तें चित्र—म विकारांच्या तुंबळ युद्धाचें चित्र—रेखाटण्यांत जी कुशलता या ग्रंथकर्त्या दिसून येते ती अवर्णनीय होय ! कारण कितीही चांगला मनुष्य असला तरी त्याचा एखादा तरी ठळक दोष असणारच; व कितीही दुष्ट मनुष्य असला तरी त्याच्या अंत:करणांतील एखाद्या कोपऱ्यांत सद्गुणांचा तुकडा हटकून सांपडावयाचाच, अशी जगांत स्थिति असते. There is nothing unmixed good or evil in this world. ‘ जगांत निर्भेळ चांगलें किंवा वाईट असें कांहींच नसतें,’ व या ( abstract ) अमूर्त गोष्टींचें मूर्त चित्र उत्तम प्रकारानें रंगवील, तोच खरा कादंबरीकार !

जगांत घडणाऱ्या वाईट गोष्टींचें प्रदर्शन समाजाचें यथातथ्य ज्ञान करून देणाऱ्या कादंबऱ्यांतून कितपत करावें, हा बराच वादग्रस्त प्रश्न आहे. पण समाजाची स्थिति सुधारावी ही इच्छा मनांत असली, म्हणजे असल्या कुष्णतेचें आविष्करण करण्यापासून जगाचा फायदा कितपत होईल हें, विचारांतीं समाजाची स्थिति पाहिल्यावर समजण्यासारखें आहे. पण माझ्या अल्प बुद्धीला असें वाटतें कीं, खून व इतर दुष्टपणाच्या गोष्टी रंगभूमीवर प्रेक्षकांच्या दृष्टीसमोर करण्याची बंदी आपल्या आर्य नाट्यशास्त्रांत सांगितली आहे, ती अतिशय विचारपूर्वक केली आहे. कादंबऱ्यांतदेखील चांगल्या गोष्टींचें स्पष्ट आविष्करण असून दोषांचें आनुषंगिक छायारूप चित्र असावें, असें मला वाटतें. यामुळें ब्यांकांच्या धामधुमीची हकीकत देतांना, चांगल्या रीतीनें चालणाऱ्या ‘ एक्स्चेंज इंडियन्स ब्यांके’लाच महत्त्व दिलें आहे. पण तें देतांना १३ सालीं घडलेल्या अनर्थाच्या सांथीकडे कानाडोळा करण्यांत आला, असेंमात्र मुळींच नाहीं.

प्रस्तुत गोष्ट काल्पनिक आहे, हें खरें; पण १९१३ सालच्या उत्तरार्धांतील सुशिक्षित महाराष्ट्राचें चित्र या कादंबरींत रेखाटण्याचा प्रयत्न

ला आहे. महाराष्ट्र म्हणजे मुंबईइलाखा, अशी महाराष्ट्राची ी व्याख्या नसून, ती, महाराष्ट्र म्हणजे मराठी बोलणारा सर्व प्रांत, अशी आहे. प्रस्तुत लेखक बऱ्याच पिढ्यांपासून नागपूर प्रांतांत रहात असल्यामुळें इकडील परिस्थितीचें व इकडील समाजस्थितीचें चित्र या कादंबरींत विशेष रीतीनें दृग्गोचर झालें, तर त्यांत आश्चर्य नाहीं; उलट ती सहजस्थितिच आहे. माझा प्रयत्न विशेष साधला आहे, असें माझें म्हणणें नाहीं; कारण मीदेखील बराच अननुभवी लेखक आहें. परंतु रा. हरि नारायण आपटे यांच्यासारख्या प्रतिभासंपन्न लेखकाचें चित्र डोळ्यांपुढें ठेवून, स्वतां अवलोकन केलेल्या सुशिक्षित महाराष्ट्राच्या १९१३ च्या जुलैपासून डिसेंबरपर्यंतच्या समाजस्थितीचें शब्दचित्र या रूपानें यथामति रेखाटण्याचा प्रयत्न मीं केलेला आहे. तो कितपत साधला आहे हें एक परमेश्वरच जाणे.

ही गोष्ट जरी काल्पनिक असली, तरी असल्या गोष्टी महाराष्ट्रांत डणें हें १९१३ सालच्या परिस्थितींत शक्य होतें, एवढें रसिकांना वाटलें, माझा कार्यभाग झाला असें मी समजतों. प्रस्तुत चित्रांत किती तरी ा असतील हें मी जाणून आहें; कारण मनुष्यनिर्मित कृति नेहमीं दोषच असणार ! माझ्यासारख्या साधारण लेखकाच्या कृतीबद्दल तर लावयासच नको. पण यांतील विचारसरणी जर रसिकांना आवडली तर वकरच दुसरें सामाजिक चित्र रंगविण्याचा विचार आहे. परमेश्वर काय रील तें खरें.

हें पुस्तक प्रसिद्ध करण्याच्या कामीं माझे विद्वान् मित्र श्री. कृष्णाजी अविंद किनरे व श्री. अच्युत चिंतामण भट यांनीं जें मला अमोल साह्य लें, त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें. त्यांच्या प्रेमळ सल्ल्यामुळें मन तृज्ञतेनें भरलें आहे.

सर्वांचा नम्र

नारायण केशव बेहेरे.

# अनुक्रमणिका.

# जीवनरहस्य.

## प्रकरण १ लें.

### वसंत.

वसंताची व माझी ओळख फार दिवसांपासूनची आहे. आम्ही नागपुरास एकाच विद्यालयांत शिकत होतों. एकाच विद्यालयांत, एकाच वर्गांत शिकणाऱ्या व वसतिगृहांत ( Hostel ) एकाच खोलींत राहणाऱ्या दोघां समवयस्क व सुशिक्षित तरुणांची मैत्री किती दृढ व खरी असते, याची कल्पना पुष्कळांना असेलच. त्या वेळीं केलेलीं मनोराज्यें, स्वतंत्रतेच्या वातावरणांत केलेले विहार व कल्पनामय ( Idealistic ) साम्राज्यांत केलेली आयुष्यक्रमाची उभारणी, हीं डोळ्यांपुढें आजदेखील तितक्याच आनंदानें उभीं राहतात. भावी आशा दग्ध झाल्या, कल्पना मनांतल्या मनांतच जिरल्या, पोकळ मनोरे केव्हांच ढांसळले, व जीविताला समोर दिसत असलेलें जुनेंच वळण लागलें, तरींदेखील त्या तरुणपणांतलि कल्पनांमुळें मनावर उमटलेलें प्रतिबिंब आज जसेंच्या तसेंच दिसत आहे! त्या काळाचा अजूनदेखील मी विचार करतों व तो करीत असतांना क्षणभर माझें देहभान नाहींसें होऊन, कल्पनामय आनंदगिरीच्या शिखरावर मी जाऊन बसतों; पण कचेरीची वेळ झाली हें दर्श-

विणारे दहांचे ठोके ऐकूं आले कीं, माझ्या हल्लींच्या खऱ्या जीवितक्रमाची मला आठवण होते, व मी कल्पनासृष्टि सोडून खऱ्या सृष्टींत वावरूं लागतों.

त्या वेळीं सुखदुःखाच्या गोष्टी–भावी संसाराच्या, समाज-सेवेच्या व कर्तव्याच्या गोष्टी–बोलत बसण्यांत आमचे तासचे तास निघून जात व वेळाचें आम्हांला भान राहत नसे. वसंताचा स्वभाव फारच सरळ व अगदीं निष्कपटी होता. खोटें त्याला अगदीं खपत नसे. ‘ एक घाव नि दोन तुकडे ’ हा त्याचा ठोकळ सिद्धान्त, व त्या सिद्धान्ताला अनुसरूनच त्याची वर्तणूक असे. लोकांकरितां आपल्याला आपलीं मतें पुष्कळ वेळा बाजूला ठेवावीं लागतात, व आपल्या कर्तव्याची दिशा आपल्या विचारांविरुद्ध थोडीशी झुकवावी लागते, याची जाणीव त्याला मुळींच नव्हती. तो म्हणे, “ या लोकांशीं मला काय करावयाचें आहे ? मला त्यांच्याजवळ कांहीं मागावें लागत नाहीं, कांहीं नाहीं ? ज्या चार लोकांचें माझ्यावर प्रेम असेल, ज्यांना माझ्याबद्दल कळकळ वाटत असेल, माझ्या जिवाला जीव देण्याची ज्यांची तयारी असेल, अशा लोकांनीं मला कांहींही म्हटलें, तरी मी उलट उत्तर देणार नाहीं; त्यांचें सुख तें माझें सुख, व त्यांचीं मतें ती माझी कर्तव्य-दिशा, असेंच मी समजेन ! पण ज्यांना माझी लवमात्र काळजी नाहीं, इतकेंच नाहीं, तर माझी यःकश्चित् चूक झाली असतांना जे आपल्या बाष्कळ प्रलापांनीं व कुत्सित उद्गारांनीं माझी अब्रू

घेण्यास टपलेले, अशा गांवांतील लोकांची पर्वा बाळगण्याची मला मुळींच जरूरी नाहीं. सारांश, वसंताची सृष्टि म्हणजे तात्त्विक ( Idealistic ) सृष्टि होती. प्रत्येक गोष्टींत त्याला ध्येय अंमलांत यावयास पाहिजे होतें. व्यवहारांत कोणती गोष्ट कितपत साध्य होईल, याची त्याला क्षितीच नव्हती. Ideal love, Ideal friendship....निर्व्याज प्रेम, निर्व्याज मैत्री—प्रत्येक निर्व्याज गुण, हेंच त्याचें ध्येय व हीच त्याची विचारसरणी !

माझा स्वभाव थोडा निराळा असे. चारचौघांशीं मिळून मिसळून वागणें मला अत्यंत आवडत असे. यामुळें विद्यालयांतील बहुतेक विद्यार्थ्यांचें मजवर फार प्रेम असे. माझ्या ' नारायण ' नांवाचें लवकरच माझ्या लोकप्रियतेमुळें ' नानांत ' रूपांतर झालें. अध्यापकांची व विद्यार्थ्यांची,–दोघांचीही मजवर मर्जी असे. संवाद्समिति (Debating club), व्याख्यानमाला (Lecture series), वार्षिक संमेलन ( Gathering ) वगैरे हरएक विद्यालयांतील चळवळींत माझें अंग प्रमुखत्वानें असे. पुष्कळ वेळा परीक्षा जवळ असल्यामुळें मी हीं कामें अंगावर घेण्याचें नाकारीत असें; परंतु विद्यालयांतील माझे मित्र मला जबरीनें चिटणवीस ( secretary ) निवडून देत. यामुळें माझें नांव प्रत्येक विद्यार्थ्याला ठाऊक होतें.

वसंताचें स्वराज्य म्हणजे आमची खोली, त्यांत तो मोकळेपणानें बोलत असे; एरव्हीं त्याच्या तोंडून मोजक्या शब्दांशिवाय

शब्द बाहेर पडत नसत. कोणाशींच मिळून मिसळून वागणें त्याला ठाऊक नव्हतें, यामुळें विद्यालयांतील एक बुद्धिमान् विद्यार्थी या-पलीकडे तो कोणाला ठाऊक नव्हता. त्याला दर परीक्षेत इनाम, शिष्यवृत्ति (scholarship)–कांहींना कांहीं तरी मिळावयाचेंच. प्रत्येक त्रैमासिक (terminal) परीक्षेत तो पहिला यावयाचाच. यामुळें त्याची ओळख प्रत्येकाला असे. त्यालामात्र विद्यालयांतील दहा जणांची पुरती ओळख असेल कीं नाहीं, याची वानवाच आहे.

आमच्या दोघांच्या विचारांत व स्वभावांत इतका फरक होता, तरी आमच्या मैत्रींत त्यामुळें कांहींच बाध आला नाहीं. उलट ती दिवसेंदिवस अधिक अधिकच दृढ होत चालली. पहिल्यांदां मला, त्याच्याशीं माझें कितपत जमेल, याची शंका होती, पण पुढें तिचें हळूहळू निरसन होत चाललें. त्याच्या स्वभावांतील चांगुल-पणा मला कळूं लागला, त्याच्या सत्यप्रियतेची मला ओळख पटली, त्याच्या निर्धाराची मला कल्पना झाली, व त्याची बुद्धि माझ्या प्रत्ययास आली! मला त्याच्याबद्दल दिवसेंदिवस अधिक प्रेम व आदर वाटूं लागला. त्याचेंदेखील माझ्यावर प्रेम जडूं लागलें. त्याला कांहींही कारणें असोत, पण मला वाटतें कीं, मनुष्यप्राणी स्वभावतः संगतिप्रिय असल्यामुळें (Man is a social creature), व त्याला दिवसरात्र माझ्याबरोबर एकाच खोलींत काळ कंठा-वयाचा असल्यामुळें, त्याचें प्रेम मजवर वाढूं लागलें असावें. मनां-तील विचार एखादे वेळीं तरी व्यक्त करण्याकरतां एखाद्याची जरूर

त्याला भासली असावी, व जवळ माझ्याशिवाय दुसरा कोणी नसल्यामुळें मलाच त्यानें आपल्या मित्रत्वाचा मान दिला असावा. कसेंही असो, पण आमची मैत्री अत्यंत दृढ झाली, हें खरें. आमचे स्वभाव जरी भिन्न होते, तरी ते एकमेकांला साधक ( Complementary ) असेच होऊं लागले, व एकाशिवाय दुसऱ्याला मुळींच करमेनासें झालें.

एके दिवशीं आम्ही ॲडिसनचें चरित्र वाचीत होतों; कारण तें आमच्या परीक्षेकरतां नेमलें होतें. त्यांत ॲडिसन व स्टीले यांच्या मैत्रीची हकीकत वाचली. तेव्हां दोघांनाही एकाच वेळीं चमत्कारिक झालें, व आम्ही दोघेही एकमेकांकडे वेड्यांप्रमाणें पाहूं लागलों. कांहीं वेळानें वसंत म्हणाला " नाना, आपलीदेखील मैत्री अशीच नाहीं का? आपले स्वभाव किती भिन्न आहेत? पण मला तुझ्यावांचून क्षणभरदेखील करमत नाहीं. तूं नसतास तर माझें कसें झालें असतें कोण जाणे!" यावर मी हंसून त्याची बरीच चेष्टा केली व म्हटलें—" वसंत! तूं आपला हा तात्त्विक (Ideal) स्वभाव सोडून दे; थोडासा तरी जगांत ये. कांहीं तरी व्यवहारदृष्टि ( Practical ) हो! मी नसतों तर तुझें काय कमी झालें असतें? तुला आणखी कोणी तरी मित्र मिळाला असता. तुझ्यासारख्या बुद्धिमान् व सत्यप्रिय विद्यार्थ्याला वाटेल तितके मित्र मिळतील."

वसंतानें त्या वेळीं माझी स्तुति केली, ती येथें लिहिणें म्हणजे

आत्मप्रौढीच्या दोषास पात्र होणें आहे. त्या दिवशीं आम्ही रात्रभर बोलत बसलों. आम्ही किती तरी मनोराज्यें केलीं! अॅडिसन व स्टीले, यांच्यासारखे आपण पुढें मोठे होऊं का? आपल्या हातून आपल्या देशाचा, समाजाचा व धर्माचा कांहीं तरी उद्धार होईल का? कांहीं तरी देशकार्य आपल्या हातून तडीस जाईल का? देशसेवा बजावतांना आम्हांला मृत्यु येईल, कीं एखाद्या खुशालचेंडूप्रमाणें आनंदांत कालक्रमणा करीत असतांना, आमच्या इच्छेविरुद्ध हें जग सोडून आम्हांला जावें लागेल? आपल्या भाषेची व आपल्या वाङ्मयाची अधोगति होत आहे, आपल्या समाजाची घडी विस्कळीत होत आहे, धर्माच्या नांवाखालीं अनाचार प्रत्यहीं घडत आहेत, व समाजबंधनें व धर्मबंधनें यांचा सारखा उच्छेद चालला आहे; तर या गोष्टींना नीट वळण लावून त्या सुधारण्याच्या पंथास लावण्याचें पुण्यप्रद कार्य आपल्या हातून होईल का? आमच्या बोलण्याचा हाच मूळ मुद्दा होता.

बोलतां बोलतां वसंताच्या डोळ्यांतून अश्रु गळूं लागले. त्याची मुद्रा गंभीर झाली, कंठ दाटून आला. तो माझ्या गळ्यांत पडून म्हणाला, “ नाना! आपल्या भाषेची, आपल्या वाङ्मयाची, व त्या द्वारें आपल्या समाजाची शक्य ती सेवा करण्याची मी खटपट करीन. आज तुझ्यासमोर मी ही प्रतिज्ञा करतों. कारण, निदान या वेळीं तरी तूं मला अत्यंत प्रिय आहेस. जर माझ्या हातून असें घडलें नाहीं, तर मला धिक्कार असो, माझी अधोगति

होवो ! या देशाची अन्य मार्गानें सेवा करणें निदान मला तरी शक्य नाहीं. कारण माझ्यासारखा एकान्तप्रिय मनुष्य राजकीय चळवळीला निरुपयोगी होय. व्याख्यानें देणें, लोकांना त्यांच्या स्थितीची, त्यांच्या ध्येयाची व त्यांच्या कर्तव्याची जाणीव करून देणें, आणि सरकार व लोक या दोघांशीं प्रेमानें व निष्ठेनें वागून त्यांची प्रीति संपादन करून घेणें, या गोष्टी निदान या जन्मांत तरी मला शक्य नाहींत. कारण माझे दोष मला पूर्णपणें कळतात. मी अविचारी आहें, मी तामसी आहें, मी कल्पनासृष्टींत फारच दंग होणारा इसम आहें ! या जगांतील मार्ग सरळ रीतीनें आक्रमणें मला कठिण पडणार आहे."

वसंताच्यानें पुढें बोलवेना. तो स्फुंदून स्फुंदून रडूं लागला. मला फार वाईट वाटलें, व निदान त्या वेळीं तरी, मीदेखील ही बाह्य सृष्टि सोडून कल्पनासृष्टींत फिरूं लागलों. आपल्या कर्तव्याचा व ध्येयाचा प्रश्न माझ्यापुढें उभा राहिला, व आपण काय करावें या विचारांत मी दंग झालों. मी क्षणभर स्वतां कल्पनेच्या पंखावर बसून भ्रमण करूं लागलों. अशा स्थितींत आम्ही किती वेळ तरी एकमेकांच्या गळ्यांत गळे घालून पडलों होतों, तोंच विद्यालयांतील सहांची घंटा वाजली. आज शनिवार होता. साडेसहांपासून वर्ग भरणार होते. या मिळालेल्या सूचनेमुळें आम्ही कल्पनासृष्टींतून खालीं आलों व नित्यक्रमास लागलों.

# प्रकरण २ रें.

## उन्हाळ्याची सुट्टी.

यंदाची उन्हाळ्याची सुट्टी वसंताच्या घरीं घालविण्याचा आमचा विचार झाला. वसंताचें घर जवळच म्हणजे भंडाऱ्याला होतें. नागपुरापासून भंडारा म्हणजे रेल्वेनें एक तासाचा रस्ता. स्टेशनपासून गांव सहा मैल दूर होतें, तरी टांगे पुष्कळ मिळत असल्यामुळें तो दूरपणा जाणवत नसे. इतकें जवळ घर असतांना वसंत उन्हाळ्याखेरीज कोणत्याच सुट्टींत घरीं जात नसे. मला याचें फार नवल वाटे. कारण निदान दिवाळीला तरी प्रत्येकाला आपले घरीं जाण्याची अतोनात इच्छा असते. इतर गोष्टींप्रमाणें वसंत यांतदेखील दुसऱ्यांना अपवाद होता. 'अभ्यास बुडतो' हें त्यांचें ठराविक उत्तर. त्यांत खरेपणा नव्हता, असा भाग नाहीं; पण अभ्यासाची इतकी पर्वा करून आपल्या हिंदूंतील उच्च सण वसतिगृहांतील साधें अन्न खाऊन घालविण्याची इच्छा कोण करणार ? आईच्या हातून न्हाणें-माखणें, लहान भावंडांबरोबर फटाके सोडणें, करंज्यांलाडूंवर अथवा चाकोल्यांकडबोळ्यांवर ताव मारणें, व भाऊबिजेची ओंवाळणी घालण्याच्या बाबतींत बहिणींची थट्टामस्करी करणें, यापरता दुसरा आनंद जगांत कोठें असणार ?

वसंताच्या घरची मला ऐकून माहिती होती, पण मी प्रत्यक्ष त्याच्या घरीं कधींच गेलों नव्हतों. कारण वसंत जर आपल्या घरीं वारंवार जाईल, तर मी एकादे वेळीं त्याच्या घरीं जाणार. वसंता-

च्या अत्याग्रहावरून तसा योग यंदा घडून आला. गेल्या वर्षी वसंत मला फार आग्रह करीत होता, पण मला आमच्या आजीला भेटावयाला जावयाचें असल्यामुळें मला त्याजबरोबर जातां आलें नाहीं. पण यंदा माझ्यामागें दुसरा कोणताच पाश नव्हता. कारण, मी बारा वर्षांचा असतांनाच माझे वडील वारले. ते अमरावतीला वकिली करीत असत. माझा सांभाळ करण्याकरतां माझ्या आजी-शिवाय दुसरें मला कोणीच राहिलें नव्हतें. मी लहान, सरासरी दोनतीन वर्षांचा असतांना माझी आई वारली होती. माझ्या आईची मला मुळींच आठवण नाहीं, परंतु मजजवळ जी तिची हल्लीं तसबीर आहे, तिजवरून ती अत्यंत सुंदर व स्वभावानें उदात्त असावी, असा पाहणाऱ्याला तत्काळ बोध होतो. निदान माझ्या हृदयांत तरी तिची ती प्रेमळ प्रतिमा जशीच्या तशीच कोरलेली आहे. माझ्यावर तिची सारखी नजर असते, व ‘ मुला! तूं असाच सन्मार्गानें वागून चांगलें नांव मिळीव,’ असे तिचे शब्द माझ्या कानांत सारखे गुणगुणत असतात. जरी मला आईची खरी आठवण नाहीं, तथापि माझ्या कल्पनादृष्टीमुळें मला आईचें स्वरूप तंतोतंत कळलें आहे; व माझी आई खरोखर तशी देवता असावी. कारण तिच्या मरणानंतर माझ्या बाबांनीं द्रव्यबळ अनुकूल असूनदेखील लग्न केलें नाहीं. आई वारली तेव्हां ते सारे अठ्ठावीस वर्षांचे होते, पण तिच्या प्रेमाचा त्यांच्या मृदु हृदयावर इतका वर्षाव झाला होता कीं, तो सुकून जाण्याचा कांहींच संभव

नव्हता ! आईच्या प्रेमचिंतनांत थोडेसे दिवस घालवून बाबांनीं स्वर्गलोकची वाट धरली. प्रिय पत्नीला पाहिल्याशिवाय त्यांना चैनच पडेनासें झालें कीं काय, कोण जाणे ! मी पोरका झालों. बाबांनीं आपल्या पैशाची चांगली व्यवस्था केली होती. मग त्यांना स्वतांचा मृत्युकाळ कळला होता कीं काय न कळे ! पंचांमार्फत माझा खर्च चालत होता. अठराव्या वर्षापर्यंत मला पन्नास रुपये महिना त्यांच्यामार्फत मिळत असत व त्यांत माझा खर्च उत्तम प्रकारें चालत होता. बाबांच्यामागें प्रेमाचें असें मला एकच मनुष्य उरलें होतें व ती म्हणजे माझी आजी–बाबांची आई. बाबांच्या मरणामुळें—एकुलत्या एक कर्त्यासवर्त्या व सालस पुत्राच्या मरणामुळें–म्हातारीची कंबरच खचली होती. माझ्याकडे पाहून ती आपल्या जिवाचें कसें तरी समाधान करून घेत असे. गेल्या वर्षी मी विद्यालयांत रहावयास आल्यापासून आजीची प्रकृति खंगत चालली व मागच्या सुट्टींत मी तिला भेटावयास गेलों, तेव्हां तिची अवस्था पाहून माझें अंतःकरण कळवळलें; आणि मला आजपर्यंत तूं असें कां कळविलें नाहींस, म्हणून मी तिजवर रागावलोंदेखील; पण ती म्हणाली, “ बाळ, माझें म्हातारीचें काय? मी आतां जाणारच. माझें वय झालें आहे; ज्याचें झालें नव्हतें–” पुढें तिच्यानें बोलवेना. मी तिच्या मांडीवर डोकें ठेवून निजलों व म्हणालों, “ पण आजी ! मी आहेंना तुला ?” आजीला माझें फार कौतुक वाटलें व तिनें नेहमींप्रमाणें माझी

दृष्ट काढली व " माझ्या बाळाला शंभर वर्षें औक्ष असो ! " असा मला आशीर्वाद दिला.

आजीच्या शेवटच्या इच्छेप्रमाणें मीं पुष्कळ दानधर्म केला. मानवी इलाजांची त्या वेळीं कांहींच किंमत नव्हती. तथापि मीं आपल्याकडून एखाद्या बुडत्या माणसाप्रमाणें गवताच्या काडीचा-देखील आधार घेऊन पाहिला. डॉक्टर, वैद्य, मंत्रतंत्र, दानधर्म, जपजाप्य, सर्व कांहीं मीं करून पाहिलें; पण मरण कोणाला चुकवितां येणार ? थोरापासून लहानापर्यंत सर्वांना त्याचा हुकूम मान्य केलाच पाहिजे. ईश्वरी आज्ञेप्रमाणें माझी आजी मला येथेंच टाकून, स्वर्गलोकीं आपल्या आवडत्या पुत्राला भेटण्याकरतां म्हणून निघून गेली. मजवर आकाशच कोसळलें. आशेचा शेवटचा तंतु तुटला. बाबा मेले त्या दिवशीं मला जितकें दुःख झालें त्याच्यापेक्षां या वेळीं शतपट अधिक झालें. कारण त्या वेळीं मी लहान होतों व माझें समाधान करण्याला, मला रडण्याला, मला आसरा घेण्याला आजी होती ! पण हाय ! या दिवशीं माझें छत्र नाहींसें झालें ! मी कोणाच्या तोंडाकडे पहाणार ? मी खराच पोरका झालों !

माझ्या पालकांनीं (trustees ) माझें शांतवन केलें; पण त्या पोकळ शब्दांपासून कोणता फायदा होणार ? जगांतील ती एक रूढि आहे, एवढेंच काय तें. माझें दुःख मलाच ठाऊक; कारण यापुढें मी ' आपलें ' असें कोणाला समजूं, याचा मला प्रश्नच पडला. लोकांच्या दृष्टीनें माझी स्थिति इतकी कींव करण्याजोगती नव्हती.

कारण पैसा वडिलांनीं बराच ठेवला असल्यामुळें सांपत्तिक दृष्टीनें मी चांगलाच होतों. वडिलांच्या प्रेमळ देखरेखीखालीं व नंतर आजीच्या उपदेशामृतानें माझें मन सुसंस्कृत झालें होतें. आपण बाबांसारखे होऊं, तेव्हां आजीला बरें वाटेल, ही कल्पना अहर्निश मनांत घोळत असल्यामुळें माझा अभ्यास जारीनें चालू होता, व त्याचें फळ म्हणजे मी इतर श्रीमंतांच्या मुलांप्रमाणें खुशालचेंडू-प्रमाणें गांवांतून न हिंडतां, उच्च शिक्षणाकरतां विद्यालयांत शिकत होतों. अशा स्थितींत माझ्याबद्दल अनुकंपा कोणाला वाटणार ?

वसंताला जेव्हां ही गोष्ट कळली, तेव्हां त्याच्या मनाला माझ्यासाठीं फारच वाईट वाटलें व त्याचें हृदय ज्यांत पूर्णपणें ओतलें होतें, असें त्याचें एक पत्रही मला आलें. त्यानें लिहिलें कीं, "तुजवर जी दुःखपरंपरा कोसळली, तिनें माझें हृदय दुभंग झालें. ईश्वरानें तुझी परीक्षा पाहण्याचें मनांत योजिलें आहे, असें दिसतें. पण या प्रत्येक विधिघटनेंत फार खोल व गूढ रहस्य भरलें असतें. तें आपल्याला प्रथम कळत नाहीं व त्यामुळें आपलें मन भांबावतें. पुढें तें आपल्याला यदृच्छेनेंच कळतें व मग विधिघटनेचा प्रताप कळून येतो ! ईश्वरी नेमानेमांतील रहस्य जाणून घेण्याचा प्रयत्न करणें हेंच आपलें कर्तव्य, व तें साध्य झालें कीं, आपली इति-कर्तव्यता संपली. या विधिघटनेंतूनच—या दुःखद गोष्टींतूनच तुझ्या कर्तृत्वाचा भव्य मनोरा उठावयाचा असेल,—कोणाला ठाऊक ? आपण दुःख विसरण्याचा आणि भावी कालावर नजर फेंकण्याचा प्रयत्न केला पाहिजे."

वसंताचें पत्र वाचून माझें समाधान झालें. व मी आपलें दुःख आवरून सुटी सरतां क्षणींच विद्यालयांत येऊन दाखलही झालों. काळाच्या ओघांत, भावी आयुष्यक्रमाचें चित्र रेखाटण्यांत, तरुणपणच्या महत्त्वाकांक्षेच्या भरारींत, व वसंताच्या प्रेमळ, शांतवनपर शब्दांतील जादूंत, त्या दुःखद गोष्टी हळू हळू विरघळूं लागल्या ! एक वर्षभर मला त्यांचें दुःख फार जाचलें नाहीं. पण आज सुट्टी सुरू होतांच आपल्याला आतां घरदार कांहींच उरलें नाहीं, याची पुरती जाणीव मनाला झाली, व सर्व स्मृतिचित्रें एकामागून एक क्रमानें डोळ्यांपुढें खेळूं लागलीं. नेत्रांतून अश्रुपात सुरू झाला. वसंताला माझ्या स्थितीची कल्पना होतीच. आज असा प्रसंग घडून येणार, याचें त्याला स्वप्नच पडलें होतें. त्यानें हळूच आपला हात माझ्या गळ्यांत टाकला व प्रेमानें मला महाराज बागेकडे तो घेऊन गेला. तेथें त्या देखाव्यानें, त्याच्या मुग्ध सहानुभूतीनें व प्रेमळ दृष्टीनें माझें समाधान झालें. तो म्हणाला, " नाना ! तुला प्रेमाचें कोणीच मनुष्य नाहीं असें म्हणत होतास; तर माझ्या प्रेमाला तूं किंमतच का देत नाहींस ? " यावर मी अश्रु गाळून म्हणालों, " वसंत ! तुझ्यामुळें माझी धडगत आहे. नाहींपेक्षां हें जग सोडून जावें अशीच मला इच्छा झाली असती ! "

' तुला वेड लागलें आहे, झालें. तुझ्यासारख्या श्रीमंत, बुद्धिमान् व सुस्वभावी तरुणावर प्रेम न करण्याइतका वेडा या जगांत कोण आहे ? आज तुला कोणी नाहीं, असेल कदाचित खरें ! पण

दहा वर्षांच्या आंत अशी स्थिति तुला प्राप्त होईल कीं, प्रेमळ पत्नी व सुंदर मुलें यांच्या सहवासांत काळ किती भरकन निघून जातो, हें तुला समजणारदेखील नाहीं! माझें बोलणें नीट ध्यानांत धर. आजपासून दहावर्षांनीं, बरें का?'

वसंताच्या बोलण्याचें मला हंसूं आलें. माझें दुःख आतां ओसरलें. आमची बांधाबांध सुरू झाली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं मेलगाडीनें आम्हांला भंडाऱ्यास जावयाचें होतें. ही सर्व सुट्टी मी भंडाऱ्यालाच घालविणार होतों; नाहींपेक्षां मी जाणार तरी कोठें? माझ्या पालकांपैकीं नरसोपंत वकिलांचें मला पत्र आलें होतें, व 'सुट्टीमध्यें आमच्या घरीं ये' असें त्यांनीं मला लिहिलेंही होतें. पण त्यापेक्षां वसंताच्या घरीं जाणें मला अधिक पसंत पडलें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून आम्हीं आमच्या खोलीचा खिन्न अंतःकरणानें निरोप घेतला. तिला आम्ही तीन महिने अंतरणार होतों. माझ्या मनांत नवीन विचार खेळूं लागले. वसंताच्या घरच्या मंडळीला माझा स्वभाव आवडेल किंवा नाहीं, हा प्रश्न माझ्यापुढें येऊन पडला. जर तेथें माझ्या राहण्यापासून त्यांना अडचण होतांना दिसली, तर ज्यास्ती दिवस तेथें न राहतां आपण कलकत्याकडे फिरावयास जाऊं, असें मीं ठरविलें. वसंताच्या घरची मंडळी त्याच्याप्रमाणें सुस्वभावी व सरळ असतील तर बरें होईल. त्यांचे स्वभाव जर चमत्कारिक असले, तर आपल्याला तेथें एक

दिवसदेखील चैन पडणार नाहीं. अशा विचारांत दंग असतांना आम्ही गाडींत बसलों.

आमच्या डब्यांत आम्ही सहा जण होतों. त्यांपैकीं एक गृहस्थ मुंबईकडचा दिसत होता. त्याचा पोशाख बऱ्याच सुधारकी थाटाचा असून त्यांत टापटीप विशेष होती. प्रथम आमचें त्याच्याकडे व त्याचें आमच्याकडे लक्ष लागलें. कुशल प्रश्न सुरू झाले. तो गृहस्थ दक्षिणीच होता. त्याच्या बोलण्यांत त्याची कर्तबगारी झळकत होती. आमचा त्याच्याबद्दल तत्काळ चांगला ग्रह झाला. त्यानें आम्हांला किती तरी चांगल्या गोष्टी सांगितल्या. आजकाल व्यापाराचीं सूत्रें परकीयांच्या हातीं गेल्यामुळें आपला देश गरीब होत चालला आहे, ही गोष्ट त्यानें आमच्यापुढें मांडली; व आपल्या देशाची उन्नति व्हावी एवढ्याकरतां आपण नोकरी न करतां व्यापाराची दिशा उचलल्याचें त्यानें कळविलें. त्याच्यापासून आम्हांला बरीच माहिती झाली. त्यानें व त्याच्या स्नेह्यांनीं मिळून आपल्या लोकांची एक सहकारी पेढी मुंबईला स्थापन केल्याचें कळलें, व त्या पेढीची कलकत्त्याला शाखा सुरू करण्याकरतां तो तिकडे चालला होता. आम्हांला हें ऐकून अर्थात्च आनंद झाला. सर्वतऱ्हेची चळवळ देशांत सुरू झालेली पाहून कोणाला आनंद वाटणार नाहीं? आम्हीं त्याचें व त्याच्या पेढीचें अभीष्ट चिंतिलें. त्यानेंही आमचीं नांवें, उद्योग, राहणें वगैरेंविषयीं माहिती करून घेतली, व भंडाऱ्याच्या लोकांना, त्याच्या पेढी

विषयीं माहिती करून देण्यास त्यानें आम्हांला सांगितलें, व आम्हींहीं तें मोठ्या आनंदानें कबूल केलें. कारण, देशाच्या उपयोगीं जिकडून पडतां येईल, तिकडून पडणें हें प्रत्येकाचें आद्य कर्तव्यच होय.

भंडाऱ्याचें स्टेशन लवकरच आलें. आम्हीं त्याचा निरोप घेतला. त्यानें आमचीं नांवें व पत्ते, हीं आपल्या रोजनिशींत टिपून घेतलीं. आम्हींदेखील त्याचा पत्ता विचारला, तेव्हां त्यानें आपल्या नांवाचें कार्ड काढून आमच्या हातीं दिलें. कार्डावर खालील अक्षरें लिहिलीं होतीं.


*A. G. Raykar, Esq.*
*Managing Director,*
Indian's bank.
Bombay.

म्यानेजिंग डायरेक्टर,
‘ हिंदूची पेढी. ’
मुंबई.

# प्रकरण ३ रें.

## वसंताच्या घरची मंडळी.

वसंताचे वडील गोविंदराव हे तेथील कचेरींत मुख्य शिरस्तेदार होते. इंग्रजीच्या पहिल्या अमदानींत त्यांचें थोडेंसें शिक्षण झालें होतें, व त्या वेळीं त्यांनीं कारकुनाची नौकरी पत्करली आणि हल्लीं वाढत वाढत ते शिरस्तेदारीच्या पायरीवर चढले होते. जुन्या व नव्याचें विचित्र मिश्रण त्यांचे ठिकाणीं दिसून येई. ब-याच जुन्या गोष्टी त्यांना विचारानें आवडत नसत, पण संस्कारांनीं त्या प्रिय वाटत! चांगल्या धर्मबंधनांचा त्यांच्यावर पगडा नव्हता, पण कांहीं जुन्या चालीरीतींना ते सहज वश होत असत. त्यांचा स्वभाव एक दोन दिवसांत मला सहज कळून आला. स्त्री-शिक्षणाचें महत्त्व त्यांना कळून आलें होतें व त्यामुळें त्यांनीं यमूला शाळेंत घातलें होतें, पण हल्लीं यमू बारा वर्षांची असल्यामुळें तिच्या लग्नाची खटपट करण्यांत–तिला अनुरूप वर पाहून गृहिणी करण्यांत--ते दंग झाले होते. त्यांच्या मनानें यमूला इतके दिवस अविवाहित ठेवण्यांत त्यांनीं मोठेंच धैर्य दाखविलें होतें!

यमूचें लग्न इतक्यांत व्हावें असें वसंताला वाटत नव्हतें; पण वडिलांच्यापुढें कांहीं बोलण्याची त्याची ताकद नव्हती. गोविंदरावांचा वचक सर्वांनाच जाणवत होता. वसंताची आईदेखील–तिला आम्ही काकू म्हणत असूं–गोविंदरावांशीं बरोबरीच्या नात्यानें,–

वयानें व अधिकारानें ती त्यांच्या बरोबरीची असतां,—बोलत नसे. तिचा स्वभाव किती तरी प्रेमळ असे. मला पाहतांच तिला आनंद झाला. मी तिला गेल्याबरोबर वसंताच्या मागून नमस्कार केला, व मग एकीकडे उभा राहिलों; कारण ओळख नसल्यामुळें मला संकोचल्या-सारखें झालें होतें. तेव्हां ती म्हणाली, "नाना, इतका कां लाज-तोस? मला जसा वसंत, तसाच तूं. ये, माझ्यापाशीं बोलत बस-ण्याला इतका संकोच बाळगायला नको कांहीं!" वसंतानें तिला माझी सर्व माहिती सांगितली. तिला माझ्याबद्दल फारच वाईट वाटलें. ती म्हणाली, "नाना, इतक्या लहान वयांत तुझ्यावर असे प्रसंग कोसळले असतील, असें कोणाला वाटावयाचेंदेखील नाहीं. पण ईश्वर ठेवील तसें राहिलें पाहिजे. तूं इथे अगदींदेखील परकेपणा मानूं नकोस." त्या दिवसापासून काकूंनीं मला परकेपणा न भासूं देण्याचा निश्चय केला, व त्यांच्या त्या प्रेमळ यत्नाला यशही आलें; कारण मी घरच्याप्रमाणें तेथें राहूं लागलों.

गोविंदरावांना माझी हकीकत कळली तेव्हां अत्यानंद झाला. त्यांनीं वसंताला माझ्या लग्नासंबंधीं विचारलें. तेव्हां सध्यां लग्न न करण्याचा माझा विचार असल्याचें वसंतानें त्यांना सांगितलें; पण त्यांचें समाधान झालें नाहीं. ते म्हणाले, "लहानपणीं प्रत्येक जण 'मी लग्न करणार नाहीं' असें म्हणत असतो, पण तें म्हणणें खरोखर प्रत्ययास आणून देणारे श्रीसमर्थ रामदासस्वामींसारखे विरळाच!" वसंतानें पुढें कांहींच उत्तर दिलें नाहीं. कारण

त्यांच्यापुढें बोलण्यास तो भीत असे. पण संध्याकाळीं मला त्यानें हंसत हंसत सर्व हकीकत सांगितली, व मग तो म्हणाला, "तुला आवडते का आमची यमू? फार हुषार नाहीं–तिला इंग्रजी कुठे येत आहे? ती तुला पटणार नाहीं; कारण तुला तर बी. ए. झालेली, नवीन पद्धतीची, साहेबी थाटाची बायको पाहिजे; मग वकीलसाहेब व वकील मडम थाटानें फिरावयास जाणार व आमच्या वेडगळ लोकांना हंसणार! आम्ही बायकांना घेऊन फिरावयाला जात नाहीं, म्हणून तुमच्यासारखे कर्ते म्हणविणारे सुधारक आम्हांला हंसतील. परंतु आमच्या घरचा स्वयंपाक व इतर गृहकृत्यें कोण करणार, याचा कोण विचार करतो? प्रश्नच केला तर उत्तर तयार कीं, 'आचारी, चाकरमाणसें घरीं ठेवावीं,' जणुं काय सारे कुबेरच आहेत! या लोकांनीं आपल्यावरून जगाची कल्पना करावयाची. तुमचे जे प्रसिद्ध सुधारकाग्रणी म्हणून नांवाजलेले आहेत ते, मी खात्रीनें सांगतों कीं, गरीब असते तर त्यांच्यानें असें करवलें नसतें. ज्या सुधारणांची तुम्ही स्तुति करतां त्या सुधारणाच नव्हत. त्यांना मी श्रीमंतांचे चोजले म्हणेन. गरीबाच्या झोंपडीपासून श्रीमंताच्या वाड्यापर्यंत ज्या गोष्टी सर्व समाजांत प्रचारांत येणें शक्य आहे, त्याच खऱ्या सुधारणा!"

वसंताचें व्याख्यान मी इतका वेळ स्वस्थपणें ऐकून घेत होतों. पण आतां माझ्याच्यानें राहवेना. मी त्याला म्हटलें, "तुला

आपल्या बहिणीची तरफदारी करण्यांत आम्हां सुधारकांवर इतकें तुटून पडावयास नको होतें. मी कांहीं तुझ्यासारखा कल्पनेच्या-मागें धांवणारा मनुष्य नाहीं !''

" ओहो ! तर मग आपण यमूला पत्करणार वाटतें. तरीच, बाबा म्हणत होते कीं, रस्त्यानें हिंडणारे भगव्या वस्त्राचे, सर्वच कांहीं रामदास नसतात. त्यांपैकीं बहुतेक भोंदूच असतात. आपली स्वारी एकूण सुधारकाचें चर्म पांघरून त्यांच्या कळपांत गेली होती तर !''

" वसंत ! प्रत्येक गोष्ट तूं चेष्टेवर नेतोस. तुझ्या या स्वभा-वाला कांहीं औषधच नाहीं का ?''

" नाहीं बोवा चेष्टेवर नेत. आतां झालें ना ? आमचे नाना-साहेब खरोखरच यमूशीं विवाह करण्याला एका पायावर तयार आहेत ! ''

याप्रमाणें आमचें बोलणें झालें. यमू खरोखरच फार सुंदर होती. राजारविवर्म्याच्या चित्रांप्रमाणें, किंवा एखाद्या नाटकांतील किंवा कादंबरींतील नायिकेप्रमाणें हरिणीसारखे डोळे, चांफेकळीसारखें नाक, पोंवळ्यासारखे ओंठ, व कुंदकळ्यांप्रमाणें दांत जरी तिला नव्हते, तरी तिची मुद्रा फार मोहक दिसत असे. व पहाणाऱ्याला तिच्या-विषयीं तत्काळ प्रेम वाटत असे. तिचा स्वभाव, तिचें हांसणें, व तिचें बोलणें मधुर व प्रेमळ असे. मलादेखील तिच्याशीं बोलावेंसें वाटत असे. पण आमची ओळख नवीन असल्यामुळें व आमच्या हिंदु कुटुंबांतील स्त्रिया, पाश्चात्य स्त्रियांप्रमाणें मर्यादा सोडून कोण-

त्याही पुरुषाबरोबर मोकळेपणानें हंसाखिदळायला तयार नसल्या-मुळें तिच्यामाझ्या बोलण्याचा योगच आला नाहीं. तरी दुरूनच तिच्या हुशारीची माहिती मला होऊं लागली. घरांतील काम-काजांत तिची तत्परता, नीटनेटकेपणा व कुशलता प्रतिक्षणीं माझ्या अनुभवास येत असे. काकूंचा ती अगदीं उजवा हात होती. तिच्यामुळें काकूंना घरांतील कामकाजाचा बोजा वाटत नसे. एकदां काकू अस्पृश्य झाल्यामुळें यमूलाच स्वयंपाक करून वाढण्याचा प्रसंग आला, व तिची, आजकालच्या तरुण सुधारक पोराप्रमाणें प्रश्न विचारून परीक्षा न करतां, मला आपोआपच परीक्षा झाली. काकूंचें वळणच इतकें चांगलें होतें. संसाराला नित्य अवश्यक असणाऱ्या प्रत्येक गोष्टीचें ज्ञान मुलींना अवश्य झालें पाहिजे, असें त्यांना वाटे; व त्याप्रमाणें यमूला त्या शिक्षणही देत असत. रात्रीं रोज यमू काकूंना, पांडवप्रताप, दासबोध किंवा दुसरी एखादी पोथी वाचून दाखवीत असे.

घरांत हळुहळू माझ्याबद्दल कुजबूज सुरू झाली. पर्यायानें गोविंदरावांकडून ती गोष्ट काकूंना कळली, व त्यांचेंदेखील अनु-कूल मत पडलें. यमूच्या कानांवर ही गोष्ट आल्यापासून ती मला फारच लाजूं लागली. इतके दिवस ती माझ्यासमोर वसंताशीं बोलण्याकरतां किंवा त्याला कांहीं विचारण्याकारितां येत असे; पण आतां मी असलों तर ती वसंताशींदेखील बोलेना. कुमारिकांच्या या स्वाभाविक विनयाला कोणी रानटीपणा म्हणत असतील तर

खुशाल म्हणोत, पण मला वाटतें कीं, त्यांची मर्यादा म्हणजे स्त्री-जातीला शोभणाऱ्या कोमलतेचा गाभा आहे.

अभ्यासाच्या दृष्टीनें यमूची परीक्षा घेण्याचा योग असाच अनायासें जुळून आला. भंडारा येथें रा. माधवराव नांवाचे एक वकील रहात होते. त्यांचा स्वभाव फार सालस व उदार असे. तोंडानें वायफळ बडबड करण्यापेक्षां कृतीनें कोणतेंही काम करून दाखविणें त्यांना पसंत असे. ते स्त्रीशिक्षणाचे कट्टे कैवारी होते. पण त्यांचा कैवार शाब्दिक वाद करण्यापुरताच केवळ नव्हता. त्यांनीं आपल्या विचारांना मूर्त स्वरूप दिलें होतें. त्यांच्या प्रयत्नानें भंडाऱ्यासारख्या मागसलेल्या गांवांत स्त्री-शिक्षणाकरतां एक शाळा स्थापन झाली होती. या शाळेंत स्त्रीशिक्षणाची फारच उत्तम सोय होती. शाळेंतील इतर महत्त्वाच्या विषयांखेरीज, स्वयंपाक, शिवणकाम व विणकाम या शाळेंत शिकवण्यांत येत असे. या शाळेंतील अभ्यासक्रम सरकारी अभ्यासक्रमाची पोपटपंची नकल नसून तो नीट विचारानें व पोक्तपणानें ठरविला होता. मुलींना इंग्रजी व संस्कृत भाषांचेंही कामापुरतें ज्ञान करून देण्याची तजवीज शाळेंत केली होती. शाळेला जोडून एक स्त्रियांचें स्वतंत्र वाचनालय काढलें होतें. त्याचा फायदा शाळेंतील मुलींना करून घेतां येत असे. त्यामुळें मुलींना वाचनाची गोडी लागून त्यांचें मन अधिक प्रगल्भ होई व जगाविषयीं अंधारांत चांचपडण्याचा प्रसंग त्यांचेवर येत नसे. या शाळेच्या इमारतींत दर शनिवारी

स्त्रियांची सभा भरत असे. " **जें जें आपणांस ठावें । तें तें इतरांस शिकवावें । शहाणे करून सोडावें । सकल जनां ॥** " हा या सभेचा मूळ उद्देश होता; व त्याप्रमाणें विणकाम, चित्रकला, तूणकाम, फोटोग्राफी वगैरे विषय तेथें शिकवण्यांत येत असत. शिकविण्यास लागणारीं उपकरणें व कच्चें सामान शाळेच्या खर्चानें पुरविलें जात असे. आणि जो माल तेथें तयार होई तो बाजारांत विकून, मूळ खर्च जाऊन उरलेला नफा गरीब लोकांना धर्मादाय करण्यांत खर्च होत असे. यामुळें स्वार्थाबरोबर परमार्थ साधण्याची उत्तम सोय या संस्थेस झाली होती. माधवराव हे या संस्थेचे अव्वलपासून प्रवर्तक असून त्यांच्या श्रमामुळेंच ही संस्था आज या उत्तम स्थितीला आली होती. ते संस्थेकरितां जिवापाड श्रम करीत असत व ईश्वरानें त्यांच्या प्रयत्नांना यशही दिलें होतें.

वसंताची माधवरावांशीं पुष्कळ ओळख होती. वसंतानें मला या संस्थेबद्दल पुष्कळ माहिती मागें दिली होती. ही नमुनेदार संस्था आपण पाहावी, अशी मला इच्छा झाली व मी लागलीच वसंताला घेऊन माधवरावांच्या घरीं गेलों. वसंतानें माझी व माधवरावांची इंग्रजी पद्धतीनें ओळख करून दिली व माझा उद्देश त्यांना कळविला; तेव्हां ते आनंदानें म्हणाले, "वा! चला तर, आमची संस्था दाखविण्याला आम्ही नेहमींच तयार असतों. पण तुमची बहुतेक निराशाच होईल; कारण नागपूर किंवा उमरावती यांच्या मानानें आमचें गांव फारच मागसलेलें आहे व त्या मानानें आमची संस्था-

देखील तितपतच आहे. पण तुम्हांला इतकी उत्सुकता आहे तर चला. कोणालाही ती संस्था दाखविण्यास मला आनंदच वाटतो; कारण मूल कितीही वाईट असलें तरी तें आईला प्रियच असतें!'

आम्ही सर्व जण शाळेंत गेलों. एकंदर संस्था पाहून मला अत्यानंद झाला. शाळा लहानशीच असून टुमदार होती. मुलींना खेळावयास मागें चांगला बगीचा लावला होता. नवीन पद्धतीनें शिकविण्यासाठीं लागणारी सर्व सामुग्री तेथें दिसत होती. प्रत्यक्ष ज्ञान करून कोणताही विषय शिकवितां आला पाहिजे, यावर माधवरावांचा फार कटाक्ष होता. वाचनालयांतील पुस्तकें व मासिकें स्त्रियांना रुचकर व बोधप्रद होतील अशींच होतीं. या लहानशा गांवांतील ही नमुनेदार संस्था पाहून मला संस्थेचें कौतुक वाटलें व चालकांबद्दल माझ्या मनांत आदर उत्पन्न झाला. मी प्रत्येक वर्गांतून हिंडून पाहिलें! बरोबर वसंत व माधवराव होतेच. एका वर्गांत रंगांची माहिती मुलींना करून देण्यांत येत होती. प्रत्येक मुलीच्या हातांत एकेक रंगाची लहान पताका होती व त्या पताका एका जागीं करून निरनिराळे रंग कसे उत्पन्न होतात, याचें प्रत्यक्ष ज्ञान मुलींना करून देण्यांत येत होतें. त्याचप्रमाणें टेबलावर निरनिराळ्या रंगांच्या कांचा असून, त्यांच्या मिश्रणानें नवीन रंग तयार कसे होतात हें पाहण्याची मुलींना मोकळीक होती. यामुळें त्यांना एक प्रकारची मौज वाटून आपोआप मेंदूला श्रम न पडतांना, नवीन शास्त्रीय ज्ञान होत होतें. शुभ्र रंग सात रंगांच्या मिश्रणानें कसा तयार

होतो, हें दाखविणारी न्यूटन साहेबांची सप्तरंगी तबकडीही तेथें ठेवली होती.

तेथून मी दुसऱ्या एका वर्गांत गेलों. मुलींना व्याकरण शिकविण्यांत येत होतें. व्याकरणासारखा रुक्ष विषय कसा काय मनोरंजक करून शिकवितां येईल, याबद्दल मला कोडेंच होतें. पण तें आतां एकाएकीं सुटलें. मुलींच्या गळ्यांत सुंदर जरीचें काम केलेले पट्टे घातले होते. व त्यांवर ' शब्द, नाम, सर्वनाम, विशेषण '....अशीं अक्षरें लिहिलीं होतीं. याप्रमाणें मुलींनीं मिळून आपापलीं कामें वांटून घेतल्यावर त्यांच्या संभाषणाला सुरवात झाली. त्यांच्यापैकीं जी ' **शब्द** ' झाली होती ती म्हणाली, " मी भाषेंतील राणी आहें. माझ्याशिवाय कोणताच अर्थबोध होणार नाहीं. कोणाला कांहीं जर सांगावयाचें असेल, तर त्याला तें माझ्याच द्वारें सांगितलें पाहिजे. हे सर्व, ' **नाम, सर्वनाम** .... ' माझे प्रधान आहेत. माझ्या हुकुमांत हे सर्व असतात. या प्रत्येकाचे अधिकार वेगवेगळाले आहेत." नंतर ती इतर मुलींकडे वळून म्हणाली, " तुम्हीं आपापले अधिकार सांगा पाहू "

त्यानंतर ' **नाम** ' झालेली मुलगी म्हणाली " नमस्कार बाईसाहेब ! माझें काम म्हणजे मुख्य गोष्टीची, मुख्य विषयाची किंवा पदार्थाची, त्याचें नांव सांगून ओळख करून द्यावयाचें. माझ्याशिवाय अर्थबोध होणें शक्य नाहीं. " **सर्वनाम** झालेली मुलगी पुढें होऊन म्हणाली, " नमस्कार बाईसाहेब ! या नामाला

मी मदत करीत असत्यें. याला एकाच वाक्यांत फार वेळ जाण्याचें काम पडल्यास मी याच्या मदतीस धावून जात्यें, व मीं स्वतां हजर राहून याची उणीव कोणाला भासूं देत नाहीं !"

नंतर 'विशेषण' झालेली मुलगी म्हणाली, "नमस्कार बाई-साहेब ! या नामाला बरी वाईट किंमत माझ्यामुळें येते. माझ्या-वरच याचा चांगुलपणा किंवा वाईटपणा अवलंबून आहे. मी याला चांगली मदत करीन तर याची किंमत अमोल होईल; नाहींपेक्षां, मी जर बदलल्यें तर त्याचा उलट पक्षीं सर्व तिरस्कार करतील."

याप्रमाणें बाकीच्या मुलींनींही आपापलीं कामें सांगितलीं. तीं सर्व मला पुरतेपणीं आठवत नाहींत. मला अत्यंत आश्चर्य वाटलें व या नवीन सुरू केलेल्या पद्धतीची धन्यता वाटली. मी असाच फिरत फिरत पांचव्या वर्गांत गेलों. यमू तेथेंच होती. त्या वेळीं इंग्रजीचा तास होता. प्रत्यक्ष वस्तु दाखवून संभाषणाच्या द्वारें मुलींना या परकीय भाषेचें ज्ञान दिलें जात होतें. यमूचीं उत्तरें ऐकून तिची बुद्धि माझ्या तेव्हांच लक्षांत आली. माझें तिजकडे बरेंच लक्ष लागलें हें कदाचित् माधवरावांच्या लक्षांत आलें असावें; कारण ते मला एकदम म्हणाले, "आमच्या शाळेंतील ही सर्वांत हुषार मुलगी. ही आपल्या भावासारखीच हुषार आहे. गेल्या अप्पर प्रायमरी परीक्षेंत तिला पहिल्या नंबरचें बक्षीस मिळालें." वसंतानें मजकडे पाहिलें. मला थोडेंसें हांसूं आलें,

हें पाहून तोंदेखील हांसावयास लागला. मीं शाळेस पंचवीस रुपये वर्गणी दिली व मोठा झाल्यावर या संस्थेला शक्य तितकी अधिक मदत करण्याचा व जमल्यास उमरावतीला अशीच संस्था काढण्याचा मनांत निश्चय केला. कारण बी. ए. एल. एल बी. झाल्यावर उमरावतीलाच वाकिली करण्याचा माझा बेत होता. माझ्या परमपूज्य पित्यांच्या पावलांवर पावलें टाकून या जगांतील आयुष्क्रम कंठण्याची माझी महत्त्वाकांक्षा होती.

असो. माधवरावांचा प्रेमभरानें निरोप घेऊन व त्यांचे आभार मानून आम्ही घरीं आलों.

---

## प्रकरण ४ थें.

The lake d'strict.

**( सरःप्रांत. )**

मध्यप्रदेशांत सृष्टिसौंदर्याच्या दृष्टीनें या भंडारा जिल्ह्याइतका सुंदर दुसरा जिल्हा क्वचित्च सांपडेल. हिमालयाचीं हिमाच्छादित रुपेरी शिखरें जरी येथें नसलीं, तरी **विंध्य व सातपुड्याच्या** लहान लहान पर्वतश्रेणी जागोजागीं दृष्टोत्पत्तीस येतात. गंगा, सिंधु, ब्रह्मपुत्रा वगैरेंसारख्या मोठाल्या नद्या जरी या प्रदेशांतून वाहत नसल्या, तरी हा प्रांत कोणालाच रुक्ष वाटणार नाहीं. वैनगंगा नदी या प्रदेशांतून वाहत असते. या नदीचें पात्र सरासरी अर्धा मैल रुंद आहे व वर्षाकालांत तर या नदीला फारच

घोर स्वरूप प्राप्त होतें; त्या वेळीं जर ही नदी कोणीं पाहिली, तर, वैनगंगा—वहिनगंगा—बहिणगंगा—हें नांव अगदीं सार्थ आहे, असें त्याला आढळून येईल. कारण काशी येथें गंगा ज्या स्वरूपांत दिसते, त्या स्वरूपांतच ही नदीदेखील आपल्या गंभीर व भयानक दृश्यानें मनाला मोह पाडीत असते. उन्हाळ्यांतदेखील या नदींत पाणी बरेंच असतें व जलक्रीडाप्रिय लोकांना, शरीराचा दाह शमविण्याकरतां या नदीला कडकडावून भेटण्याची इच्छा होते. यामुळें उन्हाळ्यांत, विशेषतः तरुण लोकांच्या टोळ्या नदीवर स्नानास आलेल्या दृष्टीस पडतात.

याशिवाय, या प्रदेशांतील विशेष गोष्ट म्हटली, म्हणजे भोंवतालीं असणारा सरोवरांचा समुदाय ही होय. इकडील जमीन विंध्यपर्वताच्या लहानलहान श्रेणींमुळें बरीच उंचसखल झालेली आहे. शिवाय पर्वतांच्या सान्निध्यामुळें इकडे पाऊसही बराच म्हणजे साठ इंचांपर्यंत पडत असतो. यामुळें सर्वत्र लहान मोठीं तळीं दृष्टोत्पत्तीस येतात. यांची संख्या इतकी मोठी आहे कीं, खास भंडारा गांवाच्याभोंवतालीं जवळ जवळ ६० लहान मोठे तलाव आहेत. हे तलाव म्हणजे अगदीं लहानशीं नासक्या पाण्याचीं डबकीं असतील, अशी जर कोणाची कल्पना असेल, तर ती साफ चुकीची आहे. भंडारा जिल्ह्यांतील सर्वांत मोठा तलाव म्हणजे 'नवेगांवबांध' हा होय. त्याचा परिघ जवळजवळ छत्तीस मैल आहे. या तलावाच्या मध्यभागीं नावेंत बसून गेलों म्हणजे समुद्रांत सहल

करीत असल्याचा भास होतो. व भोंवतालचें भीषण स्वरूप, उंच उंच टेंकड्या व घनघोर अरण्यें व खालीं पाण्यावर उठत असलेल्या लाटा पाहून मनाला क्षणभर भीतिच वाटते. पण लवकरच ती भीति नष्ट होऊन तिच्या जागीं सृष्टिसौंदर्याच्या अनुपमेय दृश्याबद्दल मनांत प्रीति उत्पन्न होते. मनुष्य आनंदपूर्ण नयनांनीं या सौंदर्यामृताचें यथेच्छ पान करूं लागतो.

खास भंडारा येथें जे कांहीं मोठे तलाव आहेत त्या सर्वांचा परिघ दोन मैलांचे आंतच आहे. तलावांचे कांठीं लहान लहान देवळें धर्मनिष्ठ लोकांनीं बांधून ठेवलीं आहेत, व प्रत्येक तलावाला तीन चार घांटही बांधले आहेत. संध्याकाळच्या वेळीं भागलेल्या मनाला क्षणभर विश्रांति देण्याकरितां, कचेरींतील मंडळी तलावाच्या कांठावर येऊन, सृष्टिसौंदर्याच्या अवलोकनानें आपल्या मनाची इच्छा तृप्त करितात व जवळच असलेल्या देवळांतील देवाचें दर्शन घेऊन अनायासें परमार्थाची जोड प्राप्त करून घेतात! यामुळें येथें नवीन आलेल्या मनुष्याला थोडें नवल वाटतें व येथील लोक फार धर्मनिष्ठ असावेत अशी त्याची भावना होते.

आम्ही या शहरांतील तलावांवर फिरावयास जात नव्हतों. कारण लोकांच्या गडबडीपासून शक्य तितकें दूर जाण्याची वसंताला इच्छा असे, व मलाही भोंवतालचें सृष्टिसौंदर्य पाहण्याची अनिवार लालसा होती. नागपुराला भंडारा येथील सृष्टिसौंदर्याचें वर्णन वसंत मजजवळ करीत असे, तेव्हां त्यावर माझा विश्वास बसेना. मी

त्याला म्हणें कीं, "तुला आपल्या गांवाबद्दल अभिमान असेल व त्या अभिमानाला बळी पडलेल्या तुझ्या दृष्टीला, उंचवट्यांच्या पर्वतश्रेणी, डबक्यांचीं सरोवरें व नाल्यांच्या नद्या दिसत असतील!" यावर तो म्हणे कीं, "तूं जेव्हां तें सर्व प्रत्यक्ष पाहशील तेव्हां तुला माझ्या बोलण्याचा तथ्यांश कळून येईल. तुला काय वाटतें कीं, सृष्टिसौंदर्य इंग्लंडांतील वेस्टमोअरलँड परगण्यांतच राहूं शकतें, व तेथील परगण्यालाच ( Lake district ) हें नांव सार्थ होऊं शकेल? आपल्या देशांतदेखील अशीं स्थळें पुष्कळ असतील, व आमच्या भंडाऱ्याची त्या स्थलांत प्रमुखत्वानें गणना होईल. आमच्या देशांतदेखील तिकडल्याप्रमाणें Wordsworth, More वगैरेंसारखे कवि जन्मतील व मग आमच्या भंडाऱ्याला पवित्र भूमि समजून, सर्व महाराष्ट्रीय तिच्या दर्शनाकरितां इकडे येतील! तो काळ अजून दूर आहे. तोंपर्यंत तुमच्यासारख्यांना सौंदार्य पहावयास इंग्लडांत गेलें पाहिजे. या देशांत सौंदर्य तुमच्या दृष्टीस पडणार नाहीं. वाट पहा–कालाच्या प्रवाहांत कोणती गोष्ट वाहत येणें शक्य नाहीं?" वसंत असें म्हणत असे; तेव्हां मी त्याची फार चेष्टा करीं, व म्हणे, तर आजपर्यंत तुमच्या गांवांत महाकवि कां बरें जन्माला आले नाहींत? यावर " आजपर्यंत काळ अनुकूल नव्हता; तो अनुकूल झाला म्हणजे रुक्ष भूमि नंदनवन व्हावयास मुळींच वेळ लागणार नाहीं. " असें वसंताचें ठराविक उत्तर मिळत असे.

वसंताच्या म्हणण्याचा प्रत्यय मला दिवसेंदिवस येऊं लागला.

सृष्टिसौंदर्याच्या बाबतींत भंडारा वेस्टमोअरलँडला हार जाणार नाहीं, अशी माझी खात्री झाली. एके दिवशीं आम्ही **कोरंबीचें** स्थान पहावयास गेलों. भंडारा गांवापासून तीन मैल अंतरावर **वैनगंगा** नदीच्या कांठीं असलेली ही एक लहानशी टेंकडी आहे. हिची उंची जवळ जवळ पर्वतीइतकी असावी. हिच्या माथ्यावर एक लहानसें देवीचें देवालय आहे. दसऱ्याच्या नवरात्रांत येथें यात्रा भरत असते. पण हल्लींमात्र तेथें अगदीं सामसूम होतें. सकाळीं पूजा करण्याकरितां पुजारी येऊन जात असे. याशिवाय लोकांची तिकडे मुळींच वर्दळ नसे. आम्ही संध्याकाळीं पांच वाजतां तिकडे गेलों. येथून दिसणारें दृश्य अनुपमेय सुंदर होतें. टेंकडीच्या पायथ्याला लागूनच नदी गेली होती, व तेथेंच नदीच्या प्रवाहानें वळण घेतलें होतें. वरून नदीचें वाळवंट व दूरवर वाहत जाणारा प्रवाह पाहून मनाला आनंद वाटे. भोंवतालीं घनदाट झाडी असल्यामुळें या निर्मल प्रवाहाला अधिकच शोभा आली होती. निसर्गदेवी मूर्त-रूपानें माझ्यापुढें येऊन उभी ठाकली आहे, असा मला भास झाला. घनदाट वृक्षरूपी केशकलापांनीं रेखलेली ती अर्ध-वर्तुलाकार नदी पाहून, तें निसर्गदेवीचें नयनमनोहर भाल असावें, असें वाटलें; व अस्तास जाणाऱ्या रक्तवर्णी सूर्याचें उज्वल प्रतिबिंब पाहून, तें देवीच्या भालावरील कुंकुम असावें असा मला भास झाला ! मी क्षणभर वेडावलोंच ! माझें मन निसर्गमय झालें. कवीची निसर्गाशीं एकतानता कशी होत असेल, याची जाणीव

मला झाली. मी किती तरी वेळ एखाद्या मंत्रमुग्धाप्रमाणें, त्या दृश्याकडे अनिमिष-नेत्रांनीं पहात होतों.

थोड्या वेळानें मी भानावर आलों. वसंताची आठवण होतांच मी त्याच्याकडे पाहिलें तों त्याची त्या निसर्गसौंदर्यांत गुंगून समाधि लागली होती. मीं त्याला हालवून जागा केला, तेव्हां तो वेड्याप्रमाणें टवकारून माझ्याकडे पाहूं लागला व म्हणाला, 'काय?' मीं म्हटलें, "वसंत! हें दृश्य खरोखर अत्यंत उज्ज्वल आहे. माझ्यासारख्या अरसिक मनुष्याचीदेखील या सौंदर्यानें तंद्री लावली व माझी वृत्ति काव्यमय झाली! मग तुझ्यासारख्या कवीला या वेळीं जगताचें भान राहूं नये, यांत कोणतेंच नवल नाहीं!"

पण वसंताचें लक्ष माझ्या बोलण्याकडे कोठें होतें! तो मुक्त कंठानें गाऊं लागला:—

विरह मजासि जाळितो हाय अंतरीं ॥ ध्रु० ॥
प्रीतीचें सुंदरसें, वस्त्र धरा ही नेसे!
प्रेमाचें राज्य दिसे! या जगावरी ॥ १ ॥
पशुपक्षी-सर्व अहा! आनंदीं लीन पहा!
तप्त लोहरस परि हा! हृदयिं पाझरी ॥ २ ॥
'हर्ष' नृत्य करि जगतीं! फुलली तेणें चित्तीं!
भंगुनि परि मम वृत्ती! रडति किति तरी ॥ ३ ॥

वसंताचा कंठ जात्याच मधुर व ती वेळही गाण्याला अत्यंत अनुकूल होती. वसंतानें वरील पद बिहाग रागावर घोळून घोळून म्हटलें. करुणरसानें माझें अंतःकरण कळवळून गेलें. मी त्याला

शाबासकी द्यावयास त्याच्याकडे पाहातों, तों त्याच्या नेत्रांतून एकसारख्या अश्रुधारा वहात होत्या. इतका वेळ, त्या पदाचा व वसंताचा गूढ संबंध असेल, अशी माझ्या मनाला कल्पनादेखील शिवली नाहीं ! पण आतां एकदम मी चकित झालों. पदांत वर्णन केलेली स्थिति म्हणजे वसंताच्या हृदयाचें प्रतिबिंब कीं काय ? वसंताचें अंतःकरण इतकें पिळवटून टाकणारें असें कोणतें दुःख त्याच्या मनाला झालें असावें ? असा जों जों मी विचार करूं लागलों, तों तों माझी मति गुंग होऊं लागली. मीं प्रेमभरानें त्याला हांक मारली. मीं म्हटलें, " वसंत ! तुला इतकें कशाचें दुःख होत आहे ? "

वसंताकडून कांहींच उत्तर आलें नाहीं. मात्र त्यानें सोडलेल्या दीर्घनिश्वासानें मला उत्तर दिलें. त्याच्या हृदयाला कांहीं तरी असह्य वेदना होत असाव्या, अशी माझी खात्री झाली. मीं त्याच्या गळ्यांत हात टाकला व प्रेमानें त्याला कुरवाळून म्हणालों, " वसंत ! तूं आपल्या मनाचें दुःख मजजवळ हलकें नाहींना करीत ? मी तुझा भाऊ ना ? "

वसंताला दुःखाचा उमाळा आला. अश्रुप्रवाह अधिक जोरानें सुरू झाला. त्याचे दीर्घ श्वास ऐकून मला भारी वाईट वाटलें. मीं पुन्हा म्हटलें, " वसंत ! तुझ्या हृदयाला इतक्या दारुण यातना देणारी अशी कोणती गोष्ट आहे ? तुला आज काय कमी आहे ? तुझ्या दुःखाचें मूळ काय असावें, याबद्दल माझा कांहींच तर्क चालत नाहीं. "

" या जगांतील सर्व सुखाचें व दुःखाचें जें मूळ तेंच माझ्या दुःखाचें कारण ! " वसंत रडत रडत म्हणाला.

मीं म्हटलें, " पण तें कोणतें, हें तर मला कळूं देशील ? "

वसंतानें हळुहळू आपले अश्रु पुसले. त्यानें आपल्या मनाला आवरण्याचा पहिल्यानें अत्यंत यत्न केला, व मग तो हळुहळू म्हणाला, " नाना ! आज माझ्या मनाचा दुबळेपणा तुझ्या नजरेला आला, पण ही गोष्ट तूं कोणाजवळ बोलूं नकोस; मी नित्य आपलें मन आवरून धरून हृदयांत चाललेली प्रचंड खळबळ दुसऱ्याला न कळूं देण्याविषयीं खबरदारी घेत असतों; पण ह्या बाह्य सृष्टीनें धारण केलेलें सुंदर रूप पाहून माझें दुःख अनिवार झालें ! या सृष्टीचें बाह्यस्वरूप इतकें मनोहर आहे, पण आम्ही तिचीं लेकरें मानसिक यातनांमुळें तडफडत आहों, याची तिला पर्वाच नाहीं. हाय ! हाय ! 'उप्पर तर खुप बनी है, अंदरकी बात राम जाने,' असाच ढोंगी प्रकार या जगांत नित्य दिसणार काय ? " त्याचे डोळे भरून आले. तो सद्गदित होऊन म्हणाला, " नाना ! प्रेम हेंच माझ्या दुःखाचें कारण ! या जगांत हेंच सौख्याचें व दुःखाचें मूळ आहे. "

" वसंत ! पण तूं एकंदर मला सर्व प्रकार सांगशील, तर मी तुला शक्य ती मदत करून तुझी इच्छा सफल करण्याचा प्रयत्न करीन. माझ्यावर तूं विश्वास टाक. "

" नाना ! तूं मला आग्रह करूं नकोस. हें विधिलिखित आहे.

इथे मानवी प्रयत्न व्यर्थ आहेत. माझ्याबद्दल तूं काळजी करूं नकोस. माझें दुःख दूर होणें अशक्य आहे. तुझें जर माझ्यावर खरें प्रेम असेल, तर तूं मला अधिक आग्रह करूं नकोस. योग्य वेळ आली, म्हणजे मीच आपण होऊन सर्व तुला सांगेन. मला तरी जिवाभावाच्या गोष्टी सांगायला तुझ्याशिवाय दुसरें आहे कोण? तर तूं मला आग्रह करूं नये हेंच उत्तम! तुझा उपयोग होण्यासारखा असता, तर मीं आपण होऊनच तुला सगळें सांगितलें असतें. ती गोष्ट शक्य असती, तर तिच्याकरतां मी इतका निराश कधींच झालों नसतों. चल तर ऊठ, उशीर बराच झाला; आपल्याला घरीं लवकर गेलें पाहिजे."

वसंताच्या या निर्धाराच्या बोलण्यानें मला स्तब्ध राहणें भाग पडलें. मीं मनांत म्हटलें, "वसंतासारख्या सुज्ञाला प्रेमाच्या जाळ्यांत इतक्या रीतीनें गुरफटून राहणें भाग पडावें ना! प्रेमा, तुझा महिमाच थोर!"

आम्ही दोघेही टेंकडीवरून खालीं उतरलों, व रस्ता चालूं लागलों. दोघेही स्तब्ध होतों. प्रत्येक आपापल्या विचारांत मग्न झाला होता. शहर जवळ आलें तेव्हां वसंतानें आकाशाकडे पाहून दीर्घनिश्वास सोडला, व तो हळुहळू खालील चरण गुणगुणूं लागला.

"प्रेमावांचुनि सर्व सुनें, जग भासे बापुडवाणें!"

---

# प्रकरण ५ वें.

## स्थित्यंतर.

यमूशीं माझें लग्न होणार असा रंग दिसूं लागला. तिच्या स्वभावाची व शिक्षणाची मला परीक्षा झालेलीच होती. माझ्या स्त्रीशिक्षणाविषयींच्या इतक्या कोत्या व अपुऱ्या कल्पना पाहून माझे सुधारक मित्र मला हंसतील, आणि वसंताच्या म्हणण्याप्रमाणें सुधारकी चर्म पांघरून मी त्यांच्या गोटांत शिरलों, असा आरोपदेखील मजवर ते लादतील, हें मी पूर्णपणें जाणून आहें. तेव्हां माझ्या मताच्या समर्थनार्थ माझे विचार मीं येथें दिले, तर वावगें होणार नाहीं असें मला वाटतें; व त्याप्रमाणें मी माझ्या मित्रांना माझ्या मतांची ओळख करून देत आहें.

मी स्त्रीशिक्षणाच्याविरुद्ध नाहीं; इतकेंच नाहीं, तर मी उलट त्याच्या निस्सीम भक्तांपैकींच एक आहें. जुन्या वेदकाळीं गार्गीसारख्या विद्वान् स्त्रिया आर्यावर्तांत होऊन गेल्या, म्हणून आम्हीं स्त्रीशिक्षण दिलें पाहिजे, किंवा स्त्रीशिक्षणाचा प्रघात आपल्या राज्यकर्त्यांत आहे, म्हणून आपण त्यांचें अंधानुकरण केलें पाहिजे, असें माझें मत नाहीं. तर शिक्षण हें व्यक्तीच्या आणि त्याबरोबर राष्ट्राच्या सामर्थ्यास अत्यावश्यक आहे, व त्याशिवाय राष्ट्राची उत्क्रांति कधींच होणार नाहीं, अशी माझ्या मनाची खात्री असल्यामुळें प्रत्येक व्यक्तीला शिक्षण दिलेंच पाहिजे, अ

माझा आग्रह आहे; मग ती व्यक्ति स्त्री असो किंवा पुरुष असो, उच्च कुलांत जन्म पावलेली असो किंवा अस्पृश्य मानलेल्या जातींत जन्मास आलेली असो, कांहींही असलें तरी सारखेंच. आतां प्रत्येकास देण्यांत येणारें शिक्षण कोणत्या प्रकारचें असावें, एवढाच प्रश्न आहे.

पुरुषाच्या शिक्षणाविषयीं कांहींच प्रश्न नाहीं. ज्या योगानें राष्ट्राचा जोम वाढेल, व सर्वत्र चाललेल्या शास्त्रीय उत्क्रांतीच्या अनुरोधानें राष्ट्राचें पाऊल ज्या योगानें पुढें पडेल, असें शिक्षण प्रत्येकास मिळालें पाहिजे. पण स्त्रीशिक्षणाची अशी गोष्ट नाहीं. राष्ट्रांत समाजव्यवस्था कायम ठेवावयाची असेल, तर स्त्री व पुरुष हे दोन्हीही सारखेच श्रेष्ठ, परंतु निरनिराळ्या स्वरूपांनीं समाजाला उपयोगी असे अवयव आहेत. त्यांच्या संयोगानें समाजाची व्यवस्था राहणारी आहे. जर समाजरचना कायम ठेवावयाची असेल, तर परस्परांत लग्नें करून घेऊन स्त्रीपुरुषांनीं एकत्र कुटुंब करून राहणें अवश्यक होय, असें कोणीही कबूल करील. जर लग्नाची व्यवस्था मोडली, संसार करण्याच्या पद्धतीला हरताळ लागला, व कुटुंबाला समाजांतून फांटा मिळाला, तर पशूप्रमाणेंच नैतिक शिथिलता, अव्यवस्था व बेबंदशाही मानवसमाजांत माजून जाईल व मानवी सुधारणेची बरीच पीछेहाट होऊन अधोगतीकडे तिची धांव जाऊं लागेल. ज्यांना हें पसंत असेल, त्यांना माझें कांहींच म्हणणें नाहीं. त्यांनीं आपल्या मतांचा खुशाल डांगोरा पिटावा,

कारण प्रत्येकाला आपलीं मतें पुढें मांडण्याचें स्वातंत्र्य आहेच. वाटल्यास समाज त्यांच्या मताचा समाचार घेईल. अशा मताचे लोक आपल्या समाजांत फारसे सांपडणार नाहींत, अशी माझी खात्री आहे.

लग्न व त्यामुळें झालेलें कुटुंब हें जर समाजव्यवस्थेला अवश्यक आहे, तर प्रत्येक कुटुंबांतील अंगभूत कर्तव्यें त्या कुटुंबांतील व्यक्तींनीं आपसांत वांटून घ्यावीं, हें न्याय्य होय. या कर्तव्याचे निसर्गनियमानेंच दोन भाग पडतात. पहिला भाग म्हणजे कुटुंबाचें रक्षण व शरीरपोषण करण्याची जबाबदारी, व दुसरा भाग म्हणजे गृहव्यवस्था आणि अपत्यसंगोपन. यांपैकीं कोण ताही एक भाग कोणत्याही व्यक्तीनें उचलणें हें सकृद्दर्शनीं जरी न्याय्य वाटलें, तरी नीट विचार केल्यावर, तें अव्यवहार्य आहे असें कोणाच्याही लक्षांत येईल. पुरुषांची प्रकृति स्वभावतः कंटक असल्यामुळें रक्षण व पोषण याचें कार्य हातीं घेण्याला ते अधिक लायक झाले आहेत. यावर कोणी म्हणतील कीं, स्त्रियांना आजपर्यंत गुलामगिरींत दिवस काढावे लागले, यामुळें त्यांच्यांत भीरुत्व आलें आहे; पण ही स्थिति बदलल्यास त्या कंटक होतील. हें म्हणणें खोटें आहेच; पण तें खरें आहे असें जरी धरून चाललें, तरी कांहीं नैसर्गिक नियमांमुळें कुटुंबाच्या पोषणाचें व रक्षणाचें काम आपल्या अंगावर घेण्यास त्या असमर्थ होतात! स्त्रिया गरोदर असतांना शेवटले कांहीं महिने, किंवा प्रसूतीनंतरचे पहिले निदान दोन महिने,

कोणतेंही काम त्यांच्या हातून होऊं शकत नाहीं, ही गोष्ट निर्विवाद आहे! त्याचप्रमाणें रजोदर्शनकालांतदेखील कोणतेंही शारीरिक किंवा मानसिक श्रमाचें काम त्यांनीं केल्यास त्यांची प्रकृति ढांसळेल, असें वैद्यशास्त्राचें (पाश्चात्त्य व पौर्वात्य अशा दोन्हींही) मत असल्यामुळें, त्यांच्या आयुष्यापैकीं बराच काळ ईश्वरी योजनेमुळें व्यर्थ जाणार, हें स्पष्ट आहे. या नैसर्गिक गोष्टी बदलणें हें मनुष्यप्राण्याच्या हातीं नाहीं; यामुळें स्त्रियांच्या हातून समाजरक्षणाचें व पोषणाचें कार्य पार पडणें अशक्य[1] आहे.

वरील विवेचनावरून कुटुंबाच्या कर्तव्यांपैकीं पहिल्या कर्तव्यकर्माची जबाबदारी आपल्या शिरावर घेण्यास स्त्रिया कशा असमर्थ आहेत, ही गोष्ट लक्षांत येईल. यामुळें दुसऱ्या कर्तव्याची म्हणजे गृहव्यवस्था व अपत्यसंगोपन यांची जबाबदारी स्त्रियांवर येऊन पडते. हें कर्तव्यकर्म कमी महत्त्वाचें आहे असें नाहीं; तें पहिल्याइतकेंच श्रेष्ठ आहे. पण तें हलक्या प्रतीचें आहे अशी मिथ्या भावना कांहींची झाल्यामुळें स्त्रीवर्ग गुलामगिरींत खिचपत पडला आहे, असें भ्रामक विधान आजकाल ऐकूं येतें; व या काल्पनिक दास्यांतून त्यांची मुक्तता करण्याची खटपटही

१ या गोष्टी इतक्या स्पष्टपणें मांडल्याबद्दल माझ्या वाचकभगिनी मला क्षमा करतील अशी आशा आहे. आजकाल समान हक्कांचें पोकळ व असंभवनीय बंड दिवसेंदिवस वाढत चालल्यामुळें, आपल्या समाजांत नीट विचार न करतां भलत्याच कल्पनांना थारा मिळाल्यास समाजाची घडी विस्कळित होईल, या भीतीमुळेंच केवळ या प्रश्नाचा ऊहापोह स्पष्टपणें करावा लागला.

पुष्कळांनीं चालविली आहे ! पण खरी वस्तुस्थिति वर विवेचन केल्याप्रमाणें असल्यामुळें त्यांना त्यांचें कर्तव्य योग्य रीतीनें पार पाडतां येण्याची पूर्व तयारी करणें, हें मनुष्यमात्राचें आद्य कर्तव्य आहे; कारण समाजांतील एका अंगाला कर्तव्य-पालनाची शक्ति येऊन दुसऱ्या अंगानें कमजोर राहणें ही स्थिति समाजघटनेला विघातक होय. हें गृहव्यवस्थेचें व अपत्यसंगोपनाचें कर्तव्यकर्म चांगल्या रीतीनें बजावतां येईल, अशा धोरणा-नें त्यांना शिक्षण दिलें पाहिजे व तेंच खरें स्त्रीशिक्षण होय. ज्या शिक्षणानें पुरुषांना आपलें कर्तव्य करण्याचा जोम येतो, तें शिक्षण या स्त्रियांना त्यांच्या स्वाभाविक कर्तव्यभिन्नत्वामुळें किती निरुप-योगी होईल याची कल्पना प्रत्येकाला होईलच !

पुष्कळांचें वरील विचारांना एक ठराविक उत्तर असतें. ते म्हणतात कीं, " आमच्या मुली पुरुषांप्रमाणेंच बी. ए., एम् ए. होतील, वाटल्यास त्या लग्न करणार नाहींत, व समाजसेवेच्या कार्यांत आपल्या देहाचें सार्थक करतील." पण हें म्हणणें फोल आहे, कारण जर सर्वच स्त्रियांनीं लग्न न करण्याचा निश्चय केला, तर समाजाची घडी व बंधनें विस्कळित होऊन अनाचार वाढेल. तेव्हां लग्न न करून समाजसेवा करण्यास वाहिलेल्या स्त्रि-यांची संख्या अगदींच अल्प असली पाहिजे, हें उघड आहे. या अल्पसंख्याक स्त्रियांनीं कांहींही केलें तरी आमचें कांहीं म्हणणें नाहीं. कारण ज्या गोष्टी समाजांतील मोठ्या भागाला लागू पड-

तील तीच समाजाची दिशा होय; अल्पसंख्याक लोकांच्या आटोक्यांतील गोष्टी म्हणजे समाजाच्या वर्तनक्रमाची दिशा नव्हे. तेव्हां अशा लोकांबद्दल प्रश्नच नाहीं.

दुसरे कांहीं लोक म्हणतात कीं, " आमच्या मुलींनीं पुरुषांचें शिक्षण संपादन केलें म्हणून काय झालें ? त्या लग्नें करितील, पण त्यांच्या पतींनीं रानटी लोकांप्रमाणें त्यांना स्वयंपाकाला न जुंपतां, घरीं आचारीपाणके ठेवावे व त्यांच्या शिक्षणाचा त्यांना योग्य फायदा घेऊं द्यावा. " पण घरांत आचारीपाणके ठेवूं शकतील, असे कितीसे श्रीमंत लोक सांपडतील ? जगांत सामान्य लोकांचाच विशेष भरणा असतो, ही गोष्ट हे उतावळे सुधारक विसरतात; व आपल्या स्थितीवरून सर्व समाजाकरितां सुधारणेची आंखणी करतात. ही दिशा अर्थातच कांहीं व्यक्तींना सुसाध्य असली, तरी बहुजनसमाजाला ती निरुपयोगी असते व त्यामुळें नवीन सुधारणा प्रचारांत येत नाहींत. आपल्या मताचें घोडें मागें राहिलें कीं, समाज रूढींनीं जखडलेला व मूर्खपरंपरेनें बांधलेला, म्हणून ओरड करावयास हे तयारच! जगांत माझ्यासारखे, किंवा माझ्यापेक्षांही थोडी वाईट स्थिति असलेले, म्हणजे मध्यम स्थितींतील लोक, यांचाच समाज बनलेला असतो, व या लोकांना उपयोगीं पडून जी अमलांत आणतां येईल, तीच खरी सुधारणेची दिशा. श्रीमंत लोकांनीं कांहींही केलें, तरी त्यांना हंसण्याचें सामान्य जनसमूहाला कांहीं कारण नाहीं, किंवा श्रीमंतानीं आपल्या कृत्यांबद्दल

अभिमान बाळगून दर्पोक्तीनें सामान्यजनसमूहास ' आळशी, मूर्ख, पुराणे,' म्हणून नांवें ठेवण्याचें कांहींच कारण नाहीं.

माझीं सुधारणेचीं मतें माझ्या दृष्टीनें व्यवहार्य असल्यामुळें स्त्रीशिक्षणाची दिशा मीं आपल्या मनाशीं ठरविली होती. स्त्रियांचें जें मुख्य काम, म्हणजे गृहव्यवस्था व अपत्यसंगोपन, त्याला उपयोगीं पडेल, असें शिक्षण त्यांना मिळालें, म्हणजे त्या खऱ्या गृहिणीपदाला लायक होतील, व संसारशकट सुरळितपणें ओढून नेतील, अशी माझी समजूत होती व अजूनही आहे. माझ्या या समजुतीप्रमाणें यमूला पुरतें शिक्षण मिळालें होतें, व जी कांहीं कमतरता असेल, ती मला पुढें भरून काढतां येण्यासारखी होती. यामुळें या संबंधाला माझ्या मनाची संमति मिळाली. अजूनपर्यंत मीं आपलें मत पुरतेपणीं कोणालाच सांगितलें नव्हतें, व मलादेखील कोणीं पुन्हा—मागील प्रसंगानंतर—त्याविषयीं विचारलें नाहीं. अस्फुट रीतीनें कां होईना, पण हा सर्व प्रकार लवकरच घडून येणार, अशी घरांतील सर्व मंडळींची खात्री झाली होती ! गोविंदराव माझ्याशीं विशेष सलगीनें व प्रेमानें वागूं लागले. काकूंचें माझ्या व्यवस्थेकडे अधिक लक्ष जाऊं लागलें. यमू माझ्यासमोर येण्याला अधिकच लाजूं लागली. वसंतमात्र दिवसेंदिवस उदास होत चालला !

या सर्व गोष्टी जरी ठरल्यासारख्या होत्या, तरी प्रेम म्हणजे काय, याची माझ्या हृदयाला जाणीव नव्हती. यमू मला आवडत असे, व हिचा आपल्याशीं विवाह झाल्यास आपलें आयुष्य

सुखांत जाईल, अशी खात्री मला वाटे. पण कविलोकांनीं वर्णन केलेल्या, हृदयांत तळमळ उत्पन्न करणाऱ्या, अंगांतील रक्त तापविणाऱ्या, व सारासार विचारांतून—फार काय, या जगांतून मनुष्याला ओढून नेणाऱ्या प्रीतिज्योतीचें मला अस्पष्टही दर्शन झालें नव्हतें! तिचा प्रभाव माझ्या हृदयाला अद्याप कळला नव्हता! तिचें तेज असह्य हें ठाऊक असूनही, माझें मन तिच्याभोंवतीं पतंगाप्रमाणें घिरट्या घालूं लागलें नव्हतें! मला आपलें वाटे, प्रीति ही केवळ कविकल्पना असावी. कोणतेही दोन प्राणी कांहीं दिवस एकत्र राहिले कीं, परस्परांत जो स्नेह उत्पन्न होतो, त्यालाच प्रीति म्हणत असतील. प्रथमदर्शनीं उद्भवणारी प्रीति (Love at first sight) मला अगदींच असंभाव्य वाटे!

आठपंधरा दिवस असेच आणखी लोटले असते, तर माझें लग्न पुरतें ठरून माझ्या आयुष्याला निराळेंच वळण लागलें असतें. परंतु भवितव्यता निराळी होती. एके दिवशीं मला डाकवाल्यानें दोन पत्रें आणून दिलीं. दोन्ही पत्रें अमरावतीहून आलीं होतीं. दोन्हीही पत्रें माझे वकील व पालक रा. नरसोपंत यांजकडून आलीं होतीं. त्यांपैकीं एकांत, मी वयांत आल्याबद्दलचा मजकूर असून बाबांच्या मृत्युपत्राप्रमाणें माझ्या मिळकतीची व्यवस्था पाहण्यास मी स्वतंत्र झालों, असें लिहिलें होतें. दुसरें पत्रमात्र बरेंच विस्तृत असून त्यांत मला अमरावतीला जरूर बोलाविलें होतें. या दुसऱ्या पत्रांतील कांहीं उतारे मी खालीं दिले आहेत, त्यावरून

अमरावतीला जाण्याची मला कां आवश्यकता पडली, हें सहज ध्यानांत येईल.

" राजश्री नानासाहेब यांस—

* * * *

आपण स्वतंत्र झालां, तेव्हां आपण आपली इस्टेट आपल्या हातीं घेऊन आम्हां पालकांना जबाबदारींतून मुक्त करणें हेंच उचित आहे. परद्रव्य म्हणजे विषासारखें, पण तें इतके दिवस मित्रकार्य म्हणून आम्हीं जतन केलें; पण आतां तशी कांहींच जरुरी उरली नाहीं. आपण सुज्ञ आहां, आपणांला सुशिक्षण मिळालें आहे, तेव्हां आपण ही जबाबदारी उत्तम रीतीनें आंगावर घेऊं शकाल, याबद्दल मुळींच संशय नाहीं. सबब आपण स्वतः इकडे या, म्हणजे मी सर्व हिशोब आपल्याला समजावून देईन व पुढील व्यवस्था काय करावयाची, हेंही आपणांला सुचवीन.

* * * *

या वर्षीं मुंबईला ' Every Indian's Bank ' म्हणून एक आपणां दक्षिणी लोकांची मोठी सहकारी पेढी निघाल्याचें आपण ऐकिलें असेल. स्वदेशाविषयीं आपणांला कळकळ असेल ( आणि ती निस्संशय असेलच ), तर आपण या पेढींत आपली रक्कम ठेवून तिचे डायरेक्टर व्हावें, अशी माझी इच्छा आहे. आपल्या पेढीला आपण मदत केली नाहीं, तर या बाल्यावस्थेंत, परकीय जुनाट पेढ्यांबरोबर टक्कर मारणें तिला कठीण जाईल !

* * * *

रा. रायकर हे नेकीचे व लायक गृहस्थ असून त्यांच्या नजरे-खालीं पेढीची भरभराट होईल यांत तिळमात्र शंका नाहीं. ते माझे जिवलग मित्र आहेत, एवढें तुम्हांला सांगितलें, म्हणजे पुरे आहेसें वाटतें. तेव्हां आपण इकडे निघून यावें हें उत्तम, म्हणजे सर्वांच्या विचारानें नीट व्यवस्था करतां येईल. याशिवाय इतर कांहीं खाजगी बाबीसंबंधानें आपल्याला विचारावयाचें आहे."

अमरावतीला जाण्याचा माझा विचार मीं कळविला, तेव्हां सर्वांना वाईट वाटलें. पण इस्टेटीच्या व्यवस्थेकरितां जाणें अगत्य आहे, असें त्यांना कळवितांच त्यांचें समाधान झालें. काम संपल्यावर परत येण्याबद्दल आग्रह करून त्यांनीं मला निरोप दिला. मीं वसंताला सर्व पत्र वाचून दाखविलें. तो कांहींच बोलला नाहीं. तेव्हां मी म्हटलें, हें काम संपतांक्षणींच मी इकडे येईन. यावर तो हंसून म्हणाला, "या सुटींत तुझें येणें कसचें होतें! कारण आतां सुटी फक्त एकच माहिना उरली आहे, व तुझ्या कामाला एक महिना तरी खास लागेल." मला त्याचें म्हणणें पटलें व आतां आपली परत नागपुराला वसतिगृहांत भेट होईल, असें म्हणून मीं त्याची रजा घेतली.

काकूंना फार वाईट वाटलें. त्यांचा माझ्यावर बराच लोभ जडला होता. शिवाय मी त्यांचा जांवई होण्याचा योगही या आकस्मिक अडचणीमुळें लांबणीवर पडला. मी निरोप घेऊन घराबाहेर पडलों तेव्हां सहज मागें वळून यमूकडे पाहिलें, तों तिच्या डोळ्यांत अश्रु

आले होते! माझी नजरानजर होतांच तिनें आपले अश्रु पुसले, व लागलीच लाजून ती बाजूला झाली. वसंत मला पोहोंचविण्याकरितां स्टेशनावर आला होता. लवकरच गाडी आली व मीं दुःखानें वसंताचा व भंडाऱ्याचा निरोप घेतला. शेवटीं गाडी चालू होतांच, Good bye till July! ( आतां जुलैंत भेट! नमस्कार! ) असें दोघांनीं एकदम म्हटलें. वसंताच्या डोळ्यांत अश्रु आले. माझीही तीच स्थिति झाली!

एकान्त मिळतांच मला यमूची आठवण झाली, व मीं मनांत म्हटलें, " या लहानग्या पोरीला प्रेमाची झुळूक लागली कीं काय, देव जाणे. " पण मीं आपला संशय तसाच मनांतून काढून टाकला. कारण, मला वाटलें कीं, मी मोठा असूनदेखील अजून मला खऱ्या प्रेमाची ओळख नाहीं, तर बाल्यांतच मुग्धपणें विहार करणाऱ्या त्या मुलीला प्रेमाची जाणीव कशी येणार?

---

## प्रकरण ६ वें.

### बंकांची बोंबाबोंब!

स्टेशनामागून स्टेशनें येऊं लागलीं. गाडीचा वेग अतोनात होताच, पण त्याहीपेक्षां माझ्या मनाचा वेग अनिवार झाला. माझें मन नागपूर स्टेशन येण्यापूर्वींच अमरावतीला दाखल होऊन पैशाची उलाढाल करण्यांत गुंग झालें. देशकार्याला मदत कर-

ण्याची सहजासहजीं आलेली संधी घालविण्याइतका मी कृतघ्न नव्हतों. माझ्या कर्तव्याची मला जाणीव होतीच. आपल्याला कोठें तरी रक्कम गुंतवून व्याज वसूल करावयाचें, मग तें स्वदेशी पेढीमार्फत केल्यास काय वाईट ? आपल्या देशांतील लोकांना तेणेंकरून भांडवल सांपडून देशी उद्योगधंद्याकडे लक्ष देण्यास तरी परवडेल असे विचार माझ्या मनांत येऊं लागले. आपण जर एवढेंही केलें नाहीं, तर आपल्याला मिळालेलें शिक्षण व्यर्थ होय, असा माझा ठाम निश्चय झाला.

नागपूर स्टेशन येतांच मीं एक टाइम्सचा अंक खरेदी केला, व वेळ घालविण्याकरतां तो चाळूं लागलों. पहिल्याच पानावर मोठमोठ्या अक्षरांनीं, ‘ Banking crisis ! Punjab Banking Co. fails ! ’ ( बँकांची त्रेधा ! पंजाब बँकिंग कंपनी बुडाली ! ) असा मजकूर छापलेला होता, तो वाचतांच मी चपापलों. ज्या गोष्टीबद्दल मी विचार करीत होतों, त्याच गोष्टीची वर्तमानपत्रांत चर्चा ! आणि तीही अशा वाईट कारणानें, हें पाहून मला बरेंच वाईट वाटलें; एक प्रकारची भीतिदेखील वाटली. व आपण सावधागिरी ठेवणें हेंच रास्त वाटून मी तो समग्र मजकूर लक्षपूर्वक वाचूं लागलों.

आजपर्यंत नांवाजलेल्या देशी ब्यांकेनें दिवाळें काढावें, ही कल्पनाच मनाला दुःसह झाली. यापुढें देशी धंद्याला लोक मदत करणार नाहींत, देशी कंपन्यांवरचा लोकांचा विश्वास उडेल, व

नुकत्याच ऊर्जितावस्थेस येऊं घातलेल्या स्वदेशीच्या वृक्षाला पुरतीच कीड लागेल, हे विचार माझ्या मनांत येऊन गेले. वाचतां वाचतां 'It is to be seen how many Indian Banks will survive this shock.'—या धोक्यांतून किती बँका सुखरूपपणें वांचून बाहेर निघतील हें आतां पाहणें आहे. असे शब्द दिसतांच मला आमच्या ( Every Indian's Bank. ) पेढीची आठवण झाली, व व्यापाराच्या कामांत मागसलेल्या आम्हीं दक्षिणी लोकांनीं काढलेल्या पेढीची पुढें काय अवस्था होणार, या कल्पनेनें मला भंडावून सोडलें. या धक्क्यांतून आमची पेढी निभावली, तर पुढें तिची व तिच्याबरोबर आमच्या औद्योगिक चळवळीची भरभराट; नाहींपेक्षां आमच्या आरंभशूरत्वाला ही कायमची पुष्टि झाली. कदाचित् या प्रसंगाचें पूर्वस्वप्न पडल्यामुळेंच नरसोपंत वकिलांनीं मला बोलावलें असेल, असेंही वाटलें. काय असेल तें असो. या बातमीनें मी मुळींच डगमगलों नाहीं. मी घाबरलों, मला वाईट वाटलें—पण आपल्या संस्थांना मदत करण्याचा माझा बेत तिळमात्रदेखील ढळला नाहीं. काय वाटेल तें होवो, आपण आपल्या सदसद्विवेकबुद्धीला स्मरून आपलें कर्तव्य बजावणार असा मीं आपल्या मनाशीं निश्चय केला.

टाइम्सचा अंक मीं अथपासून इतिपर्यंत वाचला. त्यापैकीं मला बराच भाग समजला नाहीं. कारण, व्यापारी बातम्या आणि व्यापारी घडामोडींचें रहस्य, व्यापाऱ्याशिवाय इतरांच्या लक्षांत

येणें जवळजवळ अशक्यच ! ताज्या तारा वाचण्यास संवकलेल्या, जगाविषयीं बेफिकीर राहून आपल्याच सुखांत दंग होण्यास शिकलेल्या, आणि इतरांच्या सुखदुःखाविषयीं– ‘ काय मौज ’ किंवा ‘ हरहर ’ अशा कोरड्या शब्दांनीं कोरडी सहानुभूति दाखविणाऱ्या आमच्या बुद्धीला, देशांत उत्पन्न झालेल्या सांपत्तिक अडचणींचें कोडें उलगडलें नाहीं, तर त्यांत कांहीं नवल वाटावयास नको. आमचें शिक्षणच तसलें. कसेंही करून बी. ए. एल.एल. बी. होणें, हीच आमची विद्येची कल्पना; कसेंही करून पैसे मिळविणें हेंच आमचें कर्तव्य; व त्याच पैशानें मिळूं शकणाऱ्या विलासांत दंग होणें हेंच आमच्या मनाचें समाधान! अशा स्थितींत देशाच्या खऱ्या हिताची काळजी कोणास असणार ? तरी पण काय असेल तें असो; माझ्या मनाचा ओढा देशाच्या कल्याणाकडे विशेष होता. याला कारण कदाचित् वसंताची संगति असेल. पण त्या दिवशीं मी तो सर्व मजकूर लक्ष लावून वाचला, व तो समजावून घेण्याचा प्रयत्नही केला, एवढेंमात्र खरें !

बडणेऱ्याचें स्टेशन आलें. लागलीच एका गाडींतून उतरून मी दुसऱ्या गाडींत जाऊन बसलों. फार वेळ वाट पाहावी लागली नाहीं. लौकरच उतारू घेऊन गाडी चालू झाली. डब्यांत एक म्हातारा गृहस्थ उदास मुद्रेनें बसला होता; त्याच्याकडे माझें लक्ष वेधलें. तो मधुन मधुन सुस्कारे टाकीत होता. मला वाईट वाटलें व त्याच्या दुःखाचें परिमार्जन करितां येणें शक्य अस-

त्यास तें करावें, या उद्देशानें मी त्याच्याजवळ जाऊन बसलों, व त्याला त्याच्या दुःखाचें कारण विचारलें. म्हाताऱ्याचें हृदय भरून आलें व तो रडतच म्हणाला, "बाबा, माझी म्हताऱ्याची कंबरच खचली आहे. अमरावतीच्या बल्लवदास शेटजींनीं आपली गादी पालथी टाकली, असें मीं आजच ऐकलें व तसाच धांवपळ करीत निघालों. मीं रेल्वेंत तीस वर्षें नौकरी केली व नौकरी सोडल्यावर तीन हजार रुपये प्राव्हिडंट फंडाचे मिळाले, ते आठ आणे व्याजानें शेटजींच्या दुकानीं टाकले. पंधरा रुपये महिना व्याज मिळे, त्याच्यावर आज पांच वर्षें कसा तरी गरिबीनें गुजराण करीत होतों. आतां माझ्या पोरांचें कसें होईल? देवा! त्यांना चौपदरी घेऊन रस्त्यानें जावें लागेल!" बोलतां बोलतां म्हातारा ओक्साबोक्शीं रडूं लागला. त्याचें समाधान करतां करतां माझ्या नाकीं नळ आले! त्याच्या दृष्टीनें आकाशच फाटलें; कारण, त्याच्या उदरनिर्वाहाचें साधन समूळ नाहींसें झालें! तेव्हां माझ्या कोरड्या बोलण्यानें त्याला ठिगळ कसें लागावें? तरी मीं त्याला म्हटलें, "म्हातारे बाबा! तुम्ही धीर धरा. कदाचित् तुम्हीं ऐकलेली बातमी खोटीदेखील असेल." यावर तो म्हातारा म्हणाला— "बाबा, देव करो व तुझ्या तोंडांत साखर पडो! मला म्हाताऱ्याला अधिक कशाची आशा आहे? एकदां माझे पैसे सुरक्षित माझ्या हातीं पडले, म्हणजे गंगेंत घोडें न्हाले. नाहींपेक्षां प्राणत्यागाशिवाय मला दुसरा मार्ग नाहीं; पोरांचे अन्नपाण्याचे हाल पाहण्यापेक्षां मेलेलें काय वाईट?"

म्हाताऱ्याची मुद्रा फारच भेसूर दिसूं लागली. यावरून त्याच्या विचारांचा ओघ कसा वाहात असावा, या गोष्टीची मला अटकळ झाली. म्हाताऱ्यानें अखेरीस एक दीर्घ निश्वास सोडला, तेव्हां मला बरें वाटलें, कारण त्याच्या मुद्रेचें मला फारच भय वाटूं लागलें होतें.

गाडी थांबल्याबरोबर मी आपल्या विचारांतून जागा झालों. नरसोपंत वकीलांचा मनुष्य मला नेण्याकरितां स्टेशनवर आला होता. मीं भंडाऱ्याहून निघतांना त्यांना तार केली होती. नरसोपंतांचा धाकटा मुलगा दामू हादेखील स्टेशनवर आला होता. दामूला मीं मागें दोन वर्षांपूर्वीं पाहिलें होतें, तेव्हां तो बराच धीट व हूड असे. आजदेखील मीं पाहिलें तों त्याचा हूडपणा कमी झाला नव्हता. एकदम त्यानें मला, 'Good morning, NanaSaheb!' म्हणून, माझा हात आपल्या हातांत घेतला. मींदेखील त्याला 'Good morning' म्हणून म्हटलें. दामू बराच बुद्धिमान असे. यामुळें लहानथोरांचें मन त्याच्याकडे सहज आकर्षिलें जाई. त्याच्यांत बाकीच्या मुलांपेक्षां हूडपणा विशेष होता खरा, पण त्यावर त्याच्या बुद्धिमत्तेचें पांघरूण पडत असल्यामुळें तिकडे कोणाचें लक्ष जात नसे.

आम्ही टांग्यांत बसून रस्ता चालूं लागलों. दामूच्या गोष्टी एकसारख्या चालल्या होत्या. 'आमचे हेडमास्तर फार स्ट्रिक्ट (कडक) आहेत, त्यांना अगदीं देशाभिमान नाहीं! परवां मीं एका निबं-

घावर ‘ वंदे मातरम् ’ असें लिहिलें, म्हणून त्यांनीं मला पांच छड्या मारल्या व आठ आणे दंड केला. असे लोक म्हणजे देशाचे शत्रु होत. वगैरे वगैरे दामूचें पुराण चाललें होतें. लहान मुलांना शाळेंतील गोष्टींशिवाय बोलावयाला दुसरा कोणता विषय असणार, हें मी जाणून होतों. पण त्यामुळें आजकालच्या परिस्थितींत दामूचें कोंवळें मन अशा प्रकारें गुरफटून आपल्यापेक्षां वयानें, विद्येनें आणि अधिकारानें थोर असलेल्या मनुष्याबद्दल कुत्सित उद्गार काढण्यापर्यंत तें मजल मारील, अशीमात्र मला मुळींच कल्पना नव्हती. मी रागावलों व त्याला म्हटलें, “ दामू, मला वाटतें तुझ्यापेक्षां तुझे हेडमास्तर विद्येनें, वयानें व अनुभवानें वृद्ध आहेत, तेव्हां चांगलें कोणतें व वाईट कोणतें, हें तुझ्यापेक्षां त्यांना अधिक कळत असेल. आपल्या वडील माणसांबद्दल अशा प्रकारें बोलणें तुला शोभत नाहीं. ” यावर दामूचें बरेंच चऱ्हाट सुरू झालें. तें शब्दशः देत बसणें अशक्य आहे. ‘ पण ह्या म्हाताऱ्यांना कांहीं कळत नाहीं. देशभक्ति, देशाभिमान, विश्वबंधुत्व वगैरे उच्च गुणांची त्यांना कल्पना नाहीं. सरकारची हांजी हांजी करणें व स्वार्थासाठीं आपल्या देशबांधवांच्या माना मुरगळणें, हेंच यांचें इतिकर्तव्य.’—इत्यादि त्या चऱ्हाटाचा सारांश होता. मी दामूला बरेंच बोललों, त्याची शक्य तितकी कानउघाडणी केली; तेव्हां तो गप राहिला. पण त्याला माझें बोलणें रुचलें नाहीं, असें त्याच्या मुद्रेवरून मला स्पष्टपणें दिसत होतें.

घरीं पोहोंचल्यावर चहापान झालें व नेहमींप्रमाणें इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्या. व्यवहाराच्या बाबतींत उद्यां दुपारीं बोलूं, असें मीं नरसोपंतांस म्हटलें. कारण मी प्रवासाच्या दगदगीनें थकलों होतों. नरसोपंतांनींही माझ्या म्हणण्याला रुकार दिला. नंतर दामूला बरोबर घेऊन मी शहरांत फिरावयास गेलों. सकाळीं गाडींत म्हातारा भेटला त्याचे शब्द माझ्या कानांत गुणगुणत होतेच, यामुळें शेट बल्लवदासाच्या दुकानावरून फिरत जाण्याचा मीं विचार ठरविला. दामूनें ' कुठे चलतां ? ' म्हणून मला विचारलें. त्यावर ' आपण बल्लवदास शेटजींच्या दुकानावरून जाऊं, ' असें मीं त्याला सांगितलें. तो म्हणाला, ' वा ! ते बल्लवदास शेटना ? त्यांनीं तर कालच आपलें दिवाळें काढलें. लोक म्हणतात, लेकाचा पैसा दाबून बसला आहे, नी आतां दिवाळें काढतो. त्याच्या दुकानीं कालपासून काय गंमत चालली आहे. कालच एका मनुष्यानें त्याच्या दुकानीं जाऊन त्याच्या दुकानांतील गादी उलथीच्या पालथी करून टाकली. शेटजींच्या तोंडावर त्याला सर्व लोक शिव्या देतात, आाणि शेटजीमात्र हूं कां चूं करीत नाहीं. चला, तुम्हांला ही सर्व मजा आजही पहावयास मिळेल. ''

बोलतां बोलतां आम्ही शेटजींच्या दुकानीं येऊन पोहोंचलों. शेटजी दुकानांत नव्हते. त्यांचा मुनीममात्र तेथें खिन्न मुद्रेनें उभा होता. भोंवतालीं लोकांची गर्दी होती व अतिशय गलगा चालला होता. ' तीन शेंडचा ! लोकांचे पैसे खातो, नाहीं ? अरे चोरा !

तुला तुरुंगच दाखविला पाहिजे; त्याशिवाय तूं कुठून वठणीवर येणार!" याप्रमाणें कित्येक धमक्या देत होते. कित्येक मोठ्यानें 'बुडालों रे बाबा!' असें ओरडून छाती पिटीत होते. कित्येक केविलवाण्या मुद्रेनें मुनीमजीकडे पहात उभे होते. दोन तीन गरीब विधवा स्वयंपाकिणी, त्यांचें आजपर्यंतचें कष्ट करून मिळविलेलें सर्वस्व गेलें म्हणून, गाईसारख्या दीन झाल्या होत्या! गाडींत भेटलेला म्हातारा तेथेंच 'मला काय मिळेल' म्हणून चवकशी करीत होता. मला पाहतांच तो माझ्याकडे धांवत आला व म्हणाला, "महाराज; अखेर दैवानें साधली! मी सर्वस्वीं बुडालों हो! पोरांचें आतां कसें होईल? देवा! भीक मागणेंच त्यांच्या नशिबीं ना? माझ्या पोरी बाटतील! माझीं मुलें अन्नासाठीं लोकांच्या लाथा खातील! माझी बायको विहिरींत .... ...." बोलतां बोलतां म्हाताऱ्याचा स्वर व मुद्रा अशा भयंकर रीतीनें पालटली कीं, मला त्याच्याविषयीं भय वाटूं लागलें व तेंच अखेर खरें झालें. त्याला मूर्च्छा येऊन तो जमीनीवर धाडकन खालीं पडला. चार मंडळी त्याला सावध करूं लागली. मींही त्याच्या तोंडावर व डोळ्यांवर पाणी मारलें, पण व्यर्थ. म्हातारा शुद्धीवर कांहीं येईना. अखेरीस एका डॉक्टराला घेऊन येण्याकरितां मीं दामूला पाठविलें. लवकरच डॉक्टर आले. व त्यांनीं 'सर्व कारभर आटोपला,' असें मला सांगितलें. त्या वेळीं माझ्या हृदयाला जो धक्का बसला, तो मी सर्व जन्मांत विसरणें शक्य नाहीं. पोलीस आले, पंचनामा झाला, तरी मी तसाच वेड्या-

सारखा उभा होतों. ‘ Heart failure नें ’ मृत्यु; असा पंचनामा झाला; माझीदेखील हृदयक्रिया बंद पडते कीं काय, असा मला भ्रम झाला. मी त्या अनिष्ट स्थितींत काय करीत होतों, कोणाला ठाऊक ! शेवटीं दामूनें मला ओढून घरीं आणलें.

दुपारीं मी बराच वेळ निजून राहिलों. रस्त्यांत घडलेली सर्व हकीकत दामूनें नरसोपंतांना सांगितली. त्यांनाही मीं निजलों म्हणजे मला बरें वाटेल असेंच वाटलें. संध्याकाळीं मीं निजून उठलों, तरीही माझी मुद्रा खिन्नच होती. सकाळचा देखावा एकाएकीं मनांतून जाणें शक्य नव्हतें. नरसोपंतांनीं माझी खिन्न मनःस्थिति पाहिली, तेव्हां ते म्हणाले, ‘ मीं त्या म्हाताऱ्याच्या मुलांना मनुष्य पाठवून येथें आणवलें व त्याच्या प्रेताची योग्य ती व्यवस्थाही करविली. त्या कुटुंबाला शंभर रुपयांची रक्कम मदत म्हणून देण्याचा मीं विचारही केला आहे.’ यावर मला थोडेंसें बरें वाटलें. पण पुन्हा असें वाटलें कीं, अशीं ठिगळें लावून फाटलेलें आभाळ कसें सांधणार ? दुसऱ्या प्रकारें असें वाटलें कीं, ज्याचें सर्वस्व गेलें, असें हें एकच उदाहरण नाहीं. अशीं शेकडों आहेत. आपल्या नजरेस काय तें एकच पडलें, एवढेंच ! तेव्हां आपण यापेक्षां अधिक काय करूं शकणार ? कांहींही असो. माझ्या मनांत एकसारखे या बँकांसंबंधीं विचार येत होते. एवढी गोष्टमात्र खरी.

संध्याकाळीं लायब्ररींत गेलों तेव्हां तेथें एकसारखी हीच चर्चा चालू होती. आजच्या टाइम्सच्या अंकांत मुंबईच्या बऱ्याच व्यापा-

ऱ्यांनीं व मोठमोठ्या लक्षाधीश म्हणून नांवाजलेल्या पेढीवाल्यांनीं आपापलीं दुकानें बंद केल्याची बातमी होती. मुंबईची महाराष्ट्र बँक बुडाली, हीही बातमी होती. याशिवाय बऱ्याच मोठमोठ्या बँका दोनचार दिवसांत बुडणार, असें भविष्यही टाइम्सच्या लेखकानें वर्तवून ठेविलें होतें. लोक हवालदील झाले. ज्यांना आपल्या ठेवी काढून घेतां येण्यासारख्या होत्या, ते त्या काढून घेण्याच्या खटपटीस लागले. ज्यांच्या मुदतीच्या ठेवी होत्या, ते मात्र नशीब फुटेल, म्हणून स्वस्थ बसून हळहळत होते. याशिवाय दुसरा कोणताच विषय नव्हता. या वेळीं रुसोजपानी युद्धापेक्षां भयंकर युद्धाचा वणवा युरोपांत पेटला असता, तरीदेखील त्याची कोणीं हिंदुस्तानांत चर्चा केली नसती. इतकें लोकांचें मन या बँकांच्या धामधुमीनें वेधलें होतें !

मीदेखील या धामधुमीचा विचार करीत घरीं आलों.

---

## प्रकरण सातवें.

### ‘ बलिदान. ’

दुसरे दिवशीं नरसोपंतांनीं मला सर्व हिशेब समजावून दिला. बाबांच्यामागें इस्टेटीची व्यवस्था माझ्या पालकांनीं फारच उत्तम ठेविली होती. शिवाय या इतक्या वर्षांत मला खर्चाचीही विशेष जरूर भासली नाहीं. यामुळें दरवर्षीं येणाऱ्या व्याजामुळेंच माझी रकम वाढत चालली. नरसोपंत व इतर पालक यांनीं मिळून आज

माझ्याकडून एकंदर इस्टेट पावल्याबद्दल रीतीप्रमाणें पावती लिहून घेतली. शेंकडा साडेतीन व्याजाच्या एक लक्ष वीस हजार रुपयांच्या सरकारी प्रॉमिसरी नोटा, आणि इतर डागडागिने व किरकोळ मिळून एकंदर पस्तीस हजारांची रकम माझ्या हातीं आली. माझी इस्टेट इतकी मोठी असेल, अशी मला आजपर्यंत मुळींच कल्पना नव्हती. या रकमेचें पुढें काय करावयाचें, हा माझ्यापुढें मोठाच प्रश्न येऊन पडला. व त्याला नरसोपंतांनीं आपल्या पत्रांत एक मार्ग सुचविला होता. ' Every Indian's Bank ' मध्यें आपले पैसे गुंतवून त्याचा एक डायरेक्टर होणें, हाच तो मार्ग. नरसोपंत स्वतः त्या बँकेचे एक डायरेक्टर होते व व्यवस्थापक डायरेक्टर रा. रायकर हे त्यांचे परम स्नेही होते. यामुळें त्यांचा आग्रह या दिशेनें पडला तर त्यांत नवल वाटण्यासारखें असें कांहींच नव्हतें.

या हिंदी ब्यांकेला स्थापन होऊन फारच थोडे दिवस झाले होते. पण रा० रायकर यांच्या कर्तबगारीनें या ब्यांकेनें इतर हिंदी ब्यांकांत बराच वर नंबर मिळविला होता. हिच्या शाखा ठिकठिकाणीं उघडल्या होत्या, व हिचा एकंदर जमदेखील चांगला बसला होता. यामुळें कांहीं कांहीं जुन्या ब्यांकांच्या पोटांत दुखूं लागलें होतें. पण या पोटदुखण्याला कोण भीक घालतो? ब्यांकांच्या धामधुमीमुळें बऱ्याच हिंदी ब्यांकांची स्थिति अगदीं खालावून गेली होती. पण रा० रायकरांची ब्यांक या उद्भवलेल्या विलक्षण संकटाला

नेटानें तोंड देऊन उभी होती. पण कितीही चांगली ब्यांक असली, तरी लोकांचा विश्वास समूळ उडाल्यावर ती काय करणार? ठेवी आणणारा कोणी नाहीं, व ठेवी काढून नेणारे वाढत्या प्रमाणावर; अशी स्थिति उपस्थित झाल्यावर पूर्वींच व्यापारांत गुंतलेलें भांडवल आयत्या वेळीं कसें उभें करतां येणार? लोक आपल्या ठेवी भराभर काढून घेऊं लागले. हीच स्थिति आणखी कांहीं दिवस चालली, तर एन्हरी इंडियन्स् बँकेलादेखील इतर ब्यांकांची वाट धरावी लागणार, हें उघड दिसत होतें.

नरसोपंतांनीं मला मार्ग सुचविला खरा, पण विशेष आग्रह करण्याच्या भानगडींत ते पडले नाहींत. ज्या वेळीं कोणाचा कोणावर भरंवसा उरला नाहीं, त्या वेळीं मीं आपली एवढी थोरली रकम एन्हरी इंडियन्स् ब्यांकेंत गुंतवावी, असा आग्रह ते मला कसा करणार? आमच्या ब्यांकेची स्थिति फार चांगली आहे, आजपर्यंत आम्हीं फार नेटानें धीर धरला आहे, व आणखी आठ दिवस असेच गेले व ते जाणारच—म्हणजे आमच्या ब्यांकेचा जयजयकार होईल, असा भरंवसा ते मला देऊं लागले. एन्हरी इंडियन्स ब्यांकेची एक शाखा उमरावती येथें होतीच, व नरसोपंत तिच्यावर देखरेख ठेवीत असत. रा० रायकरांच्या रोज तारा येत होत्या. प्रत्येक तारेंत, 'Hopeful,' 'Excellent' (आशाजनक, छान) असेच शब्द येत होते. माझें मन हेलकावे खात होतें. कांहींच निर्णय होईना.

वर्तमानपत्रांत रोज मी ब्यांकांच्या हालहवालीचा मजकूर वाचीत असें. आज ब्यांकिंग कंपनी बुडाली, अमृतसर येथील ब्यांक बुडाली, स्पिसी ब्यांक बुडणार—असल्या मजकुराच्या तारा रोज वर्तमानपत्रांत वाचावयास मिळत. पण रा० रायकरांच्या ब्यांकेबद्दलमात्र वाईट असें अवाक्षरदेखील वर्तमानपत्रांत आलें नाहीं. उलट कांहीं कांहीं पत्रांनीं, या आणीबाणीच्या प्रसंगीं आलेल्या संकटांना धैर्यानें व नेटानें तोंड देऊन या ब्यांकेनें स्वदेशी चळवळीची अब्रू बचावली, असे उद्गार काढून ब्यांकेची आणि रा०रायकरांची स्तुतिच केली.माझादेखील दिवसेंदिवस तिच्याबद्दल चांगलाच ग्रह होत चालला, व या प्रसंगीं या ब्यांकेला आपण कांहीं तरी चांगलीच मदत करावी, असें मला वाटूं लागलें. याप्रमाणें पांच सहा दिवस लोटले. पैशाच्या व्यापारांत विलक्षण उलाढाली घडून आल्या. कित्येक ब्यांका बुडाल्या, कित्येक व्यापाऱ्यांनीं आपलीं दिवाळीं काढलीं, व कित्येकांनीं भावि संकटाच्या भीतीनें आत्महत्याही केल्या. बाजारांत शपथेलादेखील पैसा मिळेना. जो तो आपला पैसा आपल्या घरींच ठेवणें सुरक्षित समजूं लागला. कोणाचीच पत बाजारांत उरली नाहीं. व्यापार खालावला. व सराफकट्टा बंद पडला. राजा वारला म्हणजे देखील बाजार इतका शुक्क क्वचितच होत असेल ! आजच्या टाइम्समध्यें एव्हरी इंडियन्स ब्यांकेची स्थिति बरीच खालावल्याचा मजकूर होता. मीं हा मजकूर नरसोपंतांना सांगितला. तेव्हां

त्यांनीं निकडीची तार केली, व रा० रायकरांकडून उत्तर मागितलें. उत्तरही आलें:—' Demands pressing. But meeting this emergency.'—मागण्या वाढत आहेत, पण या प्रसंगाला मी तोंड देत आहें, असा मजकूर तारेंत होता. आम्हां सर्वांनाच समाधान वाटूं लागलें. संध्याकाळीं आम्हीं याच गोष्टीची चर्चा केली. लोकांचा विश्वास उडाल्यामुळें ब्यांक अडचणींत सांपडली आहे एवढेंच. बाकी पैशासंबंधींचा व्यवहार अगदीं चोख आहे, असें मला नरसोपंतांनीं बजावून सांगितलें. मींही आपले पैसे या स्वदेशी ब्यांकेला अशा अडचणीच्या वेळीं व्याजानें द्यावयाचें कबूल केलें. माझ्या मनांत विचार आला कीं, जरी आपले पैसे बुडाले, तरी पुढें मिळविण्याची आपल्याला उमेद आहे. पण अगदींच स्वार्थवश होऊन आपण जर आपल्याच संस्थांना मदत करण्याचें नाकारलें, तर या जीवनकलहांत टिकाव धरणें त्यांना जड जाईल; व

कळी उमलली, जों न पावली पूर्ण विकासाला,
अदयकराचा तोंच तिजवरी पडला कीं घाला !

या विनायक कवीच्या वचनाप्रमाणें वाढ होण्याच्या पूर्वींच स्वर्गलोकींची वाट धरणें त्यांच्या नशिबीं येईल. जर ही ब्यांक ह्या संकटांतून सांवरली, तर आपल्याला निदान चांगलाच फायदा होऊन स्वदेशी धंद्यांना आपत्कालीं हातभार लावल्याचें श्रेयही आपल्या पदरांत अनायासेंच पडेल. या अशा विचारामुळेंच एव्हरी इंडियन्स ब्यांकेला मदत करण्याचें मीं ठरविलें. माझी एक लक्ष वीस हजार

रुपयांची रक्कम मीं हल्लीं दरमहा दोन रुपये व्याजानें त्र्यांकेच्या हवालीं करावी. असें ठरलें. फांसा टाकून पाहिला. अनुकूल डाव पडण्यावर माझी अंबारी अवलंबून राहिली.

त्या रात्रीं निद्रादेवीचें सुख आमच्या नशिबीं लिहिलें नव्हतें. कारण संध्याकाळीं जरी सर्व निरवानिरव करून आम्हीं अंथरुणावर पडलों, तरी पुढल्या घोटाळ्याचा पाया भरण्याला आतांच कोठें आरंभ झाला होता. रात्रीं दहाअकरा वाजण्याच्या सुमारास मला नरसोपंतांनीं हालवून जागा केलें. मी दचकून उभा राहिलों, व त्यांच्याकडे वेड्यासारखा पाहूं लागलों. त्यांची मुद्रा फार भयभीत दिसत होती. त्यांनीं माझ्या प्रश्नाला उत्तर देण्याऐवजीं एक कागद माझ्यापुढें टाकला. कागदावर खालील शब्द लिहिले होते.

" Efforts failed, money can't be raised. Demands over fifty thousands. Every thing over, if can't get the amount by to-morrow morning."

—' उपाय खुंटले. बाजारांत पैसा मिळत नाहीं. पन्नास हजारांवर मागणी. जर उद्यां सकाळच्या आंत रक्कम मिळाली नाहीं, तर सर्व कारभार आटोपला ! '

मी त्या कागदाकडे व कागदाकडून नरसोपंतांकडे पहात होतों. दोघांपैकीं कोणीच कांहीं वेळपर्यंत बोललें नाहीं. शेवटीं नरसोपंत म्हणाले, ' तार रात्रीं नवालाच मिळाली, पण आतांपर्यंत दोन तास गांवांत निरनिराळ्या सावकारांकडे हिंडत होतों. या

वेळीं कर्ज द्यावयास कोणीच कबूल नाहीं. अशा अडचणींत कोणीं कशाच्या भरंवशावर कर्ज द्यावें? मी स्वतांच गेल्यामुळें माझ्या तोंडावर तसें स्पष्ट कोणीं म्हटलें नाहीं, तरी कोणी म्हणाले, सध्यां सवड नाहीं, कोणी म्हणाले कीं, आमची रक्कम आम्हीं नुक्तीच दुसरीकडे गुंतविली, कोणीं तिसरीच कांहीं सबब सांगितली. पण एकंदरींत सर्वांनींच नन्नाचा पाढा वाचला. आतां आपल्याला स्वतांच मुंबईला जाऊन निरवानिरव केली पाहिजे. तूं आपले रुपये या वेळीं कर्जीं द्यावयाला तयार आहेसना? तुला वाटेल तर शेंकडा चार रुपयेदेखील व्याज देऊं. मी तुझा आजपर्यंत पालक होतों, तुझ्या वडिलांच्या मैत्रीकरतां मीं ही जबाबदारी इतके दिवस पतकरली. तुला कळलेंच असेल कीं, मीं आजपर्यंत तुझी इस्टेट अगदीं घरच्याप्रमाणें पाहून विश्वासानें तुझ्या स्वाधीन केली. माझ्या हेतूच्या प्रामाणिकपणाविषयीं तुला संशय येऊं नये, असें माझें मन मला सांगतें. पण मी अजूनही ईश्वराला स्मरून सांगतों कीं, तुझ्या पैशाची राखरांगोळी व्हावी, अशी माझी इच्छा नाहीं. मला जसा दामू तसा तूं. तूं म्हणशील कीं, हे मला बुडत्या ब्यांकेंत पैसा घालायला कां सांगतात? याला माझें एकच उत्तर आहे कीं, आमची ब्यांक सुरक्षित आहे. तुझी एक कवडी-देखील बुडण्याची भीति नाहीं. मात्र आज आमच्याजवळ पैसा नाहीं ही गोष्ट खरी. पैसा व्यापारांत गुंतला आहे, तो आजच मिळणें शक्य नाहीं. बाजारांत पैसा स्वमालादेखील मिळत नाहीं. अशी

वेळ आली असतां आमची स्थिति कितीही बरी असली, तरी इलाज काय? आतां मला–नाहीं आमच्या व्यांकेला–तारणें-मारणें सर्वस्वीं तुझ्या हातांत आहे. मी आज तुझ्यापाशीं तुझा पालक या नात्यानें बोलत नाहीं; तर रायकरांचा प्रिय मित्र, स्वदेशीचा हितेच्छू व एव्हरी इंडियन्स् व्यांकेचा पुरस्कर्ता या नात्यानें बोलत आहें. तुझा माझ्या बोलण्यावर विश्वास नसेल, तर माझें कांहीं म्हणणें नाहीं. आमचें दैव फुटलेंच आहे. पण जर तुझा या तुझ्या पालकावर विश्वास असेल, तर आमच्यावर एवढा उपकार करून आम्हांला कृतार्थ कर.

बोलतां बोलतां नरसोपंताचा गळा दाटून आला, व त्यांच्या डोळ्यांत अश्रु भरून आले. मला राहवेना. मी त्यांच्या पायांवर डोकें ठेविलें व म्हणालों, " पंत, मी तुमच्या दामूसारखा ना? तुम्हींच माझे पैसे आजवर रक्षण केले, व तुम्हीच तें काम पुढेंही करा. मला अजून विद्याभ्यास करावयाचा आहे; तेव्हां हें खटपटीचें काम माझ्या हातून कसें पार पडणार? मी तुम्हांला पैसे पावल्याची, हवी असेल तर, पावती लिहून देतों. तुम्हीं सर्व नोटा घेऊन खुशाल मुंबईला जा. मला येण्याची कांहींच जरूरी नाहीं."

नरसोपंतांना अधिकच गहिंवरून आलें. त्यांनीं मला पोटाशीं धरून पुष्कळ अश्रु टाकले. ते म्हणाले, " नाना! तुझा स्वभाव तुझ्या वडिलांसारखाच उदार व प्रेमळ आहे. आज माझ्या परलोकवासी मित्राची आठवण तूं पुन्हा करून दिलीस. आज या वेळीं माझ्या डोळ्यांतून त्या स्मृतीमुळें दुःखाश्रु वाहण्याचे ऐवजीं आनंदाश्रु

वहात आहेत. आज मी माझ्या मित्राशींच बोलत आहें, असा मला भास होत आहे. " नंतर आकाशाकडेच दृष्टि लावून ते म्हणाले, " ईश्वरा ! मी आज आपल्या सुहृद्दणांतून मोकळा झालों." इतकें बोलून त्यांनीं ईश्वराची कांहीं वेळपर्यंत अनन्यभावें स्तुति केली.

पंतांच्या स्वभावांतील प्रेमळपणा आज माझ्या नजरेस प्रथमच पडला. कारण ते माझे पालक असल्यामुळें मी त्यांना वचकूनच वागत असें. शिवाय वयाच्या अंतरामुळें विशेष संघट्टन होणें अशक्य होतें. हल्लीं मी वयांत आल्यामुळेंच त्यांनीं मला व्यवहाराविषयीं निकाल लावण्यास बोलाविलें होतें. एरवीं मी त्यांच्यापासून दूरदूरच रहात असें. या जगांत इतकीं प्रेमळ व कर्तव्यतत्पर नररत्नें झांकलेलीं असल्यामुळेंच हें जग सुरळित चाललें आहे. नाहींपेक्षां कालाच्या तडाक्यांत त्याच्या ठिकऱ्या उडावयास वेळ लागणार नाहीं, हें मी समजून चुकलों.

बांधाबांध करून मुंबईला जावयास आम्ही एकाच्या गाडीनें निघालों. पंत मध्येंच एका व्यापाऱ्याकडे जाऊन कांहीं रक्कम घेऊन आले. माझ्या प्रॉमिसरी नोटा त्यांनीं गहाण ठेवल्या असाव्यात. मीं येत नाहीं म्हणून पुष्कळ म्हटलें, पण पंतांच्या आग्रहापुढें माझें कांहीं चाललें नाहीं. मला जाणेंच भाग पडलें. आमचा एकाएकीं मुंबईला जाण्याचा बेत ठरल्याचें ऐकून घरांतील मंडळीला आश्चर्य वाटलें. पण निकडीचें काम असल्याबद्दल पंतांनीं निक्षून सांगतांच

सर्वांचीं तोंडें चुप झालीं. आम्हीं बडणेऱ्याला येतांच, "काळजी करूं नका, सर्व व्यवस्था करूनच आम्ही येत आहों," अशा आशयाची तार रायकरांच्या नांवानें दिली, व आम्ही मुंबईच्या गाडींत बसलों. गाडींत असतांना दोघांपैकीं कोणी कांहींच बोलला नाहीं. नरसोपंत ब्यांकेबद्दलच्या विचारांत गुंग होते. मीदेखील एकंदरींत भावी परिस्थितीचीं कल्पनाचित्रें रंगवीत होतों. या चित्रांमध्यें आपल्याला मुंबई येथील राजाबाई टॉवर, राणीचा बगीचा वगैरे रम्य स्थळें पहावयास मिळणार, या विचारांची छाया पडली होती. कांहीं वेळ झोंपेंत व कांहीं या कल्पनांत घालविल्यामुळें वेळ फार कंटाळवाणा वाटला नाहीं. दुपारीं बाराएकाच्या सुमाराला मुंबईचें भव्य स्टेशन दिसूं लागलें.

या वेळीं स्टेशनची भव्य शोभा पहावयास वेळही नव्हता, व मनःस्थितिही अनुकूल नव्हती. उतरल्याबरोबर तावडतोब एक व्हिक्टोरिया भाड्यानें ठरवून आम्हीं ब्यांकेकडे धांव घेतली. ब्यांकेसमोर मला जो देखावा दिसला, तो मीं जन्मांत कधींही विसरणार नाहीं!—ब्यांकेचे दरवाजे मोकळे होते, व दोनतीन कारकून विषण्ण वदनांनीं तेथें उभे होते. लोकांची भोंवतालीं अतोनात गर्दी होती. त्या गर्दींतून वाट करीत आम्ही पुढें जाऊन पहातों तों काय—रा० रायकर मृत होऊन पडले होते! त्यांच्या मृत्यूच्या बाबतींत चवकशी करण्याकरितां पंच बसले होते. ब्यांकेच्या ऑफिसांत कांहीं ठेवीवाले पैशांबद्दल कारकुनांपाशीं निकड लावीत

होते, व कारकून त्यांची समजूत घालतां घालतां बेजार झाले होते. एक सुंदर मुलगी धाय मोकलून रडत होती. मी हा सर्व प्रकार पाहून मटकन खालींच बसलों. नरसोपंतांच्याही डोळ्यांस चटकन पाणी आलें. हा सर्व प्रकार कसा घडला असावा, याचा त्यांना अंदाज होईना. त्यांनीं कारकुनांपाशीं चवकशी केली, तेव्हां त्यांना कळलें कीं, रायकरांनीं सकाळपर्यंत जबाबाची वाट पाहिली, पण तारेचा जबाब येत नाहींसें दिसल्यामुळें त्यांनीं आत्महत्या केला असावी. नरसोपंत चवकशी करीत असतांनाच एक तारवाला लखोटा घेऊन आंत आला. नरसोपंतांनीं ती तार घेऊन फोडली. हीच आम्हीं बडणेऱ्याहून केलेली तार ! कोणत्या कारणानें कां होईना, पण आमची निकडीची तार दुपारपर्यंत रायकरांच्या हातीं पडूं शकली नाहीं; व स्वदेशीचा पुरस्कर्ता आणि हिंदी ब्यांकेचा धाडसी चालक द्रव्यदेवीच्या मदाला बळी पडला ! हीच तार सहा घंटे पूर्वीं आली असती तर—पण ईश्वरी इच्छा तशी कोठें होती ?

नरसोपंतांचें धैर्य फार विलक्षण ! एवढा प्रसंग ओढवला होता, तरी त्यांनीं त्या प्रसंगीं अचाट धैर्य धरून भोंवतालीं गोळा झालेल्या सर्व लोकांना जवळ बोलावलें व त्यांना उद्देशून ते म्हणाले, "या पेढीचा मुख्य चालक व माझा प्रिय मित्र, आज ह्या ब्यांकांच्या दिवाळ्याचा सांथीला निरर्थक बळी पडला. तो तुमच्या-समोर मृत होऊन पडला आहे. थोडासा धीर धरण्यापुरती तुमची सहानुभूति असेल तर बरेंच; नाहींपेक्षां आतांच्या आतां प्रत्ये-

काची पैनपै फेडून टाकण्याची माझी हिंमत आहे. आमची ब्यांक खालावली नाहीं; एवढेंच नव्हे, तर उलट पक्षीं ती जोमांत आहे. ह्या आणीबाणीच्या प्रसंगीं आम्हांला मदत करण्याचें अमरावती येथील एका श्रीमंत व उदार गृहस्थानें कबूल केलें आहे व तो आज येथें आलेलाही आहे. जर दोन तास वाट पाहण्याची तुम्हांला सवड नसेल, तर तुम्ही पेढींतून आपापल्या रकमा आतांच उचला; हे खजिनदार तुम्हांला देतील. पण एवढेंमात्र लक्षांत ठेवा कीं, ज्या गृहस्थानें आजपर्यंत आपल्या या स्वदेशी ब्यांकेला अह-र्निश श्रम घेऊन ऊर्जितावस्थेला आणलें, त्याचें स्मारक करणें म्हणजे त्याची ब्यांक नेटानें व जोमानें पुढें चालविणें होय; व मी हें काम करणार. तुमच्यापैकीं ज्यांना स्वदेशीचें व्रत मान्य असेल ते मला साह्य करतील, असा मला पूर्ण भरंवसा आहे. ज्यांची एवढी तयारी नसेल, त्यांनीं आपल्या रकमा खुशाल घेऊन जाव्या. एवढें बोलून नरसोपंतांनीं एक नोटांचें मेंडोळें कारकुनाच्या अंगावर सर्वांदेखत टाकलें व ते कारकुनाला उद्देशून म्हणाले, " यांत एक लाख रुपयांच्या नोटा आहेत. ज्याला आपली रक्कम हवी असेल त्याला ती देऊन टाका. " नरसोपंत नंतर जवळच अस-लेल्या मुलीजवळ गेले, व ते तिचें सांत्वन करूं लागले. मुलीला अधिकच वाईट वाटलें. ती ओक्साबोक्शीं रडूं लागली. त्यांनीं तिला घरांत पोहोंचविलें, मग आपण बाहेर येऊन सर्व व्यवस्था पाहूं लागले.

पंचांचा निकाल मिळाला. ‘ सोमल खाऊन आत्महत्या ’ असा त्यांचा अभिप्राय पडला. नरसोपंतांनीं मोठ्या मिनतवारीनें मृताची उत्तरक्रिया करण्याकरितां शव आपल्या ताब्यांत घेतलें. थोड्या वेळानें स्मशानयात्रेची सर्व तयारी झाली. नरसोपंत स्मशानाकडे जावयास निघाले. जातांना ते मला म्हणाले, “ नाना ! आंत राय-करांची एकुलती एक मुलगी विमला रडत बसली आहे. मी येई तोंपर्यंत तूं तिला चार गोष्टी सांगून तिचें समाधान कर. ” पंत चालते झाले. विमलेनें आंतून हंबरडा फोडला. ती खिडकींतून सव पहातच होती. मीही दुःखित अंतःकरणानें तिचें सांत्वन करण्याकरितां घरांत निघून गेलों.

---

## प्रकरण आठवें.

### विमला.

विमलेच्या सौंदर्याचें वर्णन करणें माझ्या शक्तीबाहेर आहे. कादंबऱ्यांत व नाटकांत मी नायिकांचीं वर्णनें वाचलीं होतीं, पण त्या प्रत्यक्षरूपानें माझ्यापुढें कधींच अवतीर्ण झाल्या नव्हत्या ! मीं आजपर्यंत ज्या स्त्रिया पाहिल्या होत्या, त्या सगळ्यांत सौंदर्याच्या दृष्टीनें विमलेचाच पहिला नंबर लागला असता. ते रेखलेले अवयव, ते सुंदरनेत्र, तें विस्तीर्ण कपाळ, तो केतकीचा रंग—अहाहा ! सौंदर्याच्या त्या भिन्न अंगांनीं मला अगदीं वेडा केलें. सौंदर्याला मनुष्य भुलतो, असें मी आजपर्यंत नुसता ऐकत होतों.

पण आज त्याचा पुरताच मला अनुभव आला. पहिली दृष्टादृष्ट होतांच उद्भवणारें प्रेम ( Love at first sight. ), ही निवळ कविकल्पना, अशी माझी भ्रामक समजूत होती; पण त्या भ्रमाचें पूर्णपणें निरसन आज झालें. विमलेच्या स्वभावाची, तिच्या शिक्षणाची, तिच्या गृहकृत्यांतील टापटिपीची— सारांश तिची कोणत्याच प्रकारची माहिती मला नव्हती. ती उत्तम गृहिणी, उत्तम माता होईल कीं नाहीं, याबद्दल माझी खात्री पटली नव्हती; तथापि मला तिचें वेड लागलें. मन तिच्याकडे धांव घेऊं लागलें ! तिच्याशिवाय हें सर्व जीवित व्यर्थ होय, असा मनाचा निश्चय होऊं लागला. मी प्रेमाच्या चक्रांत सांपडलों.

तो प्रसंगच तसा प्रेमाला पोषक होता. विमलेसारखी सुंदर षोडशवर्षीय बाला, शिरावरील प्रेमछत्र नाहींसें झाल्यामुळें शोक करीत बसली आहे; हा देखावाच इतका मनोवेधक आहे कीं; चित्रकार त्याचीं चित्रें रंगवितील, कविजन आपल्या काव्यांत त्याची महती गातील व कादंबरीकार हा देखावा वर्णन करण्यास आमची लेखणी समर्थ नाहीं, असें विधान बेधडक ठोकून देतील. विमला रायकरांची एकुलती एक मुलगी. विमलेची आई लहानपणींच वारल्यामुळें तिचें सर्व प्रेम स्वाभाविकपणें तिच्या पित्याच्या ठिकाणीं एकवटलें होतें. रायकरांनीं दुसरें लग्न केलें नाहीं. विमलेला सुशिक्षण देऊन सुखांत ठेवणें हीच त्यांची महत्त्वाकांक्षा

होती, व आजपर्यंत त्यांनीं विमलेला कोणत्याच प्रकारें कमी पडूं दिलें नाहीं. विमलेचा साधारण म्याट्रिकपर्यंत अभ्यास झाला होता. घरीं स्वयंपाकपाणी करण्याकरितां एक वृद्ध बाई रायकरांनीं बाळगली होती. विमलेला आतां घरची अशी हीच बाइ काय ती उरली होती. आजोळापैकीं एका चुलत मामाखेरीज तिला कोणीही नव्हतें; व तोही असाच चंगीभंगी निघाल्यामुळें तिचा आजोळचा संबंध तुटल्यासारखाच होता. रायकरांनाहीं आप्त-बंध कोणी नव्हतें. गृहस्थिति अशी असल्यामुळें, पित्याच्या आकास्मक निधनानें विमलेला अतोनात दुःख व्हावें, यांत नवल वाटण्याजोगें कांहींच नव्हतें; हें जग सोडते वेळीं रा० रायकरांच्या अंतःकरणालादेखील दारुण यातना झाल्या असतील. एकुलती एक मुलगी जगाच्या आपत्तींशीं तोंड देण्यास उघडी टाकून जाणें त्यांच्या जिवावरच आलें असेल. पण **अब्रूला प्यार मानणाऱ्या माणसाचें मनोधैर्य अचाट असतें.** आप्तइष्टमित्र, कलत्रपुत्र, हीं नातीं आपल्यासारख्या साध्या मनुष्याला संसारांत बांधून टाकतील, पण बुद्धासारख्याला त्या बंधनांची काय पर्वा! जिवाची किंमत कचेरींतील कारकुनांनीं ओळखावी, व बोटाला चाकू लागल्याबरोबर चुना भरण्यास धावून जावें; पण सेनापति शीर तुटल्यावरदेखील प्रसंगीं नुसत्या कबंधानेंच शत्रूंना कंठस्नान घालील! कसेंही असो. पोरीला पोरकी करून, रायकरांनीं स्वतांचीच अब्रू वांचविण्याकरितां स्वर्गाची वाट धरली एवढें खरें. जन त्यांना निंदो

कीं वंदो. दोन मार्गांपैकीं त्यांच्या दृष्टीला सरळ तो मार्ग त्यांनीं पतकरला.

विमला पोरकी झाली. आपलें असें म्हणायला तिला कोणीच उरलें नाहीं. स्वयंपाकाची बाई एक होती, पण ती काय, शाळुसोबतीण. आज नाहीं उद्यां ती जाणारच. ती विमलेचें समाधान करीत होती व डोळ्यांला पदर लावून रडतही होती. पण तें रडणें अंतःकरणाला पीळ पडल्यामुळें निघालेलें नव्हतें. विमलेची समजूत करण्याकरितां मी घरांत गेलों. रायकरांचें बिऱ्हाड व ब्यांक एकाच इमारतींत होतीं. पुढल्या बाजूला ब्यांकेचें ऑफीस असून मागल्या बाजूला रायकरांची रहाण्याची जागा असे. विमला करुणस्वरानें एकसारखा आक्रोश करीत होती. मी आंत गेलों खरा, पण तिचें समाधान कसें करावें, हा माझ्यापुढें प्रश्नच येऊन पडला. मला पुष्कळ बोलावेंसें वाटलें, पण शब्दच बाहेर फुटेना. तिच्या मोहक मुद्रेवर दुःखाची छाया पडली असल्यामुळें तिला त्या विरोधामुळें अधिकच शोभा आली होती. डोळ्यांतून वाहणारे अश्रुबिंदु गालांवरून खालीं ओघळत असल्यामुळें तिच्या गळ्याला मौक्तिकमाला घातल्याची शोभा आली होती. ते पाणीदार नेत्र रडून रडून लाल झाल्यामुळें त्यांच्यांतून तिच्या मूळच्याच गुलाबी कपोलांवर लालिमा पाझरत आहे कीं काय, असें वाटे ! तें दृश्यच इतकें मनोहर होतें कीं, मनुष्याच्या वृत्ति प्रेमानें व करुणरसानें उचंबळून जात. ती करुणेची प्रेमळ व सुंदर मूर्ति पाहून अंतःकरणांत

प्रेमाचा ओघ उचंबळूं लागे, व त्या मूर्तीला आपल्या हृदयाशीं धरून तिचें सांत्वन करावें, प्रेमाभावीं सुकलेल्या त्या नाजुक वेलींत प्रीतीची फुंकर भरून तिच्यांत नवीन जीवन उत्पन्न करावें, व दुःखानें चंचल झालेल्या नेत्रांना प्रेमाची चंचलता प्राप्त करून द्यावी, अशी अनिवार लालसा मनांत उत्पन्न होई. निदान माझ्या मनाची तरी अशीच स्थिति झाली. मी प्रेमानें बेहोष झालों. मला तुम्ही वेडा म्हणा—मूर्ख म्हणा; विमलेला सुख देणें, तिच्या जीवन-पथांतील कंटक दूर करून त्यावर गुलाबाच्या फुलांचा सडा घालणें, हेंच आयुष्यांतील आपलें कर्तव्य, व आपण आयुष्यांत निदान एव-ढी गोष्ट केली तरी आपलें मन सदोदित प्रफुल्ल राहील, अशी नवीन भावना माझ्या हृदयांत जागृत झाली ! मी किती वेळ तरी तसाच तिच्याकडे पहात उभा राहिलों !

माझ्या येण्याची विमलेला जाणीवच नव्हती. ती आपल्या शो-कांत निमग्न होती. मीही तिला आपल्या आगमाची जाणीव करून देण्याच्या भानगडींत पडलों नाहीं. तिच्याकडे एखाद्या वेड्याप्रमाणें टक लावून पहाण्यांत मी आपला वेळ खर्च करूं लागलों. विमला रडून रडून अगदीं थकून गेली. शेवटीं तिनें निराश होऊन एकदम एक उसासा सोडला. तिनें ईश्वराला आळविण्याकरितां म्हणून म्हणा, अथवा भग्न हृदयाला आशेचा आधार मिळावा म्हणून म्हणा, ‘देवा !’ असें म्हणून वर पाहिलें ! ती तशीच वर पहात होती. तिच्या नेत्रांतून अश्रुधारा वहात होत्या. कांहीं वेळ ती तशीच शांत होती.

शेवटीं तिच्याशीं भाषणाची सुरवात करण्याला ही संधी बरी आहे असें वाटून मीं म्हटलें, " विमलाबाई ! ईश्वर सर्वांचा पाठिराखा आहे. तो तुम्हांला...."

माझें वाक्य पुरतें झालेंच नाहीं. हा अनोळखी शब्द ऐकतांच विमला दचकून उभी राहिली. आपला पदर वगैरे सांवरून तिनें मला ' कोण ? ' असें विचारलें. मी म्हटल, " विमलाताई, मी तुमचा हितचिंतक आहें असें समजा. आपल्या वडिलांच्या तारेप्रमाणें त्यांना मदत करण्याला, मी काल रात्रीं नरसोपंतांबरोबर उमरावतीहून आलों. पण हाय ! आमचें येणें फार उशीरां झालें. आमचा इलाजच नव्हता. मनानें आम्हीं काल रात्रींच मुंबई गांठली. पण शरीराला आगगाडीवर अवलंबून राहवें लागलें. विमलाताई ! तुम्हांला जी मदत हवी असेल ती मागा. मी आपला प्राण वेंचूनदेखील आपलें संकट दूर करीन. मी आपल्या वडिलांकरितां धावून आलों. त्यांची माझी मागें गाडींत भेट झाली होती. त्यानंतर नाशिबानें हें लिहून ठेविलें होतें. " मी कांहीं वेळ गप बसलों. विमलाही स्तब्ध होती. थोड्या वेळानें ती एकदम भानावर येऊन आंत स्वयंपाकघरांत जावयास निघाली. तेव्हां मीं म्हटलें, " विमलाताई ! तुम्ही मला परका लेखूं नका, तुम्ही इथेंच बसा." असें म्हणून मी तिला अतिशय आग्रहानें एका खुर्चीवर बसविलें. विमलेनें पुष्कळ आढेवेढे घेतले, पण अखेर माझ्या आग्रहामुळें तिची लज्जा दबत चालली व ती बसली. विमला सुशि-

क्षित नसतीच, तर या फाजील लज्जेला ती बळी पडली असती. मीही तिच्याजवळच दुसऱ्या एका खुर्चीवर जाऊन बसलों.

स्वयंपाकीण बाईंनीं इतक्यांत मला जेवणाबद्दल विचारलें. मीं नकोच म्हटलें. तेव्हां विमला म्हणाली, “ हें काय ? तुम्ही आतांच परभारें स्टेशनावरून आलां ना? तुम्हांला भूक लागली असेल.” एवढें बोलून तिनें बाईंना स्वयंपाक करण्यास सांगितलें. तेव्हां मींच बाईंना म्हटलें, “स्वयंपाकाचें सध्यां राहूं द्या. नरसोपंत आल्यावर सर्वजण मिळून बरोबरच जेवूं. मला थोडासा चहामात्र करून द्या.” बाई चहा करण्याकरितां निघून गेल्या. विमला आतां मोठ्यानें रडत नव्हती. पण तिच्या नेत्रांतून मूकरोदनमात्र जोरानें चाललें होतें. ती एकसारखे उसाशांवर उसासे टाकीत होती. तिच्या अंतःकरणाला किती पीळ पडला होता, हें तिच्या मुद्रेवरून स्पष्ट कळत होतें. तिचें मन या विषया-कडून थोडेंसें तरी वळून, तिला आपल्या दुःखाचा विरंगुळा पडावा म्हणून मी म्हटलें, “ विमलाताई ! मीही तुमच्यासारखाच अ-भागी व दुःखी आहें. मला माझें असें म्हणावयाला कोणीही नाहीं.” यावर ती चपापून म्हणाली, “ मग नरसोपंत आपले कोण? ” या प्रश्नावर मीं आपली सर्व दुःखकहाणी तिला हळुहळू निवेदन केली. स्त्रीचें हृदय जात्याच कोमल, त्यामुळें विमलेचें मन फारच द्रवलें. तिच्या नेत्रांतून टपटप अश्रु गळूं लागले. हे अश्रु माझ्याबद्दल उत्पन्न झालेल्या सहानुभूतीचे दर्शक होते. त्यांच्यापा-

सून तिला कोणताच अपाय होण्यासारखा नव्हता. माझ्या आजीच्या मृत्यूचें वर्तमान तिनें ऐकलें, तेव्हां तर ती फारच गहिंवरली व म्हणाली, " एकूण, इतका पैसा असूनदेखील तुम्हीं सुखी नाहीं.!" मीं म्हटलें, " विमलाताई ! या जगांत पैशानें सुख विकत मिळत नाहीं. नाहीं तर तें प्रत्येकानें विकत घेतलें असतें. खरें सुख प्रेमापासून उत्पन्न होतें. ह्या जगांत आपणावर प्रेम करणारें कोणी तरी मनुष्य आहे, ह्या कल्पनेनेंच जो आनंद होतो, त्याची सर दुसऱ्या कोणत्याही आनंदाला येणार नाहीं. मग त्या प्रेमाचा प्रत्यक्ष अनुभव आल्यावर होणारें सुख किती अवर्णनीय असेल ! मला अभाग्याला ती कल्पना कशी येणार? मातृसुखाची स्मृतिदेखील नाहीं, पितृप्रेमाची स्मृतिदेखील अगदीं अंधुक झाली आहे. आजीचा प्रेमळ सहवास बरेच दिवस होता, तोही दुर्दैवानें तुटला." इतकें बोलून मी स्तब्ध राहिलों. समदुःखीपणाच्या कल्पनेनें विमलेचें मन माझ्याकडे ओढूं लागलें. तिनें मला माझी पुरती हकीकत विचारली, व आपण येथें कसे आलां, म्हणून प्रश्न केला. मी हळूहळू, मी वयांत आल्याची हकीकत, नरसोपंतांची इच्छा व तदनुसार एव्हंगी इंडियन्स् ब्यांकेला मदत करण्याचा निश्चय वगैरे सर्व गोष्टी तिला इत्थंभूत कळविल्या. विमलेची सहानुभूति अधिकच वाढली व ती मला म्हणाली, " तर मग तुम्ही आमची ब्यांक बुडूं देणार नाहीं! बाबांना हें पाहून स्वर्गांतदेखील आनंद वाटेल. त्यांचें या ब्यांकेवर अतिशय प्रेम होतें व तेंच अखेर त्यांच्या मृत्यूला कारण

झालें!" विमलेच्या नेत्रांत पुन्हा एकदां अश्रूंनीं ठाणें दिलें. हें पाहून मी म्हणालों, " विमलाताई ! आतां वारंवार खेद करून काय उपयोग? व्यांक वांचविण्याची आम्ही आमच्याकडून शक्य ती खटपट करणार आहों. मला वाईट वाटतें तें एवढेंच कीं, दुर्दैवानें आपला डाव पुरा साधला. आम्हीं काल रात्रीं केलेली निकडीची (Urgent) तारदेखील त्यांना वेळेवर पोहोंचली नाहीं. ती आमच्या मागोमाग वाट काढीत आली. दैवी इच्छेपुढें मानवी यत्न व्यर्थ होत, हेंमात्र माझ्या पूर्णपणें अनुभवास आलें. नाहीं तर हा प्रसंग ओढवण्याचें कांहीं एक कारण नव्हतें." विमला म्हणाली, " बाबांनीं थोडा वेळ वाट पाहिली असती तर–पण नाहीं. तसें कुठून घडून येणार ? माझें नशीबच फुटावयाचें होतें, त्याला कोण काय करणार ? "

कांहीं वेळपर्यंत आम्ही स्तब्ध होतों. इतक्यांत बाईंनीं टेबलावर चहा आणून ठेवला. मीं विमलेला चहा घेण्याचा पुष्कळ आग्रह केला व शेवटीं तुम्हीं प्यायल्याशिवाय मी पिणार नाहीं, असें तिला बजावलें; तेव्हां ती माझ्या म्हणण्याला कबूल झाली. चहा घेणें झाल्यावर मीं विमलेला, एकंदर प्रकार कसा घडून आला, हें सविस्तरपणें सांगण्यास बिनविलें. मीं म्हटलें, " तें सांगण्यापासून तुम्हांला दुःख होणार असेल, तर माझा तसा अगदीं आग्रह नाहीं." विमला सांगूं लागली, " काल सायंकाळपासूनच बाबा उदास झाले. आज दोन महिने त्यांच्या जिवाला अगदीं

स्वास्थ्य नव्हतें. दिवसभर एकसारखे हिंडत, व रात्रीं बारा वाजे-पर्यंत हिशोब करीत बसत. झोंपेंतदेखील त्यांना हींच स्वप्नें पडत; व माझ्या ब्यांकेचें आतां कसें होणार, असें ओरडून जागे होत. काल संध्याकाळीं ते आंत आले, तेव्हां माझ्याजवळ मुळींच बोलले नाहींत. मला फार चमत्कारिक वाटलें. कारण, आज इतके दिवस ते कामांत गढून गेले होते, तरी संध्याकाळीं माझ्याशीं बोलल्या-शिवाय एक दिवसही सुना गेला नाहीं. मीं, ‘ कसें काय बाबा? ’ म्हणून विचारलें कीं ते म्हणत, ‘ विमल! आपल्या ब्यांकेला मुळींच धोका नाहीं. हे आणीबाणीचे दिवस कसे तरी पार पडावयाचे आहेत. आपण कर्तव्य करूं; यश देणारा परमेश्वर आहे. ’ काल संध्याकाळींमात्र ते मुळींच बोलले नाहींत. मी त्यांच्याजवळ गेल्यें तेव्हां ते म्हणाले, ‘ विमे, ईश्वराच्या मनांत काय आहे तें कांहीं कळत नाहीं!’ ते तसेच बाहेर गेले. मला वाटतें, ते तुम्हाला तार देण्याकरितां बाहेर गेले असावे. परत आल्यावर पहाटे पांच वाजे-पर्यंत ते आपल्या खोलींत दार लावून बसले होते. मला रात्रीं दहा वाजतांच त्यांनीं निजावयास सांगितलें. सकाळीं शौचमुखमार्जना-नंतर त्यांनीं तारेची चौकशी केली, तेव्हां उत्तर न आल्याचें पट्टे-वाल्यांनीं सांगितलें. सात वाजतां ते माझ्याजवळ आले व माझ्या केंसांवरून हात फिरवून मला जवळ घेऊन म्हणाले, “ विमे! तूं....” पुढें त्यांना बोलवलें नाहीं. मी रडूं लागल्यें, असें पाहून त्यांनीं माझें समाधान केलें, व ते म्हणाले, ‘ तूं एवढी शिकलेली असून

उगीचच्या उगीच रडत बसतेस, तेव्हां तुला काय म्हणावें! मी आपल्या खोलींत लिहीत बसतों. मला दहा वाजतां बोलवावयास ये.' ते गेले ते गेलेच ! मी दहा वाजतां त्यांच्या खोलींत गेल्यें तों हा प्रकार ! मी भीतीनें ओरडल्यें. चाकरमाणसें जागीं झालीं. ब्यांकेचे कारकूनही इतक्यांत आले. पुढें मला—...."

विमलेनें दाबून ठेवलेला दुःखाचा उमाळा आतां अधिकच जोरानें बाहेर पडला. मी तिचें समाधान करीत होतों. " विमलाताई ! तुम्ही मला आपला मित्र समजा. माझा प्राण गेला तरी कबूल; पण मी तुम्हांला कोणताच त्रास पडूं देणार नाहीं. तुम्ही कुठेही रहा. तुमच्यासाठीं कोणतीच काळजी करण्याचें तुम्हांला कारण नाहीं. तुम्हांला वाटत असेल तर हायस्कुलांत जाऊं लागा. झाली गोष्ट तुमच्या दुःखानें परत येणार नाहीं." याप्रमाणें बोलून मी तिचें समाधान करीत होतों. तिचे अश्रु कमी होईनात. त्या सुंदर नेत्रांत अश्रुधारा उत्पन्न झालेल्या पहातांच मला कसेंसेंच झालें. मी तिच्याजवळ जाऊन उभा राहिलों व आपल्या हातरुमालानें तिचे डोळे पुसले. माझ्या हातून थोडेंसें धाष्टर्य झालें, हें खरें; पण तिच्या करुणास्पद स्थितीचा माझ्या मनावर इतका परिणाम झाला कीं, मला, हें बरें दिसेल कीं नाहीं, याचा विचार राहिला नाहीं ! त्या स्पर्शानें माझें शरीर रोमांचित झालें. मीं म्हटलें, ' विमले !.... '

इतक्यांत पंत आंत आले. त्यांना पहातांच ' काका ' म्हणून विमलेनें हंबरडा फोडला. सर्वांच्याच डोळ्यांना पाणी आलें. आम्हीं

किती वेळ तरी तसेच बसलों होतों. अश्रु आमच्या ओष्ठांचें कार्य करीत होते. ' स्वयंपाक तयार झाला ' या बाईच्या निरोपानें आम्हीं जागृत झालों !

---

# प्रकरण नववें.

## स्थिरस्थावर.

नरसोपंतांच्या भाषणानें सर्व ठेवीवाल्यांना धीर आला. कित्येकांना आपल्या हांवरेपणाची लाजही वाटली. नरसोपंतांच्या भाषणाबरोबर त्या एक लक्ष रुपयांच्या नोटांचें पुडकें पुढें पडल्यामुळें हांवरेपणावर विरजण पडलें ! ब्यांक चांगली आहे, अशी बऱ्याच जणांची खात्री झाली. कांहीं जणांनीं आपापल्या ठेवी परत मागितल्या. त्या ज्यांच्या त्यांना व्यवस्थितपणें परत मिळाल्या. प्रत्येक ठेवीदारांची रक्कम त्याला परत मिळतांच ब्यांकेची पत दर मिनिटाला वाढत चालली. कांहीं जणांनीं आपल्या ठेवी परत न नेतां तशीच घरची वाट धरली. स्वदेशीला हातभार लावणें असेल, तर प्रत्यक्ष मदत न केली, तरी निदान धिमेपणा धरला पाहिजे, हें नरसोपंतांचें बोलणें पुष्कळांना मान्य झालें. ज्या लोकांनीं आपल्या ठेवी काढून नेल्या, तेदेखील ब्यांकेची सर्वत्र स्तुतिच करूं लागले. वऱ्हाडांतील एक कोटयाधीश सावकार, एव्हरी इंडियन्स् ब्यांकेला मदत करण्यास आला असून, ती ब्यांक आतां सांवरणार, अशी कंडी या लोकांनीं गांवांत उठविली. संध्याकाळीं डायरेक्टर लोकांची

सभा झाली, तेव्हां त्यांच्या तोंडूनच बाजारांत अशी बातमी उठल्या-बद्दल आम्हांस कळलें. पराचा कावळा कसा होतो याचा आम्हांला प्रत्यय आला.

संध्याकाळीं नरसोपंतांनीं कांहीं डायरेक्टर लोकांची सभा भरविली.याच बैठकींत व्यांक पुढें चालू ठेवावी किंवा नाहीं, याबद्दल बरीच चर्चा झाली. व्यांकेचा व्यवहार किती चोख आहे, हें नरसोपंतांनीं कागदपत्रांवरून मंडळीच्या नजरेस आणलें. प्रत्येकानें आपल्याकडून चवकशी केली व कसोशीनें वहीखात्याची तपासणी केली; परंतु लबाडी कोठेंच कोणाला आढळली नाहीं. रायकरांच्या नेकीविषयीं प्रथमपासूनच प्रसिद्धि होती, पण आतां त्या लौकिकाला दुजोरा मिळाला. असला चांगला व कर्तबगारीचा मनुष्य आपल्यांतून गेला, याबद्दल प्रत्येक जण हळहळूं लागला. झाली गोष्ट ती झाली. पण आतां पुढें काय? असा प्रश्न मंडळींना नरसोपंतांनीं विचारला. तेव्हां व्यांक पुढें चालवावी, असेंच बहुतेकांचें मत पडलें. मीं केलेल्या मदतीबद्दल डायरेक्टर लोकांनीं माझे आभार मानले. नंतर नरसोपंतांनीं असा एक मुद्दा काढला कीं, प्रत्येक डायरेक्टरानें निदान वीस हजार रुपयांची मदत, या प्रसंगीं व्यांकेला कर्ज म्हणून करावी. डायरेक्टर मंडळीपैकीं बहुतेक सर्व सधन असल्यामुळें एवढी मदत करणें कोणालाच जड जाणार नाहीं, असें ते म्हणाले. याशिवाय ज्यांच्याजवळ आज अगदीं पैसा नसेल त्यांनीं आपल्या खासगी पतीवर रकमा कर्जाऊ

काढून त्या ब्यांकेच्या स्वाधीन कराव्या. आज ब्यांकेची पत बाजारांत मुळींच नाहीं. ती वाढविणें हें आपलें पवित्र कर्तव्य होय, असें ते म्हणाले. दहा डायरेक्टर या तडजोडीला कबूल झाले. याप्रमाणें साडेतीन लाखांची सरासरी सोय होऊन ब्यांक पुन्हा सुरळित चालणार, असा रंग दिसूं लागला. रायकरांचे जागीं ब्यांकेचे व्यवस्थापक डायरेक्टर कोणीं व्हावें, याबद्दल बरीच भवति न भवति झाली. अखेर सर्वानुमतें हें काम नरसोपंतांनींच आपल्या अंगावर घ्यावें असें ठरलें. हा ठराव मला फारच आवडला. कारण, नरसोपंतांइतकी ब्यांकेच्या कामाकाजाची माहिती व ब्यांकेविषयीं कळकळ इतरांत क्वचितच सांपडली असती. पण नरसोपंत हें काम पत्करतील किंवा नाहीं, याबद्दल वानवाच होती. कारण वऱ्हाडांतील प्राप्तीची व बहुमानाची वकिली सोडून देऊन, या अनिश्चित पण जबाबदारीच्या, अतिश्रमाच्या व त्या मानानें कमी मिळकतीच्या जागवर ते आरूढ होतील, ही कल्पनाच मला संभवनीय वाटेना. पण माझ्या शंकेचें लवकरच निराकरण झालें. स्वतां नरसोपंतांनींच आपली संमति दर्शविली. नरसोपंत म्यानेजिंग डायरेक्टर झाले! याला म्हणावें स्वार्थत्याग!

रात्रीं बाराच्या सुमाराला डायरेक्टर मंडळीची सभा संपली. मीं पंतांना म्हटलें, "आपण आपल्या स्वार्थत्यागानें सर्वांना खालीं मान घालावयास लावलें, यांत शंका नाहीं. बोलतांना प्रत्येक मनुष्य देशभक्त व स्वार्थत्यागी असतो; पण तीच कृति कराव-

याची वेळ आली म्हणजे त्याच्या अडचणी सुरू होतात; व त्या अडचणी तरी काय ? तर माझ्या मामेसासूला हें आवडणार नाहीं, आमच्या घरच्या मंडळींना वकिलीणबाई म्हणवून घेण्याची फार हौस ! आपलें खरोखरच अभिनंदन केलें पाहिजे व मी तें मनापासून करतोंही. " नरसोपंत हंसून म्हणाले, " कोणींही हेंच केलें असतें. तुझ्या अननुभवी मनाला माझें करणें थोर दिसत असेल, पण तें अगदींच साधारण आहे. चल, आपण जाऊं; झोंपेची वेळ टळून गेली. कांहीं तरी झोंप घेणें इष्ट आहे. कारण उद्यां कामाचा बोजा अतोनात वाढेल. "

माझ्या मनांत पंतांच्या स्वार्थत्यागाविषयींचे विचार घोळत होते. मुंबईकडच्या मंडळींना ह्यांत कांहींच स्वार्थत्याग वाटणार नाहीं हें मी जाणून आहें. कारण त्यांना वकिलीच्या धंद्यापेक्षां ब्यांकेच्या म्यानेजरचा धंदा अधिक फायदेशीर वाटेल, व ते कदाचित् पंतांच्या कृत्याला अतिलोभ हेंच नांव देतील. पण वऱ्हाडांत वकिली कशी काय चालते, हें ज्यांना ज्यांना ठाऊक असेल, त्यांना पंतांचें खात्रीनें कौतुकच वाटेल. शिवाय नरसोपंत म्हणजे अमरावतींत जुन्या प्रसिद्ध वकिलांत मोडत असत, व त्यांची मिळकतसुद्धां बरीच होती. आजमितीला त्यांच्याजवळ फारशी शिल्लक नव्हती, कारण त्यांनीं आपली बहुतेक रकम, एज्हरी इंडियन्स् ब्यांकेंत पूर्वींच गुंतविली होती. शिवाय गेल्या महिन्यांत ब्यांकेवर ज्या मागण्या आल्या, त्या पुरविण्याकरितां त्यांनीं आपली सर्व

शिल्लक रा० रायकरांच्या आग्रहावरून ब्यांकेला कर्जाऊ दिली होती. पंतांचें ह्या ब्यांकेवर फार प्रेम होतें व त्या प्रेमाला अनुसरूनच ते हा सर्व स्वार्थत्याग करण्यास तयार झाले. प्रेमासाठीं, कोण, कोणता स्वार्थत्याग करण्यास तयार होणार नाहीं ?

सकाळीं रायकरांच्या खोलींतील कागदपत्र चाळतांना दोन मोहोरबंद पाकिटें त्यांत मिळालीं. एक पंतांच्या नांवचें होतें. पंतांनीं तें टरकन फाडून वाचण्याकरितां घेतलें. वाचतां वाचतां त्यांचा चेहरा म्लान झाला. वाचणें झाल्यावर त्यांनीं एक उसासा टाकला. नंतर मला त्यांनीं तें पत्र व दुसरें पाकीट बंद होतें तें अशीं दोन्ही पत्रें विमलेला नेऊन देण्यास सांगितलें. त्यांच्या सांगण्याप्रमाणें मीं तीं दोन्ही पत्रें विमलेला नेऊन दिलीं. विमलेनें प्रथम आपल्या नांवचें पाकिट फोडून आंतील मजकूर वाचला. नंतर तिनें त्या दुसऱ्या पत्रावरही आपली नजर फिरविली. ती एकसारखी रडूं लागली. मीं तिला पुष्कळ समजावून पाहिलें, पण व्यर्थ. त्या पत्रांत काय लिहिलें आहे, म्हणून मीं विचारलें; तरीही ती स्तब्ध. माझ्या प्रश्नाचें उत्तर मला मिळालें नाहीं. मी तसाच तेथें उभा होतों. विमला एकसारखी शोक करीत होती. अखेर मीं म्हटलें, " तुम्हीं मला आपला मित्र नाहींना समजत ? " एवढें म्हणतांच विमला जरा भानावर आली, व दोन्ही पत्रें माझ्यापुढें टाकून मला म्हणाली, " तुम्हीच वाचा तीं. " विमला आंतल्या खोलींत निघून गेली.

मीं तीं पत्रें वाचून पाहिलीं. मलादेखील फार वाईट वाटलें. मीं म्हटलें, "छे! विमलेला अशी वेळ येण्याचें कांहींच कारण नाहीं. त्या स्वर्गीय रमणीवर कोण प्रेम करणार नाहीं? या अभाग्यावर तिचें प्रेम जडणें जरी अशक्य असलें, किंवा तिचें दुसऱ्यावर जरी प्रेम जडलें, तरी देखील तिच्यासाठीं मी काय वाटेल तें करीन; पण तिला सुखांत ठेवीन. खऱ्या प्रेमाची हीच व्याख्या! आपल्या प्रेमाची फेड न झाली, तर तें नष्ट कसें होतें, हें मला कळत नाहीं. मी कादंबऱ्यांतून, नाटकांतून व गोष्टींतून प्रेमाचें द्वेषांत रूपांतर झाल्याचें अनेक वेळा वाचलें आहे. पण तें खरें प्रेमच नव्हे. जें प्रेम सदा अविरल राहील व कोणत्याही बाह्य गोष्टींनीं ज्याच्या तीव्रतेवर परिणाम होणार नाहीं, तेंच खरें व सात्त्विक प्रेम. असें नसेल तर तें प्रेम व्यावहारिक होय! विमल! तुला आपल्या चारितार्थासाठीं दगदग करण्याची मुळींच जरूरी नाहीं. निदान माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत तरी–" माझें आत्मगत भाषण–भाषग कसलें? विचारच ते!–असेंच एकसारखें चाललें होतें. मीं किती वेळ तरी तसाच निश्चल उभा होतों. त्या विचारांत माझी तंद्री लागली होती. विमल आंतून केव्हां आली हें मला कळलें नाहीं. मी, "अशक्य! अशक्य!! माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत तरी हा प्रकार मी होऊं देणार नाहीं!—" असें पुटपुटत होतों, इतक्यांत, 'काय अशक्य?' असे मधुर शब्द माझ्या कर्णरध्रांत प्रविष्ट झाले. मी तत्क्षणीं भानावर आलों व समोर पहातों तों विमला उभी!

बिमला पुढें म्हणाली, "पत्रें झालीं का वाचून? एवढा विचार कशाचा चालला होता? मी केव्हांपासून पहात्यें आहें." मीं म्हटलें, "दुसरा कसला? तुमच्याबद्दलचा." यावर ती बालिका म्हणाली, "या अभागिनबिद्दल इतकें वाईट वाटून घ्यावयास नको. मी एकटी दुःखी आहें ती पुरे. माझ्याकरितां इतरांना दुःख करण्याचें कांहींच कारण नाहीं." माझ्या मनांत कितीक विचार आले. पण ते बोलून दाखविण्याचें धैर्य मला झालें नाहीं. मी एवढेंच बोललों कीं, "दुःख हें सांगून होत नसतें; किंवा होत असलें, तर तें सांगून बंदही होऊं शकत नाहीं. ज्याच्या हृदयाला पीळ पडेल त्यालाच वाईट वाटेल." "तुमच्यावर जे आजपर्यंत प्रसंग आले त्यांनीं तुमचें हृदय फारच कोंवळें झालें आहे." असें म्हणून ती आपल्या खोलींत जाऊन बसली.

मीही त्याच गोष्टीचा विचार करीत एका खुर्चीवर जाऊन बसलों. त्या पत्रांत एवढें काय होतें याबद्दल वाचकांना उत्सुकता लागली असेल. म्हणून मी तीं दोन्हीं पत्रें जशींच्या तशींच खालीं देत आहें.

[ १ ]

प्रिय विमले !

माझें हें तुला शेवटचेंच पत्र. हा माझा अखेरचाच निरोप ! तुला काय लिहूं आणि काय नको असें मला झालें आहे. तुझ्या-

वर माझें अतोनात प्रेम आहे हें सांगावयास मी नको. कारण तें उघड आहे. तुझी आई वारली तेंव्हां तूं सारी नऊ वर्षांची होतीस, पण तुला ती पूर्णपणें आठवत असेल. कारण तुझी बुद्धि, तशीच तुझी स्मरणशक्ति विशेष आहे. तुझ्या आईवरदेखील माझें अतोनात प्रेम होतें, तिचीच तूं प्रतिमा आहेस. सौंदर्यांत व सद्गुणांत तूं अगदीं तिच्यासारखी आहेस. तिच्या मरणानंतर मीं आपलें सर्व प्रेम तुलाच अर्पण केलें, व त्याबद्दल मला वाईट वाटण्याचें कोणतेंच कारण नाहीं. तूं आपल्या सुशिक्षणानें माझें मन भारून टाकलेंस. तुझ्या विवाहाची मीं आजपर्यंत काळजी घेतली नाहीं. याचें कारण हेंच कीं, तुझ्या विरहाचा विचारसुद्धां माझ्या मनाला सहन होईना. तूं गेलीस तर माझें सर्व गृह—फार तर काय, माझें जीवितदेखील स्मशानवत् होईल, अशी भीति मला वाटे. कृपणाच्या ठेव्याप्रमाणें मीं तुला आजपर्यंत जपून ठेविलें!

पण मीं फार मोठी चूक केली, असें मला आतां वाटतें. स्वतांच्या सुखापुढें मीं तुझ्या सौख्याची किंमत जाणली नाहीं. तुझें जर लग्न झालें असतें, तर आपल्या पतीबरोबर तूं आज आनंदांत असतीस, व माझ्या निधनाचें तुला इतकें दुःख झालें नसतें. पण आज मी तुला एकटीला या जगांत सोडून--तुला पोरकी, आश्रयहीन करून—जात आहें. माझा स्वार्थ किती घातकी होता हें मला आज कळलें. पण उपयोग काय? विमे! तूं मला क्षमा कर. या स्वार्थाच्या मुळाशीं तुझ्याविषयींचें उत्कृष्ट प्रेमच होतें.

आतां तुझें कसें होणार ? या जगांतील नानाविध प्रसंगांना तूं एकटी असहाय बालिका कशी तोंड देणार ? पण तुला मीं पुरेसें शिक्षण दिलें आहे. तुझें मन सुसंस्कृत आहे. चांगली वाग. सत्याचाच शेवटीं जय होणार. ईश्वरच तुला सन्मार्ग दाखवील. तुझें पालनपोषण कसें होईल, याविषयीं मला मुळींच काळजी नाहीं. माझे मित्र नरसोपंत वकील यांस मीं लिहिलें आहे. ते तुझी काळजी वहातील. त्यांच्या घरीं तूं रहा. कदाचित् तुझें त्यांच्याशीं जुळलें नाहीं, ( पण तसें होण्याचा प्रसंग येणार नाहीं, कारण ते फार चांगले आहेत. ) तर तुला पुरेसें शिक्षण आहे. त्याच्या जोरावर तुला आपल्या पोटापुरतें मिळवितां येईल. मीं तुला जरी द्रव्य ठेवलें नाहीं, तरी प्रगल्भ मन हेंच तूं आपलें धन समज; ही माझी देणगी बहुमोल आहे असें तुझ्या प्रत्ययास येईल.

तुझ्यावर माझें इतकें प्रेम असतांना मी तुला कां सोडून जात आहें, म्हणून तूं मला विचारशील; पण प्रेमापेक्षां एकच वस्तु या जगांत महत्त्वाची आहे,—अब्रू! स्वदेशी ब्यांक काढावी म्हणून माझी केवढी धडपड ! माझ्या बोलण्यावर विश्वास ठेवून हजारों लोकांनीं आपापल्या रकमा माझ्या स्वाधीन केल्या, व मी आपल्या-कडून अगदीं नेकीनें वागलों. पण ईश्वराच्या मनांत मला यश द्यावयाचें नव्हतें. त्याचीं कारणें काय असतील तीं तोच जाणे! आज अकरा वाजतां, आमच्या ब्यांकेन दिवाळें काढलें, असें मी ठेवीदारांना कोणत्या तोंडानें सांगूं ? मीं कितीही कंठशोष केला,

तरी माझें कोण ऐकतो ? माझ्यावरच तोहोमत येणार. या निंदेच्या भयानें मी आज हें जग सोडून जात आहें.

शिवाय, तुझी आई वर विरहांत झुरत आहे. सात वर्षे माझी वाट पाहून ती अगदीं थकली आहे. तिला जाऊन भेटलें पाहिजे. तिचें मला समाधान केलें पाहिजे. मीं तिचें समाधान केलें नाहीं तर तें कोण करणार ? बिचारी माझ्या वाटेकडे डोळे लावून बसली आहे. विमे ! तूं चांगली निघालीस, सद्गुणी निघालीस, हें मी तिला जाऊन सांगेन. तिला तुझें किती कौतुक वाटेल ! तिचा तुझ्यावर सदा प्रेमाचा आशीर्वादच राहील. माझाही तुला आशीर्वाद आहे. तुझें कधींच वाईट होणार नाहीं. तुझें सदा मंगलच तो प्रभु करील !

विमे ! तूं माझ्यासाठीं फार शोक करूं नकोस. तूं लहान आहेस. तुझे सौख्य भोगण्याचे दिवस पुढें आहेत. मींच तुझें लग्न करून द्यावयास पाहिजे होतें, पण मी आपल्या कर्तव्याला चुकलों. तं स्वतांच आपला पति पसंत कर व विवाह करून सुखी हो. तुला मीं सांगावें असें नाहीं. तुला समजतेंच आहे. तूं पसंती करतांना श्रीमंतीला भुलूं नको; विद्येकडे पहा. रूपाकडे पाहूं नको; शीलाकडे पहा !

विमे ! माझी व तुझ्या आईची अशा दोन तसबिरा एका लाकेटांत बसविल्या आहेत, ती तुला माझी देणगी. ती आपल्याजवळच ठेव. म्हणजे तुझ्या आईची तुला नित्य आठवण होईल.

व तशी होण्याचा तूं प्रयत्नही करशील. मला आतां अधिक लिहवत नाहीं. माझें शरीर थंड होत चाललें आहे. तुझी आई मला एकसारखी हाका मारीत आहे. विमे! अशीर्वाद !

तुझा पिता,

**अंनतराव रायकर.**

[ २ ]

मित्रवर्य रा. रा. नरसोपंत यांसः—

कृ. सा. न. वि. वि. आज सकाळपर्यंत आपल्याकडून तार येईल म्हणून वाट पाहिली, पण अखेर निराशा झाली. आपण तरी काय करणार? आजपर्यंत शक्य तितकी मदत आपण केली, पण जेथें आकाशच फाटलें तेथें तुम्ही ठिगळें तरी किती लावणार? तुम्हीं आजपर्यंत दीडलाख रुपयांची मदत अमरावतीहून केली, हें मी जाणून नाहीं असें समजूं नका. मी आपला अत्यंत आभारी आहें. आपल्याकडून मदत झाली नसती, तर आजचा प्रसंग आठदहा दिवसांपूर्वींच ओढवला असता. पण आपणच मला तेवढें आयुष्य दिलें. या आणीबाणीच्या प्रसंगीं आपलीदेखील अमरावतीच्या बाजारांत पत राहिली नसेल, असें वाटतें. यामुळेंच तारेचें उत्तर आलें नसावें. ईश्वरी इच्छा !

मी पुन्हा एकवार आपल्यास सांगतों कीं, ब्यांकेचा व्यवहार अगदीं चोख आहे व पैशांची मुळींच खोट नाहीं. पण शिल्लक व्यापारांत गुंतली व मागण्या वाढत चालल्या. अशा स्थितींत मी

काय करूं? आज अकरा वाजतां, ब्यांकेनें दिवाळें काढलें, हें सांगण्याचें माझ्या नशिबीं येणार. या अपमानास्पद स्थितीपेक्षां मृत्युच बरा. कारण, मी कितीही उरस्फोड केली, तरी लोक मला त्या कोठवळ्याप्रमाणें लबाडच समजणार! यापेक्षां मरण काय वाईट? पण तुम्हीमात्र ब्यांकेची निरवानिरव करून प्रत्येकाची पैनपै फेडून टाका. एवढें केलें, तरी माझा आत्मा स्वर्गांतून तुम्हांला धन्यवाद देईल.

ही ब्यांक चालावी म्हणून मीं अतोनात खटपट केली, पण व्यर्थ. स्वदेशीचा उत्कर्ष होण्याचा हा काळ दिसत नाहीं. '**आरंभशूराः खलु दाक्षिणात्याः**' या वचनाची प्रचीति, म्हणजे आमची ब्यांक होणार. केवढाले नेपोलीयनी बेत! पण आज त्यांचे मनोरे जमीनदोस्त झाले! जर माझ्या मृत्यूनें ही दिवाळ्यांची देवता संतुष्ट होत असेल, तर मी, आपल्या देहाचें सार्थक झालें, असें समजेन. जर कांहीं अकल्पित चमत्कार घडून ब्यांक चालू राहिली, तर माझा आत्मा स्वर्गांत संतुष्ट होईल.

तुम्ही आतां स्थिरस्थावर करण्याकरितां तरी येथें या. माझी सकाळीं पाठविलेली तार तुम्हांला आतां पोहोंचलीच असेल. तुम्ही येथें आल्यावर ही जीवनरहित ब्यांक तुमच्या नजरेस पडेल. एक महिन्यापूर्वीं ही कल्पना आपण अशक्य कोटींतच लोटली असती.

आतां माझ्या खासगी गोष्टीकडे वळतों. मला आपल्याजवळ एकच भिक्षा मागावयाची आहे. मीं आपल्या ब्यांकेंतून इतर

म्यानेजिंग डायरेक्टरांप्रमाणें महिना हजारबाराशें रुपये पगार कधींच उचलला नाहीं. आपण सर्वांनीं जरी माझा पगार महिना पांचशें रुपयेप्रमाणें ठरविला होता, तरीदेखील मी दोनशें रुपयांपेक्षां एक कवडीदेखील अधिक कोणत्याच महिन्यास घेतली नाहीं. आपली ब्यांक नवीन आहे हें मी जाणून होतों. पुढेंमागें मला अधिक फायदा होईल, अशी मला आशा होती–या प्रसंगाचें स्वप्न मला पडलें नव्हतें !

मुंबईसारख्या ठिकाणीं मला इतमामानें रहावें लागत असल्यामुळें मीं एक पैदेखील शिल्लक टाकली नाहीं. माझी लाडकी विमला अगदींच अनाथ होईल; पण तिला शिक्षण मिळालें असल्यामुळें तिच्या चरितार्थाची मला काळजी नाहीं. ती कसेंही करून आपलें पोट भरील. पण आपल्याला एकच हात जोडून विनंती आहे, ती ही कीं, विमला अगदीं लहान आहे, तिला जगाचा अनुभव नाहीं. तेव्हां तिच्यावर आपली नजर असूं द्यावी. तिचा मार्ग सरळ आहे, याबद्दल आपण आपली खात्री करून घेत जावी. आपण सुज्ञ आहां, आपण हें सर्व कराल हें मी जाणून आहें. पण आंतड्यास प्रेमाचा पीळ पडत असल्यामुळें सांगितल्यावांचून राहवत नाहीं.

मला या जगांत कोणीच नातलग नाहीं, व मित्रही आपल्याशिवाय कोणी नाहीं. यामुळें आपणांला ही तसदी द्यावी लागत आहे. आपण सर्व करालच, ही खात्री बाळगून आपणाला विनंती

केली आहे. माझ्या विमेचा समाचार घ्या. ती अनाथ झाली ! ईश्वर तुमचें कल्याण करील ! कळावें ही विनंती.

आपला,

**अनंतराव रायकर.**

---

## प्रकरण दहावें.

### प्रेमाचा उगम.

प्रेमाचा उगम कोणालाच, कोणत्याच कालीं सांपडणार नाहीं. प्रेम काय, हें कदाचित् कोणी सांगूं शकेल, पण तें कुठे सांपडेल, असें विचारल्यास प्रत्येकाचें उत्तर निरनिराळें येईल. प्रेमाचा ओघ रमणीच्या हृदयांत राहतो हें कविजन सांगतील, पण त्या प्रेमौघाला सुरुवात कुठून झाली हें सांगणें दुरापास्तच आहे. प्रेमाचा प्रवाह रुंद झाल्यावर त्याची मर्यादा ठरवितां येईल. पण निरनिराळ्या दगडांतून झिरपणाऱ्या पाण्याच्या थेंबांना ज्याप्रमाणें नदीचा उगम म्हणतां येणार नाहीं, त्याप्रमाणें प्रत्येक लहान मोठ्या गोष्टींतून उत्पन्न होणाऱ्या सहानुभूतीच्या बिंदूंना प्रेमौघ हें नांव देतां येणार नाहीं. या बिंदूंचा संगम होऊन, हे असंख्य झरे एकत्र होऊन, त्यांची बारीकशी धार वाहूं लागली म्हणजे त्याला नदीचा उगम म्हणतील. त्याचप्रमाणें हे सर्व प्रेमपरिमाणु एकत्र होऊन त्यांना कांहीं तरी दृश्य स्वरूप प्राप्त झालें, म्हणजेच त्याला प्रेमप्रवाह हें नांव देतां येईल.

माझ्या प्रेमाची हीच स्थिति झाली. माझ्या प्रेमाला सुरवात कोठून झाली हेंच माझें मला सांगतां येत येणार नाहीं. विमलेला मीं ज्या दिवशीं प्रथम पाहिलें, त्या दिवशींच प्रेमौघ माझ्या हृदयांत भीषणवेगानें वाहूं लागला; पण तो ओघ बनावयास कोणत्या गोष्टी कारणीभूत झाल्या, हें मला सांगतां येणें अशक्य आहे. तिच्या सौंदर्याला मी मोहित झालों, कीं तिच्या नुकत्याच उमलत असलेल्या बाल्यानें मला वेड लाविलें, किंवा तिच्या करुण क्रंदनानें माझ्या हृदयाला पीळ पडला, अथवा तिच्या पित्यावर असलेलें निर्व्याज प्रेम माझ्या हृदयांत प्रेमोद्भव करण्यास कारणीभूत झालें, यांपैकीं कांहींच खरें किंवा खोटें म्हणून सांगण्यास मी तयार नाहीं. कदाचित् आणखीही इतर कांहीं गोष्टींचा माझ्या मनावर परिणाम झाला असेल. पण हा परिणाम इतक्या थोड्या वेळांत झाला कीं, त्या प्रेमप्रवाहाचीं स्थित्यंतरें पाहण्यास मला वेळच मिळाला नाहीं. विद्युल्लता चपल खरी, पण या प्रेमाच्या चपलत्वापुढें तिलादेखील हात टेंकावे लागतील! हा सर्व परिणाम घडला केव्हां, त्याला किती वेळ लागला, व तो कसा घडला यांपैकीं मी कांहींच सांगूं शकत नाहीं. कारण मी एका प्रकारच्या उन्मादावस्थेंत होतों. मी शुद्धीवर येऊन पाहिलें तों प्रेमौघ तुफान वेगानें माझ्या हृदयांत वहात होता!

विमलेच्या पित्याचें शव घरांत पडलें आहे, त्यानें केलेल्या आत्मयज्ञाची आठवण हृदयांत जागृत आहे, घरावर आलेल्या

भीषण उदासीनतेचें चित्र डोळ्यांपुढें खेळत आहे, करुण क्रंदनाचा ध्वनि कर्णरंध्रावर सारखा आदळत आहे, अशा स्थितींत माझ्या प्रेमाचा उद्भव झाला, हें पाहून मला कित्येक आपमतलबी, हृदय-शून्य, अशीं विशेषणें देतील, हें मी जाणून आहें. पण जो खरा प्रकार घडला, तो मीं वर सांगितला आहे. विमलेच्या दुःखामुळें माझ्या हृदयाला दारुण यातना झाल्या, तिच्या दुःखाचें आपण वांटेकरी व्हावें, असें मला वाटलें, हे अगदीं शपथपुरस्सर खरें आहे. पण त्याबरोबरच माझ्या हृदयांत, तिला आपली करावी, तिचें प्रेम आपण संपादन करावें, तिच्या नष्ट झालेल्या प्रेमाला जागृत करून त्याचे आपण अधिकारी व्हावें, हा विचारदेखील तितक्याच जोरानें खेळत होता! काय असेल तें असो. त्याच दिवशीं, त्या आपत्तींतच माझ्या प्रेमाला आरंभ झाला. कदाचित् आपत्तीच्या भूमींत सहानुभूतीच्या जलानें प्रेमाचें बीज वाढत असेल. माझ्या बीजाचा वृक्षच झाला!

मुंबईला ब्यांकेची व्यवस्था करण्याकरितां आम्हांला पंधरावीस दिवस राहणें भाग होतें. ब्यांक सुरक्षित चालू झाली. रायकरांचा बळी घेतल्यावर द्रव्यदेवता हळुहळू शांत होऊं लागली. बाजार स्थिर होत चालला. डायरेक्टर लोकांच्या आर्थिक मदतीनें आणि नरसोपंतांच्या खटपटीमुळें आमची ब्यांक या भयंकर वादळांतून आपला मार्ग सुरळित काढूं लागली. ब्यांकेवरचें अरिष्ट टळलें. लोकांचा विश्वास जमत चालला. मला आपल्या पैशाची धास्ती उ-

रली नाहीं. नरसोपंत सर्व दिवसभर कामांत असत. कारण या वेळीं जरी दृश्य अरिष्ट टळलें होतें, तरी कोणत्या वेळीं कोणता खडक लागेल, याचा अजमास नव्हता. यामुळें नरसोपंतांना एकाद्या हुशार नावाड्याप्रमाणें सदासर्वकाळ डोळ्यांत तेल घालून पहारा करणें भाग होतें. व ते आपलें कर्तव्य चोख रीतीनें पार पाडीतही होते.

मलामात्र कांहींच काम नव्हतें. मुंबई शहर जरी मीं पाहिलें नव्हतें, तरी तें पहात बसण्याची मला फारशी इच्छा नव्हती. माझा चुंबकमणी एव्हरी इंडियन्स् ब्यांकेच्या मागील भागांत असल्यामुळें,त्याच्याकरितां घरींच राहणें मला आवडत असे. विमलेशीं बोलायला, चालायला, तिचें समाधान करायला माझ्याशिवाय दुसरें कोणीच नव्हतें. ती आतां माझ्याजवळ मन मोकळें करून बोलूं लागली. ती तरी एरवीं काय करणार? स्वयंपाकीण बाईशीं लोकांच्या उठाठेवी करण्यांत काळ घालविणें, विमलेसारख्या सुशिक्षित मुलीला कसें आवडणार? विमलेला दुसऱ्या कोणी मैत्रिणीही नव्हत्या. तिचा स्वभाव जरा संकोची होता. व आजपर्यंत तिला दुसऱ्या कोणाशीं बोलण्याचा प्रसंगही फारसा आला नव्हता. पितापुत्रींचें अत्यंत प्रेम व संघट्टण होतें. यामुळें विमलेचें मन मोकळें करण्याचें ठिकाण म्हणजे तिचा पिता. तें ठिकाण नाहींसें झाल्यामुळें तिला चुकल्यासारखें झालें होतें. अशा स्थितींत आमचा परिचय वाढला, तर त्यांत कांहींच नवल नव्हतें. कारण मीही रिकामा होतों, व तिचें मन रिझविण्यास मी सदैव तत्पर असें.

दिवसामागून दिवस जात चालले. माझें प्रेम एकसारखें वाढूं लागलें. विमलेची प्राप्ति झाली नाहीं, तर आपलें आयुष्य व्यर्थ होय, अशी माझी खात्री झाली. जों जों मी तिच्याविषयीं विचार करीं, तों तों माझें मन वेडें होई. ती अजून आपल्या दुःखांत मग्न होती. तिला तिच्या दुःखाचा विसर पाडण्याचा मी प्रयत्न करीत होतों व मला त्यांत यशही येऊं लागलें होतें. मला कशाचें म्हणा,—काळ हाच दुःखाचा खरा परिहारक आहे, ( Time is the best healer ), व या गोष्टीचें सर्व श्रेय त्या काळालाच दिलें पाहिजे. तरी पण तिच्या दुःखाची तीव्रता फार असल्या-मुळें, निराळे विचार येण्याला तिच्या मनांत जागाच नव्हती. माझी स्थिति अगदींच निराळी होती. ध्यानीं, मनीं, स्वप्नीं, मला सर्वत्र विमलच दिसत होती. माझें मन स्वैर नाचूं लागलें. या पंधरा दिवसांत माझें मन इतकें विमलामय झालें होतें कीं, मीं वसंताला एकदेखील पत्र इतक्या दिवसांत पाठविलें नाहीं. वसंताचें मला एक सणसणीत पत्र आलें, तेव्हां मीं त्याला व्यांकेविषयीं एकंदर हकीगत कळविली. माझ्या मनाच्या स्थितीविषयीं व विमलेविषयीं मीं एक अक्षरदेखील त्या पत्रांत लिहिलें नाहीं. माझ्या वेडामुळें मीं आपल्या मित्राशींदेखील प्रतारणा केली!

रायकरांच्या मृत्यूला तीन वार लोटून गेले. नरसोपंतांच्या खट-पटीमुळें व्यांकेचें तारूं पुन्हा सुरळीत चालूं लागलें. विमलेच्या मुखमंडळाचें दुःखग्रहण सुटूं लागून त्यावर मधून मधून हास्य

चमकूं लागलें. विमलेला माझ्याशीं बोलण्यांत मुळींच संकोच वाटेनासा झाला. अगदीं लहानपणापासून मैत्री असल्याप्रमाणें आमचें संभाषण विविध विषयांवर होऊं लागलें. माझ्याबद्दल विमलेच्या अंतःकरणांत एक प्रकारची सहानुभूति उत्पन्न झाली होती. तिचें समाधान प्रथम मींच केलें, व माझ्या दुःखकहाणीचें तिच्या दुःखकहाणीशीं साम्य निघालें, याच गोष्टी तिच्या मनांत माझ्याविषयीं सहानुभूति उत्पन्न करण्याला कारणीभूत झाल्या असाव्या, असें वाटतें. विमलेशीं संभाषण करीत असतांना मला तिचा बहुश्रुतपणा कळून आला. ती शाळेंत गेली नव्हती, तरी तिचें वाचन व ज्ञान फार दांडगें होतें. टेनिसन, वर्ड्स्वर्थ, स्कॉट, त्याचप्रमाणें कालिदास, मोरोपंत यांच्या ग्रंथांशीं तिचा चांगला परिचय होता. मला आश्चर्य वाटलें. तेव्हां ती म्हणाली, "यांत काय मोठेंसें झालें? बाबा मला रोज शिकवीत. शिवाय बाबा कामांत असले, म्हणजे मी घरीं बसून एकटी काय करणार? तेव्हां करमणुकीकरितां कांहीं तरीं रोज वाचीत असें. पण माझें ज्ञान अगदीं पोपटपंची आहे हो. तुमच्यासारखा स्पष्ट अर्थ करून मला कोणाला कोणतीच गोष्ट सांगतां येणार नाहीं."

माझी सुट्टी संपत आली. लवकरच नागपुर येथें कॉलेजांत जावें लागणार, हें मला स्पष्ट कळून आलें. पण त्यापूर्वीं आपण आपल्या नशिबाचा निवाडा करून घ्यावा, असें माझ्या मनानें ठरविलें. माझ्या मनास तिच्या प्रेमाच्या प्राप्तीशिवाय शांतता मिळ-

णार नाहीं, हें मी समजून चुकलों. तिच्याजवळ हें बोलणें कसें काढावें, याबद्दल मला संकोच वाटत असे. नानाप्रकारचे विचार मनांत येत. आपलें प्रेम स्पष्टपणें बोलून दाखविण्याचा निश्चय माझ्या मनानें कितीदां तरी केला. पण तिच्याशीं बोलत असतां इच्छित शब्द बाहेर येईनात ! मला या वेळीं विवाह करण्याला कोणतीच अडचण नव्हती. पैशानें मी स्वतंत्र होतों. पण हें सर्व तिच्या संमतीवर अवलंबून होतें. पुष्कळ विचार केल्यावर तिची संमति खास मिळणार, अशी माझी खात्री झाली. कारण, तिच्या मनांत माझ्याविषयीं सहानुभूति उत्पन्न झाली होती. त्या सहानुभूतीला प्रेमाचें स्वरूप येणें ही गोष्ट अगदीं स्वाभाविक होती. शिवाय, वयानें, विद्येनें, कुळानें, रूपानें व संपत्तीनें मी तिला अनुरूप असाच होतों. असल्या तऱ्हेच्या गर्विष्ठ विचारांवर व पोकळ अभिमानावर मी आपली इमारत बांधली. इमारतीचा कळस मला दिसूं लागला. मला धैर्य आलें व आज तिला मागणी घालाचयाची असें मीं आपल्या मनाशीं ठरविलें. माझी मागणी मान्य होणार, असा पूर्ण भरंवसा असल्यामुळें मी आज आनंदांत होतों. बोलण्याला सुरवात कशी करावी, हा मला प्रश्नच होता; पण तो योग अनायासें जुळून आला, नव्हे, मींच जुळवून आणला.

संध्याकाळीं मी व विमला नित्याप्रमाणें गोष्टी बोलत बसलों होतों. विमलेनें नुकतेंच ‘ जीवितकर्तव्य ’ ( Use Of Life ) हें पुस्तक वाचून संपविलें होतें. मी तिच्या दृष्टीस पडतांच ती मला

म्हणाली, "तुम्हीं आपलें ध्येय काय ठरविलें आहे? तुम्ही पुढें काय करणार?" मी म्हटलें, "विमल! सध्यां तरी अभ्यास करून बी. ए. एल्. एल्. बी. होणें हेंच माझें ध्येय आहे. सध्यां तरी मला येथपर्यंतच मार्ग दिसत आहे. ज्या दिवशीं मला थोडें फार समजूं लागलें, त्याच दिवशीं मीं आपल्या मनाशीं निश्चय केला कीं, आपण बाबांच्यासारखे वकील होऊं व अमरावतीलाच राहून त्यांच्यासारखा नांवलौकिक मिळवूं. माझा हा निश्चय आहे, पण तो सर्वस्वीं पार पाडणें ईश्वराच्या स्वाधीन आहे." ह्यावर विमला म्हणाली, "विद्यार्थिदशेंतलें हें ध्येय झालें; पण पुढें तुमच्या आयुष्याचें ध्येय कोणतें होणार?" मी म्हणालों, "विमल! मीं इतकाच विचार केला आहे. मला इतकाच मार्ग दिसत आहे. जो मार्ग आपल्याला दिसत नाहीं, त्याविषयीं बरीवाईट कल्पना कशी ठरविणार? बाबांच्या पावलावर पाऊल टाकण्याचा माझा निश्चय आहे!" विमला हंसून थोडीशी चेष्टेच्या स्वरानें म्हणाली, "एकूण आपण वकील होणार तर. मला आजपर्यंत ठाऊक नव्हतें, नाहींपेक्षां मी आपल्याला 'वकीलसाहेब' म्हणूनच हांक मारली असती. एकूण तुम्ही वकीलसाहेब होऊन गाडीघोडा उडवीत चैन करणार तर!"

बोलण्याचा अनुकूल ओघ अनायासेंच आला. मी जरा गंभीर स्वरानें म्हणालों, "पण विमले! वकिलीणबाई असल्याशिवाय वकिलाला काय शोभा? व त्याच्या गाडीघोड्याची कोणाला प्रति-

द्या? विमल! तुझी वकिलीणबाई होण्याची इच्छा आहे का?" आजपर्यंत विमलेला मीं एकेरी नांवानें क्वचित्च संबोधीत असें. आज मीं तिला एकेरीच नांवानें संबोधिलें. माझ्या बोलण्याची निराळीच तऱ्हा पाहून विमलेला थोडा थोडा संशय येऊं लागला होता; व माझ्या शेवटच्या प्रश्नानें तर संशयाला जागाच उरली नाहीं. विमला कांहींच बोलली नाहीं. ती माझ्याकडे पहात होती.

हृदयांत मनोविकारांची गर्दी उसळल्यामुळें, माझें शरीर कंप पावूं लागलें, डोळे विस्तृत झाले व आवाज निरुद्ध येऊं लागला. मी म्हणालों, "विमल! माझ्या धारिष्टाची क्षमा कर. माझ्या हृदयांत प्रेमाचा जोर असह्य झाला आहे. इतके दिवस अडवून धरलेला ओघ आज बांध फोडून मोकळा झाला! ज्या दिवशीं मीं तुला प्रथम पाहिलें, त्याच दिवशीं प्रेमानें माझ्या हृदयांत ठाणें दिलें. तुझी मूर्ति त्याच वेळीं माझ्या हृदयांत बिंबित झाली. दिवसें दिवस ती अधिक अधिक कोरली जात आहे. विमल! तूं जर मला आपल्या मधुर रुकारानें कृतार्थ केलें नाहींस, तर माझें जविन व्यर्थ जाणार. माझा आशादीप मालवणार. मग तूं माझा स्वीकार करणार ना? मला आपला कायमचा मित्र समजणार ना?"

विमलेनें नकारार्थीं मान हालविली. मी स्तंभितच झालों. आशेनें रचलेले मनोविकार ढांसळले. मी अतिशय करुणस्वरानें म्हणालों, "विमले! तुला माझें बोलणें फोल वाटतें होय? हें फोल नाहीं, सत्य आहे. तुझ्यावांचून माझें जीवन असार आहे. तुझ्या आशे-

वर माझ्या साऱ्या आशा आहेत. तुझ्यासाठीं वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास मी तयार आहें. मीं आतांच तुला सांगितलें कीं, बाबांच्या पावलांवर पावलें टाकून चालण्याची माझी इच्छा आहे. पण तुला वकिलीचा धंदा आवडत नसल्यास, मी ती आपली उत्कट इच्छा सोडून देण्यास तयार आहें. तुला जो मार्ग आवडत असेल, तुला जी दिशा पसंत असेल, तोच माझा मार्ग व तीच माझी दिशा! तुझी इच्छा पुरविणें हेंच माझें ध्येय!" माझ्यानें पुढें बोलवेना. माझा कंठ अगदीं भरून आला.

विमला म्हणाली, "तुमचें प्रेम खरें नाहीं, असें मी म्हणत नाहीं. व तुम्ही सर्वतोपरी माझ्यापेक्षां श्रेष्ठ आहां, हें मी जाणून आहें. तुमच्यासारखें पतिरत्न मिळाल्यास कोणतीही स्त्री भूषणच मानील. पण प्रेमाशिवाय लग्न होणें हें मला कबूलच नाहीं. कदाचित् तुमचें मजवर, माझ्यावर आलेल्या आपत्तीमुळें, प्रेम जडलें असेल. तुमच्या मनांत माझ्याबद्दल दया उत्पन्न झाली असेल, व तिलाच तुम्ही प्रेम समजत असाल. कांहीं काळ लोटल्यावर तुमची चूक तुम्हांला आढळून येईल, व या पोरक्या पोरीशीं लग्न केल्याबद्दल तुम्हांला पश्चात्ताप होईल."

मीं म्हटलें, "पश्चात्ताप? त्याचें नांवच घेऊं नकोस. माझ्या हृदयाचें स्वरूप मी पूर्णपणें ओळखून आहें. विमले! माझ्या मनांतला विकार केवळ दयाच असता, तर आजपर्यंत अंतःकरणांत बाणून गेलेल्या इच्छेचा तुझ्याकरितां त्याग करण्यास मी तयार

झालों असतों का ? रिकाम्या शंकाकुशंका काढून मला दूर लोटूं नकोस. विमल ! मी श्रीमंत आहें हें तुला माहीत आहेच. मला पैशाची उणीव नाहीं, प्रेमाची आहे. ती उणीव तूं भरून काढशील अशी माझी खात्री आहे. तुझ्या पोरकेपणाचा यांत कसला संबंध ? विमल ! निदान माझ्याकरितां, माझ्या मनाला सुख व्हावें एवढ्याकरितां तरी माझा स्वीकार कर."

" तुमचें मजवर प्रेम असेल. पण माझ्या मनांत तर तुमच्याविषयीं प्रेम जागृत झालें पाहिजे ना ? तुमच्याबद्दल माझ्या मनांत आदर उत्पन्न झाला आहे. शिवाय तुमच्याकडे माझें मन थोडेंसें ओढ घेतें, हींही गोष्ट मी तुमच्यापासून लपवून ठेवीत नाहीं; पण हें कांहीं प्रेम नव्हे.

To me there is but one place in the world,
And that where thou art; or wherever I be,
Thy love doth seek its way into my heart,
As will a bird into her secret nest:

[या जगांत मला अनुरूप अशी एकच जागा आहे-तूं आहेस ती ! कारण मी कुठेही असल्यें तरी, ज्याप्रमाणें एकादा पक्षी आपल्या गुप्त घरट्यांत हळूच शिरतो, त्याप्रमाणें तुझें प्रेमदेखील माझ्या अंतःकरणांत मार्ग काढीत येतें. ] याप्रमाणें कांहीं माझी स्थिति झाली नाहीं. ज्या वेळीं माझ्या मनावर प्रेमाचा इतका ताबा बसेल त्याच वेळीं मी लग्न करण्यास तयार होईन !"

" विमल ! तुझें मन माझ्याकडे थोडेंसें ओढ घेतें, म्हणून तूं आतांच कबूल केलेंस ना ? मला एवढेंच पुरे आहे. सध्यां जरी तुझें माझ्यावर काव्यमय प्रेम नसलें, तरी तें संपादन करून घेण्याची मला उमेद आहे. **लहान झऱ्याचीच पुढें महानदी होते !** त्याच प्रेमाचें उच्च प्रेमांत रूपांतर होईल. "

" पण तितकी प्रेमाची वाढ झाल्यावांचून लग्नाची तरी काय घाई ? कांहीं काळ लोटूं देणें हेंच चांगलें. म्हणजे तुम्हांलाही आपल्या मनाची खरी स्थिति ठाऊक होईल, व मलाही माझें प्रेम तुमच्यावर जडणें शक्य आहे कीं काय, हें कळून येईल. जर दोघांचीं अंतःकरणें कांहीं दिवसांनींदेखील या संबंधाबद्दल अशींच उत्सुक राहिलीं, तर कांहींच प्रश्न नाहीं. नाहीं तर, मागें आपल्या हातून चूक घडणार होती ती झाली नाहीं, याबद्दल दोघांनाही बरेंच वाटेल. "

" विमल ! पण मी हा काळ कसा कंठणार ? मला कोणती आशा आहे ? मजवर कोणाचें प्रेम आहे ? "

" माझीदेखील तीच स्थिति आहे. अजूनपर्यंत मला तुमच्याशिवाय कोणाचीच माहिती नाहीं. माझी कोणाशीं ओळखदेखील नाहीं—तर प्रेमाची गोष्ट दूरच राहिली. तुमच्याबद्दल माझें मन ओढ घेत आहे. तुमचें जर माझ्यावर तुम्ही म्हणतां तितकें अतोनात प्रेम असेल तर एवढ्या गोष्टीवर—एवढी आशा पुरे आहे असें नाहीं का तुम्हांला वाटत ? "

" विमल, तूं नाहींना माझा स्वीकार करीत ? ठरला तुझा निश्चय ? "

" आपण कांहीं दिवस वाट पहाणें हेंच इष्ट आहे. "

* * * * *

विपण्ण मनानें मी फिरावयास निघून गेलों. ब्याकबेवर जाऊन मी किती वेळ तरी दगडाच्या ढिगावर बसून होतों. माझ्या मनाची निराशा झाली. मीं रचलेल्या आशेच्या माड्या ढांसळल्या. भावी दुःख समोर दिसूं लागलें. किती तरी वेळ मी त्याच स्थितींत बसून होतों. एकामागून एक विचार मनांत येऊं लागले. प्रत्येक विचाराचा विषय विमलाच होती. विमलेशीं विवाह करून तिच्यासह नागपुरला घरदार करून सुखानें दिवस काढावयाचे, हा माझा विचार जागच्या जागींच जिरला. ज्याबद्दल आपली पूर्ण खात्री असावी, अशा एखाद्या गोष्टींत निराशा झाल्यानें मनाला किती दुःख होतें, याची कल्पना सांगण्यापेक्षां अनुभवानेंच पटूं शकते; व ज्या गोष्टींत निराशा झाली, ती प्रेमासारखी नाजुक असली, तर मनाला होणाऱ्या यातना किती असह्य भासतात, हें प्रेमानें निराश झालेल्यांनाच ठाऊक. मन एकदां निराश झालें कीं, कोणत्याच गोष्टींत त्याला आशा वाटत नाहीं. काळा चष्मा डोळ्यांवर चढविला, म्हणजे ज्याप्रमाणें पांढरें कांहींही दिसणें शक्य नाहीं, त्याप्रमाणें हा निराशेचा चष्मा मनानें चढविला म्हणजे आशाकरदेखील काळे दिसूं लागतात! जगांतील प्रत्येक सुंदर

वस्तु कुरूप दिसते ! सद्गुण दुर्गुण दिसतात ! व कोणत्याही चांगल्या कृत्याच्या मुळाशीं स्वार्थ असावा अशी शंका येते !

जगांत कलिका पूर्वीप्रमाणेंच गंध पसरवीत असतात, भृंग पूर्वीप्रमाणेंच गानलहरींनीं जग भारीत असतात, चंद्रमा आपल्या करांनीं जगाला सुशोभित करीत असतो व त्याच्या आकर्षणानें उचंबळणाऱ्या समुद्राच्या लाटा परस्परांशीं खेळत बागडत असतात ! दृश्य सर्व पूर्वीचेंच असतें, पण विषण्ण झालेलें मन या दृश्याकडे न जातां रात्रीच्या भीषण अंधाराकडे वळतें, याला कोण काय करणार? समुद्राचें भीषणत्व, चंद्रावरचे डाग, भृंगांचा काळेपणा, आणि कलिकांखालचे कंटक हींच त्या विषण्णतेला दृग्गोचर होतात.

दृश्यें उठती नवीं नवीं तीं माझ्या हृदयांत ।
कारण, नाटककार रहातो प्रेमानें तेथ ॥
प्रेमामाजीं वृत्ति गुंगवी तो प्रेमरसानें ।
तेव्हां वाटे व्यर्थ जगीं या प्रेमाविण जगणें ॥
दुसऱ्या वेळीं नैराश्याचें वारें तो फुलवी ।
जीव नकोसा क्षणीं होय तो, विपद् दिसे भावी ॥

---

# प्रकरण अकरावें.

## विमलेचा निश्चय.

सकाळीं मी आपल्या खोलीच्या बाहेरच पडलों नाहीं. माझी मनःस्थिति चांगली नव्हती. मनाचा समतोलपणा अगदीं नाहींसा झाला होता. झाल्या प्रकाराबद्दल मी एकसारखा विचार करीत

होतों. विमलेच्या प्रेमाच्या कल्पना फार काल्पनिक आहेत अशी माझी खात्री झाली. विमलेचें ज्ञान नुसतें पुस्तकी असल्यामुळें तिच्या प्रेमाच्या कल्पना, वेड्या कवींनीं केलेल्या कल्पनांमुळेंच अस्तित्वांत आल्या होत्या ! विमलेला जगाचा मुळींच अनुभव नव्हता. कारण, ती घराच्या बाहेर क्वचित्‌च पडत असे. तिला मित्र कोणीच नव्हता. मैत्रिणींचीही वानवाच! कोणाकडे चार दिवस राहावयाला जाऊन अनुभव मिळावयाचा तर तिला नातलगही कोणी नव्हतें. यामुळें प्रेमाविषयींच, काय, पण जगांतील प्रत्येक गोष्टीविषयीं तिचीं मतें असलींच चमत्कारिक व अनुभवशून्य असतील, असा मला संशय आला. पण तिचीं मतें कितीही चमत्कारिक असलीं, तरी ती मला हवी आहे, तिच्यावांचून हें जग मला शून्य आहे, तिच्यावर माझ्या मनाची शांति अवलंबून आहे, ही गोष्ट मी विसरलों नव्हतों. इतर कितीही विचार मनांत आले, तरी त्यांच्या आंत गुरफटलेली विमला माझ्या ज्ञानचक्षूंना दिसत होती !

साडेआठ वाजण्याच्या सुमारास विमला स्वतांच माझ्या खोलींत आली. मी आरामखुर्चीवर बसून, डोळे मिटून विचार करीत होतों. त्यामुळें तिच्या येण्याकडे माझें लक्ष गेलें नाहीं. थोड्या वेळानें तीच आपण होऊन म्हणाली, " वकीलसाहेब ! आज खोलीच्या बाहेर पडायचें नाहीं वाटतें ? आमच्यावर एवढी अवकृपा कां ? " विमलेच्या शब्दांनीं मी आपल्या तंद्रींतून जागा झालों. डोळे उघ-

ढून पाहिलें तों विमला माझ्याजवळच उभी. माझें मन तिला कालच ठाऊक झालें होतें. यामुळें आज मला मुळींच संकोच वाटला नाहीं. मीं उठून तिचा हात धरला व म्हटलें, " विमल ! माझ्या उदासीनतेला तूंच कारण आहेस, व तूं हें जाणतही आहेस. इतकें असून असें बोलण्यांत काय फायदा? एक शब्द तुझ्या मुखानें निघाला तर मी सुखी होईन."

" नानासाहेब! याबद्दल मी कालच आपल्याला काय तें सांगितलें. थोडे दिवस वाट पाहण्यांत आपल्याला काय वावगें वाटतें ? पण समजा कीं, मी काल आपल्याला साफ नकार दिला असता, तरी आपलें मजवरचें प्रेम कमी व्हावें कीं काय? हीच का आपली प्रेमाची व्याख्या? आज मला आपली मैत्रीण लेखा-वयालादेखील आपण तयार नाहीं का? आज सकाळपासून आपण खोलीच्या बाहेर पडलां नाहीं. यामुळें मला अगदीं चुकल्या-चुकल्यासारखें झालें; म्हणून मी आतां मुद्दाम तुमच्या खोलींत आलें. तुम्ही मला आपली मैत्रीण नाहींना समजत? "

" विमल, माझा ओढा तुझ्याकडे आहे; एवढेंच नाहीं, तर मला हल्लीं तुझ्यावांचून दुसरें कांहींच दिसत नाहीं. मैत्रिणच काय, पण तूं माझी अधिष्ठात्री देवता! सर्व कांहीं तूं! "

" सध्यां मग आपण मला मैत्रीणच समजावी. मग रोजच्या-सारखें बोलायला आज कां नाहीं आलां? आज इतका राग कसला आला? "

" विमल ! राग कसला ? काल माझ्या मनाला जो धक्का बसला त्यांतून मला सांवरलें पाहिजे ना ? तुझ्याशीं बोलण्याची माझ्या मनाला इच्छा होणार नाहीं, तर होणार तरी कसली ? "

" मग तुला आपली मैत्रीण लेखीन असें मला वचन द्या. मी पोरकी आहें. आपणांला कोणीही नसलें, तरी आपण पुरुष आहां, आपण स्वतंत्र आहां. "

" विमल ! हें घे वचन. " असें म्हणून मीं तिच्या हातावर हात हळूच मारला. मी पुढें म्हणालों, "विमल ! मी आतां लवकरच नागपुराला जाणार आहें. माझें कॉलेज उघडण्याचे दिवस आले. मला एक दोन दिवसांत निघावें लागेल. पण तूं आपल्या शब्दाची आठवण ठेव. माझ्या हृदयांतलें प्रेम कमी होण्याचा संभव नाहीं; यामुळें प्रत्येक क्षणीं तूं मला हवी आहेस, पण तुला माझ्याविषयीं तूं म्हणतेस तशी प्रीति वाटूं लागली, किंवा मीं जवळ असावें, अशी तुला कोणत्याही कारणानें इच्छा झाली, किंवा तुला कांहीं मदत लागली, तर मला कळीव. मी तुझ्या सेवेला हजर आहें. हा घे माझा पत्ता. " असें म्हणून मीं तिला एका कागदावर माझा पत्ता लिहून दिला.

विमलेनें मीं दिलेला कागद आपल्या पोलक्याच्या खिशांत ठेवून दिला. नंतर ती म्हणाली, " मीदेखील लवकरच येथून निघणार आहें. " मी आश्चर्यचकित होऊन म्हणालों, " तूं कोठें जाणार ? कारण, कालच मला नरसोपंत म्हणत होते कीं, मी

घरच्या सर्व मंडळीला चारआठ दिवसांत अमरावतीहून येथें आणणार. त्यांना आतां येथेंच राहणें भाग आहे."

"त्यांनीं आपली मंडळी आणली तरी काय झालें? माझा कांहीं अमरावतीला जाण्याचा विचार नाहीं. मी दूर—दुसरीकडे जाणार आहें."

"मग तूं जाणार कोणीकडे? तुला कोणीच नातलग नाहीं, म्हणून तूं परवां नाहीं का मला सांगितलें?"

"हो. तें अगदीं खरें आहे, पण मी आपल्या पोटापाण्याची व्यवस्था पाहण्याकरितां जाणार आहें."

"विमल! तुला वेड तर नाहींना लागलें? तुला काय कमी आहे? नरसोपंतांच्या घरची मंडळी फार चांगली आहे. ते तुझें आपल्या पोटच्या मुलीप्रमाणें पालनपोषण करितील."

"काकांचा स्वभाव किती चांगला आहे, हें मी जाणून आहें; व त्यांच्या घरच्या मंडळीचाही स्वभाव चांगला असेल. पण मी उगीचच्या उगीच आपला भार लोकांवर कां टाकावा? त्यांतून मला शिक्षण मिळालें नसतें तर गोष्ट निराळी. स्वतांपुरतें मिळविण्याइतकें मला शिक्षणही मिळालें आहे."

"विमल! असला वेडेपणा करूं नको, हीच तुला माझी विनंती आहे. तूं मला आपला मित्र म्हणून कबूल केलें आहेसना? तुला जर पंतांच्या घरीं संकोच वाटत असेल, तर तूं वाटेल तेथें रहा. मी तुला खर्चाकरितां पन्नास रुपये महिन्याचे पाठवून

देईन. मित्रापासून मदत घेण्यांत कोणताच कमीपणा नाहीं. तुला उद्योग करण्याचें कांहींच कारण नाहीं."

"आपत्कालीं मित्रापासून मदत घ्यावी, व मी जर कांहीं अडचणींत सांपडल्यें, तर मी आपल्याला अवश्य लिहीन. पण मी आपल्या पायांवर उभी राहण्याला समर्थ असतां, इतरांच्या तोंडाकडे कां म्हणून पहावें? माझा निश्चय ठरला आहे."

"मला हें सर्व नरसोपंतांच्या कानांवर घातलें पाहिजे. ते तुझा निश्चय फिरवितील. तूं माझें ऐकणार नाहींस."

"नानासाहेब! आपल्याला जर माझी कींव येत असेल, तर कृपा करून एवढें करूं नका. कारण, मी आपला हट्ट सोडणार नाहीं व त्यामुळें काकांना वाईट वाटेल. आपल्याला माझी शपथ आहे. आपलें जर मजवर खरेंच प्रेम असेल, तर माझा बेत आपण कोणालाच कळवूं नका. मीच तो योग्य वेळीं कळवीन. मी आपल्यावर विश्वास टाकून एवढें आपणांला कळविलें; तर माझा विश्वासघात करूं नका."

"विमल! तूं मला सर्वतोपरी फांसांत धरलें आहेस. पण तुझा बेत तरी काय आहे, हें मला सविस्तरपणें कळूं दे."

"आज पंधरा दिवसांपासून मी वर्तमानपत्रांतील जाहिराती वाचीत आहें. सात आठ ठिकाणीं स्त्रीशिक्षकिणी हव्या आहेत, तेथें मीं अर्ज केले आहेत. त्यांच्यापैकीं एखादी जागा मला मिळाल्या-बरोबर मी त्या कामावर निघून जाणार आहें."

" पण तूं स्वतःच्या शिक्षणाबद्दलचा दाखला काय पाठविलास? कारण तुझें सर्व शिक्षण घरींच झालें आहे. "

" येथील फीमेल हायस्कूलची व्हाइस प्रिन्सिपॉलबाई मला मागें शिकवावयास येत असे. तिनें मला एक दाखला दिला आहे. तोच मी पाठविला आहे. "

" पण तूं अर्ज कुठे कुठे केलेस, हें तर मला कळूं देशील? "

" मला एकादी जागा मिळाल्यावर त्याचा विचार करूं. आजच त्याची एवढी चौकशी नको. "

" विमल! तूं कुणाचेंही न ऐकतां जाणार—जा; खुशाल जा. तुला जगाचा अनुभव नाहीं, यामुळें ह्या कल्पना तुझ्यापुढें खेळत असतात! आपण पुस्तकांत जें कांहीं तात्त्विक विवेचन वाचतों तें या जगांत सांपडणें शक्य नाहीं. पण तुला तरी याचा अनुभव यावा कसा? पण मला एक वचन दे. तुला माझ्या प्रेमाची जाणीव झाली, मीं भेटावें, असें वाटावयास लागलें—व तसें वाटणारच—तर लागलीच मला कळव. मी, तो भाग्याचा दिवस कधीं येतो, याचीच वाट पाहत आहें. ज्या दिवशीं असल्या या आयुष्याचा तुला कंटाळा येईल, त्या दिवशीं मला लिहून पाठव. मी सर्वस्वी तुझाच आहें. व तूंदेखील माझीच आहेस असें मी समजून आहें. तुला जाणीव नाहीं, एवढेंच. तुला कोणतीही अडचण पडेल, तेव्हां मला कळव. मी तुझी अडचण दूर करीन."

विमलेनें मला असें करण्याबद्दल वचन दिलें. माझ्या मनाचें

अंशतः समाधान झालें. कोणतीही जागा पत्करल्यावर मला आपला पत्ता कळविण्याविषयीं मी तिला वारंवार बजाविलें. जरी मध्यें थोडासा विलंब लागला, तरी अखेर विमला माझीच होणार, अशी माझी खात्री झाली. तिचा विचारही मला इतका वावगा वाटला नाहीं. उलट पक्षीं तिच्यासारख्या पुस्तकांना वाहिलेल्या मुलीला लायब्ररीबाहेरील जगाचा कांहीं तरी अनुभव येणेंच इष्ट आहे, असें मला वाटलें. त्याशिवाय तिच्या आकुंचित कल्पना विकास पावणार नाहींत, हें मी समजून चुकलों.

मला आतां लवकरच गेलें पाहिजे, हें मी पंतांच्या कानांवर घातलें. त्यांच्या तें लक्षांत होतेंच. त्यांनीं नीट अभ्यास करण्याविषयीं मला बजाविलें, व माझ्या पैशांची व्यवस्था मला समजावून दिली. ते करतील तें माझ्या फायद्याचेंच, अशी माझी खात्री होती. मला खर्चाकरितां तीसचाळीस रुपये महिना आला तरी पुरे असें मी त्यानां कळविलें. बाजारांत कांहीं कपडेलत्ते, कांहीं पुस्तकें व इतर कांहीं चिल्लर सामान खरेदी करण्यांत मी एक दोन दिवस घालविले.

माझ्या निघण्याचा दिवस उजाडला. विमलेचा वियोग होणार, या कल्पनेनें मला असह्य दुःख झालें. मी तिला, मला पत्र पाठविण्याविषयीं वारंवार बजाविलें. ती 'हूं' म्हणाली. जेवण झाल्यावर मी तिच्या खोलींत गेलों व तिला म्हटलें, "विमल! मी आज जात आहें, पण माझें हृदयमात्र तुजपाशीं गुंतून गेलें

आहे; त्याची नीट काळजी घे. यदाकदाचित् तुझ्या हातून हयगय झाली, तर मी हृदयभग्न होईन........" मला पुढें बोलवेना. माझ्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. विमलेला-दखील हें पाहून फार गहिंवर आला. वरपांगीं ती, 'हें काय वेडयासारखें!' म्हणून म्हणत होती. पण पुढें तिचा कंठ दाटून आला. ती जवळ येऊन माझे अश्रु आपल्या हातरुमालानें पुसूं लागली; पण स्वतां तिच्या डोळ्यांतूनदेखील एकसारखा अश्रु-प्रवाह चालला होता.

ती माझे अश्रु पुशीत होती. तिच्या त्या मधुर स्पर्शानें माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले.; सर्व शरीर कंपित झालें. एक नवीन-च अवर्णनीय सुख माझ्या मनाला अनुभवण्यास सांपडलें. मनाला उन्मादावस्था प्राप्त झाली. पण तो उन्माद फारच मधुर होता. देहभान नाहींसें होऊन त्यांत मन रंगून जाण्या इतका तो मोहक होता. मी तिला आपल्याजवळ ओढून घेतलें व तिच्या ओष्ठावर माझ्या प्रीतीचें चिन्ह मुद्रित केलें. तीदेखील रोमांचित झाली. तिनें कांहींच आढेवेढे घेतले नाहींत. माझ्या छातीशीं आपलें डोकें टेंकून ती अश्रु गाळीत होती.

आम्ही किती वेळ तरी त्या स्पर्शसुखांत दंग होतों. शेवटीं मीं म्हटलें, "विमल ! तुला अजूनही माझ्या प्रेमाचा संशय आहेना ? तुझ्या मनाचीदेखील तुला अजून परीक्षा झाली नाहींना ?

माझ्या जीवनाशीं आपलें जीवन संलग्न करण्याची तुला इच्छा नाहींना होत ? "

विमल सद्गदित होऊन म्हणाली, " हें काय ? मीं असें कधीं म्हटलें ? पण आपण आणखी कांहीं दिवस वाट पाहिली तर बरेंच होईल. विरहानें प्रीतीची पारख होते. विरहानें प्रीतीची किंमत कळते. विरहानेंच तर प्रीतीची गोडी अनुभवास येते, हें नाहीं का आपणांला ठाऊक ? आपण जाणार या विचारानें मला जितकें दुःख झालें आहे, तितकें पूर्वी क्वचित्‌च झालें असेल. आपल्यावांचून मला मुळींच करमणार नाहीं, हें मी जाणून आहें. आपल्या उदार व प्रेमळ स्वभावाची आठवण कधींच नष्ट होणार नाहीं, हें मी पुरतेपणीं जाणत्यें. पण हें कांहीं खरें प्रेम नव्हे. मनुष्याचा सारासार-विचारदेखील हिरावून नेईल व त्याला पूर्णपणें वेड लावील तेंच खरें प्रेम ! "

मीं म्हटलें, " विमल ! मला त्याच प्रेमाचा अनुभव येत आहे. तुला अजून तसा अनुभव येत नसला तर लवकरच येईल. "

गाडीची वेळ झाली. दाराशीं व्हिक्टोरिया येऊन उभी राहिली, त्याबरोबर पंतांनीं मला हाक मारिली. विमलेचा पुन्हा एकवार निरोप घेऊन मी बाहेर पडलों. पंतांना नमस्कार केला. सांभाळून जाण्याबद्दल त्यांनीं मला बजाविलें. मी गाडींत चढलों. माझी दृष्टि विमलेकडे लागली होती. तिचे नेत्रही अगदीं अश्रूंनीं डबडबले होते. अखेर माझें हृदय तुझ्यापाशींच आहे, असें मीं तिला खुणेनें

सांगितलें. गाडी चालू झाली. पाहतां पाहतां माझी प्रीतिदेवता, माझ्या हृदयाची स्वामिनी, माझ्या प्रेमाची मालकीण दिसेनाशी झाली ! माझें हृदय क्षणभर शून्य झालें.

---

## प्रकरण बारावें.

### पुनश्च हरिः ओम्.

या सुट्टींत माझ्या आयुष्यक्रमांत जें विलक्षण स्थित्यंतर झालें त्याचें शब्दचित्र देतां येणें जवळजवळ अशक्य आहे. या स्थित्यंतराला भंडारा येथें बसंताच्या घरीं आरंभ झाला, आणि मुंबई येथील एल्हरी इंडियन्स ब्यांकेच्या इमारतींत विमलेच्या खोलींत त्या स्थित्यंतराची समाप्ति झाली. माझ्या स्वभावांत यामुळें बरेंच परिवर्तन झालें. पूर्वींचा वाऱ्यावर तरंगणारा माझा उत्साही स्वभाव नाहींसा होऊन त्या जागीं विचारांची गर्दी होऊं लागली. पूर्वीं प्रत्येक गोष्टींत पुढें पाऊल टाकण्याविषयीं मी उत्सुक [illegible] ती उत्सुकता नाहींशी होऊन आहे तीच स्थिति कशी सुधारावी, ह्याच विचारांत मी दंग असें. व या सर्व स्थित्यंतराचें मुख्य कारण म्हणजे प्रेम. आजपर्यंत ज्या मनोविकाराची पुस्तकाशिवाय मला जाणीव नव्हती, तो मनोविकार पुस्तकाबाहेरील प्रत्यक्ष जगांत अनुभवण्यास सांपडल्यामुळें, मला त्याची व्याख्या चांगली कळली. या नवीन मनोविकाराच्या तावडींत मी पुरताच सांपडलों.

विद्यालय सुरू झालें. ' हरिः ओम् ' म्हणून अभ्यास करण्यास आम्हीं आरंभ केला. इतके दिवस उजाड पडलेलें वसतिगृह नवीन विचारांच्या उत्साही तरुणांनीं भरलेलें दिसूं लागलें. मधली अद्भूत परिस्थिति बदलून माझ्याभोंवतींही पूर्वींचीच—विद्यार्जनाला पोषक अशी—परिस्थिति उत्पन्न झाली. वसंताचा प्रिय व हितकर सहवास पुन्हा अनुभवण्यास सांपडूं लागला. विद्वान अध्यापकांकडून चार ज्ञानाचे शब्द कानांवर पडूं लागले. बाह्य परिस्थिति सर्वस्वीं बदलली. पण माझ्या मनःस्थितींत झालेलें स्थित्यंतर बदलणें शक्य नव्हतें. पूर्वी प्रेमशून्य असलेलें माझें मन आतां प्रेमांत सर्वस्वीं गुरफटलेलें होतें. ज्या हृदयांत आईची अस्पष्ट प्रतिमा, बाबांची अंधुक मूर्ति व आजीची तसबीर या वस्तु नीट व्यवस्थित मांडलेल्या होत्या, त्याच हृदयांत आतां उच्च सिंहासनावर बसलेली विमलेची प्रेमकरुण मूर्ति आपल्या प्रेमळतेनें शोभूं लागली. ज्या मनाला वसंताचें प्रेम अत्युच्च वाटे, त्याच मनाला आतां तेंच प्रेम दुय्यम प्रतींचें वाटूं लागलें ! ही नवीन मनःस्थिति बाह्य परिस्थितीचा बदल झाला तरी कशी बदलणार ?

माझ्यांत घडलेलें हें परिवर्तन कोणाच्या लक्षांत आलें नाहीं. यंदा विद्यालयांतील कोणत्याही चळवळींत प्रामुख्यानें भाग घेण्याचें मीं नाकारलें. माझ्या मनाचा कल पाहून मला मग कोणीं फारसा आग्रहही केला नाहीं. दोनचार अतिपरिचित स्नेह्यांनीं आग्रह करून पाहिला, पण कांहीं घरगुती कारणामुळें माझी मनःस्थिति

कामाला अनुकूल नाहीं, असें त्यांना बजावून सांगितल्यामुळें ते गप्प राहिले. माझ्या स्वभावांत या घडलेल्या बदलाबद्दल प्रत्येक जण निरनिराळे तर्क लढवूं लागला. कोणी म्हणे, ' यंदा त्यांचा एक नातलग वारला. ' तर दुसरा अशी हूल उठवून देई कीं, ' त्यांची बरीच रक्कम एका ब्यांकेंत होती ती बुडाली. ' तिसरा एखादा असा तर्क करी कीं, ' हे राजश्री एखाद्या प्रेमाच्या भानगडींत ( Love-affair ) सांपडले असावे. ' याप्रमाणें प्रत्येकानें आप-आपल्या परीनें तर्क चालविले होते.

बाहेरच्या मंडळीला जेथें माझ्यांत झालेल्या फरकाची जाणीव होऊं लागली, तेथें ती वसंताला झाली तर त्यांत नवल तें कोणतें ? माझा त्याच्याशीं निरंतरचा सहवास. त्यानें एके दिवशीं मला खरें कारण विचारलें. मला खरें सांगणेंच इष्ट वाटूं लागलें. वसंता-सारख्या प्रेमळ मित्राशीं प्रतारणा करणें मला कसेंसेंच वाटूं लागलें. मी मागें त्याला याबद्दल कळविलें नाहीं, म्हणून मला लाज वाटूं लागली. पत्रांत केली तर केली, पण मीं त्याच्याशीं समक्षही या गोष्टींत प्रतारणा केली, तर मी अधिक दोषी ठरेन, असें मला वाटलें; व या माझ्या विचाराला अनुसरून मी त्याला म्हणालों, " वसंत ! मी प्रेमाच्या प्रचंड ओघांत सांपडलों आहें. तो नेईल तिकडे वाहत जाण्यापेक्षां मला दुसरा मार्ग नाहीं. याविषयीं सध्यां तूं मला अधिक कांहीं एक विचारूं नकोस. थोड्याच दिवसांनीं मी तुला सर्व सांगेन. "

माझ्या बोलण्यावर वसंत थोडासा हंसला. नंतर तो माझ्याकडे वळून मला म्हणाला, " नाना ! मी तुला प्रश्न करून तुझें प्रेमरहस्य समजावून घेण्याचा कोणताच प्रयत्न करणार नाहीं. पण मला एकच गोष्ट सांग; तुझी प्रीतिवस्तु साध्य कोटींतली आहे ना ? तसें असलें तर ठीकच; नाहींपेक्षां तूं तें सर्व विसरून जाण्याचा प्रयत्न कर. आकाशांतील अप्सरा मर्त्यांच्या उपयोगाची नाहीं. " मी वसंताला म्हटलें, " वसंत ! माझी हृदयदेवता असाध्य नाहीं, असें मला वाटतें, पण मी निश्चयानें कसें सांगूं शकणार ? " " नाना ! या जगांतील कोणत्याच गोष्टीविषयीं कोणीही निश्चयानें कांहीं सांगूं शकणार नाहीं; कारण, भवितव्यतेची दोरी आपल्या हातीं नाहीं. पण जी गोष्ट आपल्याला संभवनीय वाटेल, ती खरी असें धरून चालण्यास कोणताच प्रत्यवाय नाहीं. तुझ्या मनाला जर तुझ्या प्रेमसाफल्याविषयीं इतकी खात्री वाटते, तर व्यर्थ काळजी कां वाहतोस ? आपल्या कर्तव्याला नेटानें लाग. "

त्या दिवशीं आमचें बोलणें तितक्यावरच थांबलें. मी हळूहळू आपलें मन अभ्यासाकडे वळविलें. मनाला जडलेलें अस्वास्थ्य नष्ट होऊं लागलें. मन एकदां कोणत्याही उद्योगांत गढून गेलें कीं, त्याला आपल्या स्वतांच्या विवंचनांचा विसर पडतो असें म्हणतात, तें कांहीं खोटें नाहीं. वसंताबरोबर माझा अभ्यास नेटानें सुरू झाला. माझ्या मनावरचें दडपण नाहींसें झालें. विमलेला मी पार

विसरून गेलों, असामात्र याचा अर्थ नव्हे. विमलेची प्रेमळ मूर्ति माझ्या हृदयांत कोरलेली होतीच, पण माझें मन अभ्यासांत रंगल्यापासून ती मूर्तिच मला नेटानें अभ्यास करण्याविषयीं प्रोत्साहन देऊं लागली. पूर्वीं तीच माझ्या अभ्यासांत खो घालीत असे. मनुष्याची मनःस्थिति ज्या प्रकारची असेल त्या अनुरोधानेंच त्याला बाह्य सृष्टि भासत असेल, व त्या धोरणानेंच ती उपदेशही देत असते, या सिद्धान्ताचेंच हें प्रत्यंतर होतें.

दिवसामागून दिवस लोटूं लागले. हळूहळू मी आपल्या कर्तव्यांत पूर्णपणें गढून गेलों. कामांत नसलों म्हणजेच विमले-विषयीं मनांत विचार सुरू होत. इतर वेळीं त्यांना थाराच मिळत नसे; व तिच्याविषयीं मनांत विचार सुरू झाले, तरी माझें मन व्यथित होत नसे. कारण, बिमलेचें माझ्यावर प्रेम जडलें आहे, ही गोष्ट मला माहीत होती. बिमला आपल्या तात्त्विक ( Romantic ) स्वभावाला अनुसरून आपल्या मनोविकारांना प्रेम हें नांव देत नव्हती, पण हा तिचा भ्रम होता. तिचें माझ्यावर अतोनात प्रेम जडलें होतें व हें एखाद्या आंधळ्यानेंदेखील सांगितलें असतें. तिची तिला लवकरच जाणीव होईल, व मग ती निश्चयानें आपली होईल अशी मला खात्री होती. यामुळें मी थोडासा निश्चिंत होतों.

पण सृष्टिक्रम आपल्या इच्छेप्रमाणें सरळ कसा चालणार ? तसें होईल तर पृथ्वींत दुःखच उरणार नाहीं, व दुःखाच्या अभावामुळें

आनंदाची किंमतही कोणाला कळणार नाहीं. या जगांत आनंद अनुभवण्यास सांपडावा, मिळालेल्या आनंदाची किंमत जाणण्याची पात्रता अंगांत यावी, आणि दुःखाच्या प्रसंगांना नेटानें तोंड देण्याची ताकद मनाला प्राप्त व्हावी, अशी ईश्वरी योजना दिसते. त्याचप्रमाणें माझीही स्थिति झाली. विमला आपली होण्याबद्दल कबूल असल्याचें लवकरच तिच्याकडून पत्र येईल, अशी मी आशा बाळगून होतों; पण त्याऐवजी नरसोपंतांचें एक अनपेक्षित लांबलचक पत्र मुंबईहून आलें. पत्र वाचून मी क्षणभर मांबावलों व काय करावें हें सुचेना. पण लवकरच, आपल्याला नवीन अशी कोणतीच गोष्ट पत्रांत नाहीं हें लक्षांत आलें. पूर्वीच्याच गोष्टी पण त्या नवीन तऱ्हेनें माझ्यापुढें मांडल्या होत्या. वाचकांकरितां मी सर्व पत्रच खालीं देतों:—

" चि. रा. नाना यास, अनेक आशीर्वाद, विशेषः—

ब्यांकेसंबंधीं नवलविशेष कांहीं नाहीं. परमेश्वरी इच्छेनें माझ्या श्रमांना व आपणां सर्वांच्या अमोल मदतीला यश आलें. ब्यांक सुव्यस्थित रीतीनें चालू असून भरभराटींत आहे. आपण जो मजवर विश्वास टाकला आहे, त्याला अनुसरूनच मी आपल्या पैशाची योग्य व्यवस्था लावीत आहें; काळजी नसावी. आपल्या उदार मदतीबद्दल ब्यांक आपली फार ऋणी आहे.

आपणांस खर्चाकरितां काय लागेल तें मागवून घ्यावें. मी हल्लीं शंभर रुपये महिना पाठवीत असल्याचें आपल्या लक्षांत

असेलच. अधिक लागल्यास लिहावें. कारण आपण पैशाचा उप-योग अनाठायीं करणार नाहीं, अशी माझी खात्री झाली आहे. शिवाय आपण स्वतंत्र आहां व ईश्वरानें आपणांस अनुकूलताही दिली आहे.

मीं आपल्या घरची मंडळी कालच अमरावतीहून येथें आणली. सर्व खुशाल आहेत. चि० दामूच्या शिक्षणाची गैरसोय होऊं नये म्हणून मी त्याला नागपुरास पाठविणार आहें. आपण त्याचें नांव एकाद्या चांगल्या शाळेंत घालून त्याच्यावर आपली करडी नजर ठेवावी. तो अतिशय हूड आहे, तेव्हां त्याला धाक लावणारें कोणी तरी असलेलेंच बरें. त्याला येथें आणलें असतें,पण येथें युनिव्ह-र्सिटीदेखील निराळीच असल्यामुळें त्याच्या अभ्यासाची अनवस्था होईल; व आजकाल मला वेळ नसल्यामुळें, त्याच्यावर मला लक्षही ठेवतां यावयाचें नाहीं. आपण त्याची काळजी घ्याल ही खात्री आहे, व त्या भरंवशावर मी त्याला आपणांकडे पाठविणार आहें. तो आठचार दिवसांनीं तिकडे येईल.

कै. रायकरांची मुलगी विमला चार दिवसांपूर्वीं येथून कोणीकडे निघून गेली. तिच्यासाठींच मीं आमची घरची मंडळी येथें लवकर आणविली. मुलगी स्वभावानें फार चांगली असून तिच्या हातून असें अविचाराचें कृत्य कसें झालें, याबद्दल मी विचार करीत होतों. पण व्यवहारज्ञान नसल्यामुळें तिला पोंच राहिला नाहीं, हेंच खरें. ‘आपला भार दुसऱ्यावर पडूं नये म्हणून मी जात आहें,’ असें तिनें मला

लिहिलें आहे. परंतु आम्हांला तिचा भार वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें. कारण, दोन वर्षांपूर्वींच रा० रायकरांचा आम्ही डायरेक्टर मंडळींनीं पांचशें रुपये पगार ठरविला होता. पण गेल्या दोन वर्षांत त्यांनीं दोनशांच्यावर एक कवडीही न उचल्यामुळें, त्यांची ब्यांकेकडे सात हजार रुपयांची शिल्लक आहे, असेंच मी समजतों, व त्याप्रमाणें मीं सर्व हिशोब करून आठ हजारांची रक्कम तिच्या नांवानें ब्यांकेंत ठेविली आहे. आणि तिला तिचें व्याज मिळावें अशी व्यवस्थाही केली आहे. मीं हें सर्व तिला लिहून कळविलें असतें, पण तिनें आपला पत्ता न दिल्यामुळें नाइलाज झाला. स्वतांच्या चरितार्थासाठीं धडपड करण्याची, किंवा तिच्या मनाला प्रशस्त वाटत नसल्यास माझ्यासारख्या तिच्या वडिलांच्या मित्राजवळ राहण्याची तिला कांहींच जरूर राहिली नाहीं.

तिनें मला लिहून ठेवलेलें पत्र आपणांकडे अवलोकनार्थ पाठवीत आहें. तिनें आपल्याही नांवानें एक पत्र लिहून ठेवलें आहे. तेंही सोबत पाठवीत आहें. आपल्या पत्रांत जर तिचा पत्ता लिहिलेला असला, तर तो मला कळवावा, म्हणजे तिला वरील मजकूर लिहिण्यास ठीक पडेल. जातांना तिनें कांहीं पुस्तकें व एकदोन कपडे यांशिवाय कांहींच बरोबर नेलें नाहीं. मी संध्याकाळीं बाहेर गेल्यावर ती घराबाहेर पडली. फिरावयास चालली असेल, असें सर्वांना वाटलें, त्यामुळें विशेष कोणींच लक्ष दिलें नाहीं. मी रात्रीं परत आल्यावर तिची नियमाप्रमाणें चबकशी केली. ती

संध्याकाळीं बाहेर गेली, पण परत आली नाहीं, असें कळलें. इतक्यांत माझ्या टेबलावर ठेवलेलीं दोन पत्रें मला दिसलीं. त्यानें सर्व उलगडा झाला. असो; तिची मर्जी !

तिचा पत्ता माहीत असल्यास जरूर कळवावा. पत्राचें उत्तर यावें. वरचेवर खुशालीचें पत्र येत असावें. अभ्यास नेटानें करावा. सुज्ञांस लिहिणें नलगे.

कळावें, हे आशीर्वाद. आपला,

न. बा. ओक.

२

या पत्रांतच विमलेनें नरसोपंतांना लिहिलेलें पत्र घातलें होतें. तेंही खालीं देतों.

ती० काकासाहेबांना विमलेचा साष्टांग नमस्कार—

मी येथून अशी जात आहें, हें पाहून आपणांस माझा राग येईल, व आपल्या मनांत माझ्याविषयीं एखादा संशयही उभा राहील, हें मी जाणून आहें; पण माझ्या जाण्याचा हेतु शुद्ध आहे. मी दूर एका शाळेंत शिक्षकिणीची जागा पत्करून जात आहें. एकदोन महिने मी नोकरीच्या खटपटींत होत्यें व मला चांगली जागाही मिळाली आहे. मीं पत्ता दिला असता, पण आपण सर्व जण मिळून मला माझ्या निश्चयापासून परावृत्त कराल या भीतीनें देत नाहीं.

स्वतांचे पायांवर उभें राहण्याची शक्ति अंगीं असतां दुसऱ्यांना आपल्याकरितां त्रास देणें मला कसेंसेंच वाटतें. आपल्यासारख्या उदार गृहस्थांना माझा भार मुळींच वाटला नसता, व आपण माझें पोटच्या मुलीप्रमाणें पालनपोषण केलें असतें, हें मी जाणून आहें. पण आपल्या औदार्याचा फायदा घेणें माझ्या मनाला प्रशस्त वाटत नसल्यामुळें आपल्या प्रेमळ स्वभावाला अंतरावें लागलें, याबद्दल माफी असावी.

माझ्यावर आपली कृपादृष्टि पूर्वींप्रमाणेंच असूं द्यावी, अशी नम्र विनंती आहे. बाबांनीं दिलेल्या शिक्षणाच्या जोरावर व आपल्या आशीर्वादाच्या बळावर ही विमला सन्मार्गानेंच चालेल अशी खात्री असूं द्यावी. या पोरक्या पोरीला आपला आशीर्वाद असावा. अधिक काय लिहूं ? सोबतचें पत्र नानासाहेबांकडे पाठवावें. कळावें ही विनंती.

आपली,

अजाण विमला.

[ ३ ]

विमलेनें मला लिहिलेलें तिसरें पत्र सोबत आलें होतें तें मी टरकन फोडून वाचलें. पत्रांत खालील मजकूर होता—

प्रिय नानासाहेब !

निदान आज तरी तुमच्यापेक्षां मला अधिक प्रिय दुसरें कोणीच नाहीं. पण त्यामुळें पुढलें भाविष्य कोण सांगूं शकणार ?

काळच तें ठरवील. मीं मागें आपल्याला सांगितलें होतें त्याप्रमाणें आज आपल्या नोकरीवर जात आहें. मला एका चांगल्या शाळेंत शिक्षकिणीची जागा मिळाली आहे. मी आपल्या पायांवर उभी राहून जगाचें रहाटगाडगें चाललेलें पहाणार.

मीं आपला पत्ता आपल्याला देण्याचें कबूल केलें होतें, पण तो बेत मीं रहित केला आहे. कारण, तेणेंकरून माझ्या इच्छेप्रमाणें मला मनमुराद जगाचें निरीक्षण व परीक्षण करितां येणार नाहीं. कांहीं दिवस असेच लोटूं द्या. आपल्या प्रेमाशिवाय काळ कंठणें अशक्य झालें, म्हणजे मी आपण होऊनच आपल्या दर्शनाकरितां धावत येईन, अशी खात्री असूं द्यावी. त्याचप्रमाणें काळाच्या भट्टींत आपल्या प्रेमाची मूस कितपत सरस उतरते, याचाही मला अनुभव घेतां येईल.

आपण आपल्या व्यवसायाकडे लक्ष लावावें. मीही कर्तव्यांत दंग असेन. आपलें प्रेम तितकें उच्च असेल, तर आपली लवकरच भेट होईल. आशेला पुष्पें येतील ! नाहींपेक्षां आहे हीच स्थिति बरी नव्हे का ? माझ्याविषयीं व्यर्थ काळजी वाहूं नये. कारण, बाबांच्या आशीर्वादानें मी सुखांत राहीन, असें माझें मन मला सांगत आहे. आणि इतक्यावर अडचण पडलीच, तर मी न लाजतां आपली मदत मागेन. कारण आपण मला मित्र समजत आहां.

उगीच काळजी वाहून वाईट वाटवून घेऊं नये. आपल्या ध्येयावर लक्ष ठेवावें. आपला विद्याभ्यास पुरा होण्यापूर्वी माझ्या

विषयींचे विचार आपल्या मनांत येण्यापेक्षां मीच दूर असलेली बरी, असें मला वाटतें. तेव्हां मी यापुढें चार वर्षेंपर्यंत आपणांला कांहीं एक लिहिणार नाहीं. माझ्यावर कांहीं प्रसंगच ओढवला तर गोष्ट निराळी.

आजपासून चार वर्षांनीं जेव्हां आपला विद्याभ्यास पुरा होऊन आपल्या परम पूज्य वडिलांच्या पावलावर पाऊल टाकण्याची आपली उच्च महत्त्वाकांक्षा पूर्ण होईल, तेव्हां आपलें मन जर हल्लींच्यासारखेंच माझ्याविषयीं उत्सुक असलें, तर ही विमला आपलीच होईल अशी खात्री बाळगा. कारण माझें प्रेम दिवसें-दिवस कमी होत नसून तें वाढीसच लागलें आहे, ही गोष्ट आपणां-पासून लपवून ठेवण्याची माझी इच्छा नाहीं. आणि अशीच स्थिति कायम राहिली तर लवकरच माझी—

" Since I have known thee I have done nought else,
All hours not spent with thee are blanks between
stars !
I love thee ! love thee ! love thee ! madly love thee !
Oh ! thou hast drank my heart dry of all love;
It will be empty to aught after thee."

[ तुमची ओळख झाली तेव्हांपासून मी प्रेमाशिवाय दुसरें कांहींसुद्धां शिकल्यें नाहीं. तुमच्याबरोबर न घालवलेले तास तार-कांमधील पोकळ जागेप्रमाणें होत ! माझें तुमच्यावर प्रेम—प्रेम—अगदीं वेड लागल्यासारखें प्रेम आहे. तुम्हीं माझ्या अंतःकरणांतील

सर्वच प्रीतिजल शोषून घेतल्यामुळें तें अगदीं कोरडें ठणण पडलें आहे! तुमच्याशिवाय दुसरा कोणी आल्यास त्याला तें रितेंच सांपडेल!]–अशी स्थिति होईल असें वाटतें. पण कांहींही झालें तरी चार वर्षांचा काल मध्यें लोटूं देणें हेंच सर्व बाजूंनीं हितावह आहे, असें माझ्याप्रमाणें आपल्याही ध्यानांत येईल.

चार वर्षांच्या कालानलांत आपल्या प्रेमाला रहावें लागेल. पण तें जर सुवर्ण असेल, तर त्याची कांति वाढेल व हिणकस असेल तर....पण ती गोष्टच नको. माझा आपल्याला फार राग येईल, व आपण मला दोषही द्याल, हें मी जाणून आहें. पण गडे! माझ्यावर रागावूं नये. मी अनाथ नाहीं का? आपल्या मैत्रीशिवाय मला या जगांत दुसऱ्या कशाचा आधार आहे?

आपल्या प्रेमाची भुकेली,

'विमला.'

---

## प्रकरण तेरावें.

### एक मृत्यु.

विमलेच्या पत्रांनीं मला आनंद व दुःख हे दोन्ही विकार एकाच वेळीं अनुभवण्यास मिळाले. विमलेचें प्रेम वाढत आहे, या आनंददायक बातमीमुळें माझ्या प्रेमाला दुजोरा मिळाला; मला दुप्पट उत्साह आला. विमला आपलीच होणार, अशी खात्री झाली. पण तीं दीर्घ चार वर्षें—तो काल—विमलेनें ठरविलेली ती मे-

सुर कालमर्यादा मला सहन होईना. विमला त्वरित आपली व्हावी ही माझी मनीषा; पण तिजवर या मर्यादेनें विरजण घातलें. पुढें एक परीनें विमलेचा निश्चय योग्य आहे, असेंच मला वाटूं लागलें. आपल्या महत्त्वाकांक्षेंत या प्रेमाचा अडथळा येण्याची भीति समूळ नष्ट झाली. विमलेचें प्रेमच तिला योग्य काय व अयोग्य काय हें शिकवीत असावें, अशी माझी भावना झाली. पण इतके दिवस विमला निराश्रित राहणार, ही कल्पना मनाला डवचूं लागली. पुन्हा वाटे कीं, तिला सद्गुणांचें फारच मोठें पाठबळ आहे, यामुळें दुष्ट जगाची भीति बाळगण्याचें तिला कांहींच कारण नाहीं. एकवार वाटे कीं, अनुभवशून्य विमलेला कोणी भोंदू फसविणार तर नाहीं ना ? पण दुसऱ्या क्षणीं ज्ञान्याला कोणीही फसवूं शकत नाहीं, व सत्याचाच जय होतो, या गोष्टी दत्त म्हणून समोर उभ्या रहात असत. सारांश, परस्परविरोधी अशा कल्पनांचें जाळें माझ्या मनांत उभें राहिलें. कांहींच विचार ठाम होईना. कोणतीच गोष्ट गोड वाटेना.

पण मी जसजसा अधिक विचार करूं लागलों, तसतसें माझें दुःख कमी होऊं लागून त्याऐवजीं आनंद आपलें ठाणें तिथे देऊं लागला. विमलेच्या प्रेमाची प्राप्ति ही कल्पनाच इतकी मोहक होती कीं, माझ्या मनांत उद्भवणाऱ्या सर्व कुशंकांचा तत्काळ पराभव होत असे. हा चार वर्षांचा दीर्घ वाटणारा काळ हां हां म्हणतां निघून जाईल, व नंतर विमलेसह संसारशकट

हांकण्यांत आपलें आयुष्य कसें भर्कन निघून गेलें, याची आपणाला जाणीवदेखील राहणार नाहीं, अशा कल्पना मनांत येऊं लागल्या. नाहीं तरी हीं चार वर्षें संसारबंधनांत गुरफटण्याकरितां नव्हेतच, असें मला वाटूं लागलें. हा अभ्यासाचा काळ पुन्हा येणार नाहीं. हा जर आपण एकदां व्यर्थ गमाविला, तर आपल्या लहानपणच्या महत्त्वाकांक्षा जागच्या जागींच जिरतील, व आयुष्याचें मातेरें केल्याबद्दल बाबा, आई व आजी आपणाला स्वर्गांतून दोष देतील, व त्यांचा आशीर्वाद असल्याशिवाय या जगांत सुख लागणें असंभवनीय आहे, असेंच मला वाटलें. यामुळें अखेर विमलेच्या पत्राचा माझ्या मनावर चांगलाच परिणाम झाला. मी पुन्हा मोठ्या नेटानें आपल्या उद्योगाला लागलों.

माझी आठचार दिवस उडालेली खळबळ वसंताच्या लक्षांत आली नाहीं असें नाहीं. पण त्यानें मला एक अक्षरदेखील त्याबद्दल विचारलें नाहीं. मागें मुंबईहून आल्याबरोबर त्याचें मजशीं जें थोडेंसें बोलणें झालें होतें, त्यानंतर त्यानें मला एकाही अक्षरानें माझ्या प्रेमवस्तूविषयीं विचारलें नाहीं, किंवा कांहीं जाणण्याचीही उत्सुकता दर्शविली नाहीं. मला वाटतें, तो स्वतः प्रेमाच्या फेऱ्यांत सांपडला असल्यामुळें त्याला त्याचा प्रभाव कळून आला असावा, व म्हणूनच मला विचारून माझें दुःख उकरून काढण्याच्या भरीस तो पडला नाहीं. ज्या गोष्टी मौनानें साधतां येतात त्या

दुसऱ्या कशानेंही साधतां येत नाहींत. माझ्या मनांतील विकार काळानेंच कमकुवत होत जाईल हें तो जाणून होता. व फिरून फिरून जर तोच प्रश्न विचारून माझी स्मृति त्यानें जागृत केली असती, तर माझें मन कधींच शांत होऊन अभ्यासाकडे लागलें नसतें.

आमचा अभ्यास जोमांत चालला होता. व त्याचें फळ म्हणजे या त्रैमासिक परीक्षेंत वसंत पहिला व मी तिसरा आलों. बी. ए. ची परीक्षा पहिल्या वर्गांत पास करावयाची ही आमची दोघांचीही महत्त्वाकांक्षा ठरून गेली. कारण बी. ए. झाल्यावर खालच्या सटरफटर परीक्षा तुम्ही कोणत्या वर्गांत पास झालां, असें कोणी विचारावयास येत नाहीं. शिवाय ही पदवीची परीक्षा असल्यामुळें जगाच्या घालमेलींत—पैशाच्या बाजारांत—हिला मोठंच महत्त्व होतें. या धोरणानें आमचा प्रथमपासून चांगला अभ्यास चालू होता, व अशीच स्थिति शेवटपर्यंत टिकली असती, तर आमची आशा सफळ होणार, हेंदेखील आम्हीं जाणून होतों. पण....

एके दिवशीं तारवाल्यानें वसंताच्या नांवाची तार आणून दिली. तार आली तेव्हां मी जवळच टेनीस खेळत होतों. वसंत महाराज-बागेकडे फिरावयास गेला होता. वसंताला खेळाची फारशी गोडी नव्हती. मीं ती तार घेतली व फोडून वाचली. तार वाचतांच माझा चेहरा खर्कन उतरला. तारेंत खालील मजकूर होता:

'Father seriously ill, come immediately.'

'बाबा अत्यवस्थ आहेत, तावडतोब निघून ये.' माझ्याभोंवती

टेनिसकोर्टावरील मंडळी जमली, व सर्व जण उत्सुकतेनें मला काय झालें म्हणून विचारूं लागले. वसंताचे 'फादर सीरियस्ली' आजारी आहेत, असें धेडगुजरी ( कॉलेजमधील मराठी ) उत्तर देऊन मी महाराज बागेकडे निघून गेलों. महाराजबागेंत पोंहोंचेपर्यंत माझ्या जिवांत जीव नव्हता. माझी छाती धडधड करीत होती व श्वासोच्छ्वासदेखील धडपणें बाहेर येत नव्हता. वसंत केव्हां भेटतो व मी त्याला ती तार केव्हां देतों, असें मला झालें होतें. माझ्या सुदैवानें मला वसंत लवकरच भेटला. स्वारी एका बांकावर एकटीच बसून आपल्या मनाशींच गुणगुणत होती. मी त्याच्याजवळ जाऊन त्याला घाईघाईनें 'वसंत, वसंत!' अशी हांक मारली. माझी हांक ऐकतांच तो भानावर येऊन म्हणाला "नाना! तुला आज टेनिसनें इतक्या लवकर कशी रजा दिली? अजून दिवसाउजेडीच आहे. एखादा डाव खेळणें होईल!" वसंताच्या प्रश्नाचें उत्तर देण्याच्या भानगडींत मी पडलों नाहीं. मीं ती तारच त्याच्या हातांत दिली. ती वाचून पाहतांच तो कावराबावरा झाला. नंतर घोगऱ्या स्वरानें मला म्हणाला. "नाना! तुला ही तार केव्हां मिळाली?" मीं म्हटलें, "आतांच ही तार आली व मी तसाच धांवत तुझ्याकडे आलों. तार पाहतांच माझ्या पोटांत धस्स झालें! म्हणून मीं ती फोडून वाचली. पाहतों तों ही बातमी!" यावर वसंत म्हणाला, "तें असूं दे, पण रात्रीं अकराच्या गाडीशिवाय दुसरी गाडी नाहीं. मनांतून असें वाटतें कीं, या वेळीं पंख

असते, तर असाच सरळ उडून भंडाऱ्याला गेलों असतों; पण आतां रात्रीं अकरा वाजतांच्या गाडीशिवाय गत्यंतर नाहीं. मला काळजी हीच वाटते कीं, आमच्या घरांत मनुष्य कोणीच नाहीं. बिचाऱ्या यमूवर हा सर्व भार आतां पडेल. मला लवकर जाऊन तिला हातभार लावला पाहिजे. ”

वसंताच्या बोलण्यानें मला त्याच्या घरच्या स्थितीची आठवण झाली. हा विचार इतका वेळ माझ्या ध्यानांतच आला नव्हता. गोविंदराव आजारी, घरांत काकू व यमू यांशिवाय दुसरें कोणीच नाहीं, कचेरींतील एखाददुसरा शिपाई येत असेल; पण त्याचा उपयोग म्हणजे भाडोत्री बैलाप्रमाणें—जितक्यास तितकाच ! विमलेच्या प्रेमांत तल्लीन झाल्यामुळें यमू म्हणजे कोण हें मी साफ विसरून गेलों होतों, पण वसंताच्या उद्गारांनीं तिची ती प्रेमळ कर्तव्यदक्ष मूर्ति माझ्या डोळ्यांपुढें उभी राहिली; व तिच्यावर पडलेल्या प्रसंगामुळें माझें मन करुणेनें भरून गेलें.

वसंत विषण्ण मुद्रेनें विचार करीत बसला होता. त्याच्या मुद्रेवरील तजेला नाहींसा होऊन त्या जागीं दुःखाची छाया दिसूं लागली. त्याच्या मनांत निरनिराळे विचारतरंग उठूं लागले. कांहीं आशावादी असत, तर कांहीं नैराश्याशिवाय दुसरें कांहीं जाणत नसत. या प्रत्येक भिन्न भिन्न विचाराची छाया त्याच्या मुद्रेवर आरशांत पडणाऱ्या प्रतिबिंबाप्रमाणें उमटत असे. एक विचार संपावा—त्याचें प्रतिबिंबही नाहींसें व्हावें ! दुसरा विचार सुरू व्हावा,

त्याची छाया मुद्रेवर उमटावी! मी हा चाललेला कल्पनांचा खेळ पहात तटस्थ उभा होतों. वसंताची मुद्रा एकाएकीं अत्यंत विषादपूर्ण दिसूं लागली. त्यानें 'हाय! दैवा, तुझी कोणती इच्छा आहे?' असें म्हणून एक सुस्कारा सोडला. ' मन चिंती तें वैरी न चिंती.' असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. एखाद्या आपत्कालीं मनांत जे नानाप्रकारचे भेसुर तरंग येतात, तशा प्रकारच्या इच्छा आपले शत्रुदेखील धरणार नाहींत. संकटाला धैर्यानें तोंड देण्याच्या-ऐवजीं आपलें मन त्याच्या भाराखालीं वांकून जातें, व राईचा डोंगर दिसूं लागतो; मुंगीला हत्तींचें रूप येतें. जगाचें काळें वस्त्र दिसूं लागतें, व आंतल्या तेजाकडे लक्ष जात नाहीं. प्रत्येक गोष्टी-चा अंत वाईटांतच होणार, असा मनाचा कल असतो. अशा भे-सुर स्थितींत मनुष्य हवालदील झाला तर त्यांत नवल तें कोणतें?

मी वसंताच्या जवळ जाऊन बसलों व त्याच्या गळ्यांत आपला हात घातला. माझ्या मनांतून त्याला चार धीराच्या गोष्टी सांगा-वयाच्या होत्या; पण मी स्वतांच फार घाबरल्यामुळें माझ्या तोंडां-तून शब्दच फुटेना. अखेर मनाचा निश्चय करून मीं बोलण्याला सुरुवात केली. मीं म्हटलें, " वसंत...." पुढें मला बोलवेना. माझा गळा दाटून आला व मी स्वतांच रडूं लागलों; पण माझ्या हेतूचा मागमूस वसंताला लागला. तो मला म्हणाला, " नाना! तुला धीराच्या गोष्टी चांगल्या सांगतां येतात! एकाद्या संकट-समयीं तूं उपयोगीं पडण्याऐवजीं विनाकारण त्या संकटांत सांप-

डलेल्या मनुष्याला घाबरवूनमात्र सोडशील. चल, उगी रहा. धैर्यानें संकटाला तोंड दिलेंच पाहिजे. या जगांत हा प्रसंग माझ्या-वरच प्रथमतः आला आहे असें कांहीं नाहीं." वसंताच्या बोल-ण्यानें माझी मला लाज वाटूं लागली. त्याला मी चार धीराच्या गोष्टी सांगावयाच्या त्याऐवजीं मलाच चार समाधानाच्या गोष्टी सांगणें त्याला भाग पडलें. वसंताच्या इतकें माझें मन प्रगल्भ झालें नव्हतें. तें त्या वेळीं अगदींच कोंवळें होतें. माझ्यावर एका-मागून एक ओढवलेल्या प्रसंगांमुळें मला पर-दुःखाची किंमत जाणतां यावयास लागली असेल, कोणीं सांगावें ?

वसंताची बांधाबांध होऊन निघण्याची तयारी झाली. सुपरिं-टेंडंटला त्यानें ती तार दाखवून सुट्टी मागून घेतली. मी त्याच्याबरोबर स्टेशनावर गेलों होतों. मला एकंदर हकीकतीचें पत्र गेल्याबरोबर टाकण्यास त्याला मीं सांगितलें, व त्यानेंही तें कबूल केलें. 'जर जरूर पडली तर मला ताबडतोब बोलावून घे, कोणतेंही अनमान करूं नको.' असें मीं त्याला बजावलें व त्यानेंही 'मी जरूर पडल्यास तुला बोलवीन' असें वचन दिलें. त्याला चार धीराच्या गोष्टी सांगण्याची जरुरीच नव्हती. कारण, त्याची मुद्रा या वेळीं शांत व गंभीर दिसत होती. इतक्या दिव-सांच्या अनुभवानें त्याचा आपल्या मनावर किती ताबा आहे, हें मला चांगलेंच कळलें होतें, व संध्याकाळीं महाराजबागेंत घड-लेल्या प्रसंगाची आठवणही अजून बुजाली नव्हती. पुढें आम्हीं

ज्यास्तकमी कांहीं बोललों नाहीं. आमचीं अंतःकरणें एकमेकांस उघड उघड दिसत होतीं. यामुळें बोलण्यासारखें कांहींच उरलें नव्हतें. गाडी सुरू झाली. व मीही विषण्ण मनानें वसतिगृहांत परत आलों.

पुढले दोन दिवस मी ज्या मनःस्थितींत घालविले, तिचें वर्णन करतां येणें शक्य नाहीं. वसंताशिवाय एकटा असा मी पूर्वी वसतिगृहांत कधींच राहिलों नव्हतों. त्याच्याबांचून मला करमेनासें झालें. सर्व वसतिगृह उजाड दिसूं लागलें. वसंत, जर सुखासमाधानानें घरीं गेला असता, तर मग इतकें उदास वाटलें नसतें. पण त्याच्यावर आलेला प्रसंग आपल्या भीषण स्वरूपानें माझ्या मनाला भिववीत होता. काय असेल तें असो, ही तार आल्यापासून माझें मन वाइटाकडेच झुकूं लागलें होतें. मला आशाच वाटेना. या दुखण्याचा शेवट वाईटच लागणार, असेंच माझें मन मला ग्वाही देऊं लागलें. यामुळें वसंताकडून पत्र, तार कांहीं तरी येईल, तर बरें होईल, असें मला वाटूं लागलें. कारण त्याच्या पत्रानें माझ्या मनावरचें दडपण कमी झालें असतें.

तिसऱ्या दिवशीं संध्याकाळीं 'Father hopeless come with good doctor' ( बाबांची आशा सुटत चालली, चांगला डॉक्टर घेऊन ये ). अशी तार वसंताकडून आली. मीं लागलीच गांवांत जाऊन डॉक्टर चोळकरांना ती तार नेऊन दाखविली. व रात्रीं अकराच्या गाडीनें भंडाऱ्याला येण्याबद्दल त्यांना विनंती केली. मी नागपूरला आल्यापासून माझी त्यांच्याशीं पुष्कळ ओळख झाली

होती. रात्रीं ११ वाजतां आम्ही भंडाऱ्याचा मार्ग चालूं लागलों. डॉक्टर कबूल केल्याप्रमाणें मला स्टेशनवर भेटले. गाडीमध्यें डॉक्टरनीं गोविंदरावांच्या दुखण्यासंबंधीं माहिती विचारली. पण मला कांहींच माहीत नसल्यामुळें मी त्यांना कांहींच सांगूं शकलों नाहीं. डॉक्टर स्वस्थपणें झोंप घेऊं लागले. मलामात्र मुळींच झोंप येईना. माझ्या मनांत वसंताच्या भावी स्थितीचीं कल्पनाचित्रें व तींही भेसूर अशीं उमटत होतीं.

तीन वाजण्याच्या सुमारास आम्हीं गांवांत जाऊन पोहोंचलों. मागें मी भंडारा येथें आलों होतों, त्या वेळच्या वसंताच्या गृहांत व आजच्या गृहांत जमीनअस्मानाचें अंतर होतें. त्या वेळचें तें गृह होतें, आजमात्र त्याच्यावर स्मशानाची कळा आली होती. आपलें अस्तित्व आपल्या गडबडीनें पटवून देणारे गोविंदराव आसन्नमरण स्थितींत अंथरुणावर पडले होते. त्यांना कशाचीही शुद्ध नव्हती. वसंताच्या गृहांतील लक्ष्मी—वसंताची आई—माझ्या काकू— आज लक्ष्मीप्रमाणें गृहांत वावरत नसून मधून मधून हुंदके देत होत्या. बिचारी यमू कोंपऱ्यांत बसून मुळमुळ रडत होती. वसंताच्या चेहेऱ्यावरलें नेहमींचें तेज पार लोपून त्याऐवजीं भीषण शांति तिथें आपलें ठाणें देऊन राहिली होती. अंतकालच्या शांतीचें कौतुक कोणाला वाटेल ? ती शांति असली, तरी ती आपला जबडा वासून भक्ष्य गिळण्याच्या इच्छेनें निश्चल पडलेल्या अजस्र अजगराप्रमाणें भेसूरच वाटणार !

आम्ही आंत जातांच सर्वत्र सामसूम झालें. डॉक्टरांना पहातांच काकू उठून बाजूला झाल्या. डॉक्टर आपल्या नेहमींच्या हास्य-मुद्रेनं म्हणाले, " घाबरूं नका, मी पहातों त्यांना काय झालें आहे तें." एवढें बोलून ते रोग्यापाशीं जाऊन बसले. वसंतानें गोविंदरावांच्या बाजेपाशीं डॉक्टरांसाठीं एक खुर्ची मांडली. त्यांना रोग्याची परीक्षा करितां करितां वसंताकडून हवी होती ती माहिती काढून घेतली. आठ दिवसांपूर्वीं गोविंदरावांना ताप आला. पण साधा थंडीवाऱ्याचा ताप असेल म्हणून कोणीं तिकडे लक्ष दिलें नाहीं; चार दिवस झाले तरी ताप मुळींच उतरेना; हें पाहून मंडळी घाबरली व त्यांनीं तेथील डॉक्टरला दाखविलें. त्यांनीं नव-ज्वर म्हणून सांगतांच सर्वांची कंबरच खचली. वसंताला तार आली व वसंत पित्याच्या शुश्रूषेकरितां गेलाही. पण त्या दिवशीं गोविंद-राव सकाळपासून शुद्धींत नव्हते. त्यांना श्रम झाला होता व मध्यें मध्यें ते कांहीं तरी बडबडत असत. ताप अंगांत फणफण-लेलाच होता. संध्याकाळीं भंडाऱ्याच्या डॉक्टरनें ' Hopeless 'असें सांगितल्यामुळें वसंतानें मला तार केली होती. रात्रीं बारापासून गोविंदरावांचें बरळणें बंद होऊन त्यांच्यावर ही ग्लानि आली होती, असें वसंताच्या सांगण्यांत आलें.

डॅक्टरांची परीक्षा संपली. त्यांनीं एक कसलेंसें औषध पिच-कारींत भरून तें त्यांच्या आंगांत टोंचलें. नंतर कांहीं वेळ ते स्तब्ध बसले होते. इतक्यांत काकू रडत रडत म्हणाल्या,

"डॉक्टरसाहेब, कसेंही करा व त्यांना आयुष्य द्या. मला एवढी भीक घाला. मला चुडेदान द्या. तुम्हांला पुण्य लागेल. मला आपली धर्माची बहीण समजा." काकू परक्याशीं इतकें बोलणाऱ्या नव्हत. पण, प्रसंगानें अमानुष बळ एकवटतें असें म्हणतात ! काकू रडूं लागल्या. डॉक्टर त्यांना म्हणाले, " छे छे ! तुम्ही अगदीं घाबरूं नका. ईश्वर करील तर त्यांना आराम वाटेल. तुम्हींच घाबरलां तर या मुलांनीं काय करावें ? " एवढें बोलून ते उठले व बाहेर येऊन बसले; वसंतही बाहेर आला व त्यांचा अभिप्राय विचारूं लागला. प्रथम ते कांकूं करूं लागले. पण वसंत म्हणाला, " तुम्हीं खरें असेल तें बेधडक सांगा. माझ्या मनाला मोठा धक्का बसेल, ही भीति मनांत आणून मला उगीच खोटी आशा लावूं नका." यावर डॉक्टर म्हणाले, "It is almost hopeless, but don't frighten the women." (आशा बहुतेक संपली पण बायकांना घाबरवूं नका.) वसंत 'Thank you' म्हणून आंत गेला. जातां जातां डॉक्टरांनीं, 'मी जातों, कांहींच उपयोग आतां माझा होण्यासारखा नाहीं.' असें म्हणून त्याची रजा घेतली. वसंत आंत गेल्यावर 'गोविंद-राव किती तासांचे सोबती आहेत !' म्हणून मीं विचारलें. यावर ते म्हणाले, " फार तर दोन तास."

डॉक्टर निघून गेले. मीही आंत गेलों. मला पहातांच काकू अधिकच रडूं लागल्या. मलाही मन आंवरेना. डोळ्यांतून अश्रु

वाहूं लागले. गोविंदरावांच्याभोंवतालीं सर्व मंडळी बसली होती. त्यांचे डोळे थिजल्यासारखे दिसत होते. हातपाय थंड पडूं लागले. शुद्ध तर केव्हांपासूनच नव्हती. मध्येंच त्यांनीं आपले डोळे उघडले, जरा भोंवतालीं पाहिलें व पुन्हा बुबुळें वर चालतीं झालीं. मोठ्यानें ऊर्ध्व लागला. शेवटची धडपड सुरू झाली. अंतकाळच्या त्या वेदना मला पाहवेनात. वसंताच्या अंगावरदेखील शहारे आले. मृत्यूशीं मनुष्याची चाललेली ती शेवटची धडपड किती थोडा वेळ असते! पण तिच्या भेसुरतेमुळें तो काळ किती तरी दीर्घ वाटतो. ऊर्ध्व बंद झाला. त्यांनीं एकदां मान हलविली व तोंडांतून थोडासा फेस बाहेर पडला! झालें! सर्व कारभार आटोपला! आपल्या पत्नीला, पुत्राला, आपल्या आवडत्या यमूला टाकून गोविंदराव चालते झाले. काळानें त्यांना शेवटचीं चार अक्षरें बोलण्याला देखील सवड दिली नाहीं. गोविंदरावांचा आत्मा नश्वर जग सोडून गेला हें आम्ही सर्व समजलों.

त्या वेळचा हाहाःकार कोण वर्णन करील?

---

## प्रकरण चवदावें.

### वसंताची परीक्षा.

मृत्यूनंतर मनाला जो विषाद उत्पन्न होतो तो वर्णन करतां येणें शक्य नाहीं. पूर्वीं ज्या मनुष्यावांचून आपल्याला क्षणभरदेखील करमत नसतें, त्याच मनुष्याचें शव घरावाहेर त्वरेनें काढ-

ण्याच्या खटपटीस आपण लागतों. आत्मा अमर आहे व शरीर-मात्र नाशवंत आहे या म्हणीचा अनुभव अर्ध्या हिश्शानें त्या वेळीं मनाला पटूं लागतो. ‘ Dust thou art and to dust thon returnest, ’—मातींतून जनन व मातीशीं अखेर मीलन. ’ हें शब्दश: खरें आहे. मेल्या मनुष्याच्या ज्या कांहीं बऱ्यावाईट गोष्टी असतात, त्या सर्व आतां क्रमानें आठवतात, त्याची प्रेमळ मुद्रा समोर दिसते. अशा स्थितींतदेखील तीच मुद्रा, तोच देह—एक ज्योति गेल्याबरोबर नष्ट करण्याच्या तजविजीस आपण लागतों. आपलें आत्म्यावर प्रेम असतें असें म्हटलें, तर मग मनुष्य मेल्यावर आपल्यास दु:ख कां वाटावें ? कारण मरणानें फक्त या शरीराची रक्षा होते. आत्म्याची व त्याच्या गतइतिहासाची आठवण बुजणें अशक्य असतें.

गोविंदरावांच्या कचेरींतील कारकून मंडळी, गांवांतील स्नेही व इतर शिष्ट हळुहळू जमूं लागले. सर्व जण गोविंदरावांचे गुणानुवाद गाऊं लागले व त्यांच्या मृत्यूबद्दल हळहळ प्रदर्शित करूं लागले. ‘ असा मनुष्य लाखांत सांपडावयाचा नाहीं ’ हेंच प्रत्येकाचें म्हणणें. मेल्यानंतर चोरालादेखील साधुपण येतें ! मृत्यूच्या योगानें मनांतील राग, द्वेष क्रोध इत्यादि अनिष्ट विकार पार जळून जातात. मनुष्याच्या अवगुणांवर मृत्यूचें पांघरूण पडतें, व ते स्मृतिनेत्रांना अगोचर होतात. त्याचे गुणमात्र मृत्यूच्या बिलोरी भिंगांतून मोठ्या प्रमाणांत दिसूं लागतात. तेव्हां अशा दुर्गुणशून्य

व गुणवान मनुष्याबद्दल प्रत्येकाला हळहळ वाटली, तर त्यांत नवल कोणतें ?

वसंताचें प्रत्येक जण समाधान करूं लागला. त्या वेळीं तें समाधान अंतःकरणपूर्वकच केलेलें असतें. कारण मृत्यूच्या शिष्टागमनानें हृदयांतील कोमल मनोविकार तत्काळ जागृत होतात, व सहानुभूतीची ज्योति हृदयांत धडधडूं लागते; पण ही स्थिति फारच अल्पकाळ टिकते. तेल नसलेल्या दिव्याप्रमाणें ही सहानुभूतिदेखील तो दुःखकारक प्रसंग डोळ्यांपुढून हालल्याबरोबर नष्ट होते व पूर्ववत् स्वार्थी विचारांचें साम्राज्य मनांत सुरू होतें. पण या क्षणिक सहानुभूतीनेंदेखील बरेंच कार्य होतें. दुसऱ्यांच्या चार प्रेमळ शब्दांनीं दुःखी मनाला धीर येतो, व ज्या मनुष्यावर आपलें जिवापाड प्रेम असतें, त्या मनुष्यासाठीं हळहळ करणारीं दुसरीं माणसें या जगांत आहेत, या एका कल्पनेनेंच दुःखाचें ओझें कमी वाटतें. या क्षणिक बंधुत्व-प्रदर्शनानें हृदयाला इतकें समाधान वाटतें, तर प्रेमाचें साम्राज्य या जगांत सुरू होऊन खरें खरें अनंतकालपर्यंत टिकणारें विश्वबंधुत्वाचें नातें जगभर सुरू झालें, तर सर्वत्र किती आनंदीआनंद होईल! पण तो सुदिन येणार तरी कधीं ?

माधवराव वकीलदेखील समाचाराला आले होते. त्यांना फार हळहळ वाटली. वसंताचें व त्यांचें कांहीं वेळपर्यंत संभाषण चाललें होतें. थोडक्याच वेळानंतर अंत्यविधीची सर्व तयारी

झाली. वसंत, मी व इतर एकदोन मंडळी आंत गेलों. काकू शोक करीत बसल्या होत्या. शरीरांत अजून थोडासा प्राण घुटमळत आहे, असा त्यांना भ्रम उत्पन्न झाला होता. त्या वरचेवर गोविंदरावांचे ओठाजवळ हात नेऊन श्वास चालत आहे का, हें पहात. वरचेवर त्यांची छाती धडधडत आहे का, हें हात लावून पहात. डोळ्यांची कांहीं तरी हालचाल झाली, कुठला तरी भाग हलल्याचा भास झाला, अशा प्रकारचा भ्रम त्यांना होत होता; व त्या भ्रमाला अनुसरून त्यांचें वर्तन चाललें होतें. असा भ्रम होणें हेंच साहजिक आहे. ज्या मनुष्याला आपण आजपर्यंत किती एक वर्षे वापरतांना, जगांतील सर्व व्यवहार नीट रीतीनें करतांना पाहिलें, तेंच मनुष्य एखाद्या मातीच्या पुतळ्याप्रमाणें स्तब्ध पडल्यावरही पूर्वकालच्या स्मृति जागृत झाल्यास त्यांत काय नवल?

गोविंदरावांना उचलल्याबरोबर काकूंनीं हंबरडा फोडला. त्या मूर्छितच झाल्या. यमूही—'माझ्या दादांना कुठे नेतां हो!'—असें म्हणत मोठ्यानें रडत आमच्यापाशीं धावत आली. तिला मीं तशीच परत लावून दिली. कांहीं म्हाताऱ्याकोताऱ्या बायका समाधानाकरितां आल्या होत्या. त्या, काकूंचें व यमूचें समाधान करण्याच्या, व काकूंच्या डोळ्यांना पाणी लावून त्यांना उठविण्याच्या खटपटीस लागल्या. आम्हीं स्मशानाची वाट धारिली.

स्मशानांतील भयप्रद देखावा विसरणें शक्य नाहीं. आपलें म्हणून म्हटलेलें मनुष्य आतां कितीही युगें लोटलीं, तरी त्या स्व-

रूपांत पुन्हा दिसणें शक्य नाहीं, ही खात्री असून त्याचें शरीर अग्नीच्या स्वाधीन करणें किती जड वाटत असतें—मनाला किती दुःसह यातना होत असतात, याची कल्पना प्रसंग पडल्यावांचून करता येणें अशक्य आहे. त्या मनुष्याला पुन्हा पुन्हा एकदां डोळ्यांनीं पाहून घेण्याची अनिवार लालसा उत्पन्न होते, व कांहीं-ही यत्न केले तरी हा मोह आवरत नाहीं. अखेर बरोबरीच्या मंडळीच्यामुळें लवकरच चितेला अग्नी लावणें भाग पडतें, त्या-मुळें आंतड्यांना कसा पीळ पडतो हें ज्याचें त्यालाच ठाऊक. आगीचा डोंबच पहात शून्य हृदयानें बसणें भाग पडतें!

सर्व मंडळीदेखील विषण्ण मनानेंच बसली होती. अशा वेळीं आप-ला देह किती क्षणभंगुर आहे, एक दिवस आपणां सर्वांना मरावयाचें आहे, व आपलीदेखील अशीच स्थिति होणार, हे विचार प्रत्ये-काच्या मनांत येऊन गेल्यावांचून रहात नाहींत. आपला संसार, आपलीं मुलेंबाळें, आपली शेतवाडी—जें जें आपण आपलें म्हणून म्हणतों तें सर्व सोडून जाणें आपणांला भाग पडणार व आपण या जगाला पारखे होणार, ही कल्पना प्रत्येकाच्या मनात उद्भवते. मानवी आयुष्य किती क्षणभंगुर आहे याची जाणीव होते, व या जगांत नीट रीतीनें वागून आपण आपल्या क्षणिक आयु-ष्याचा सद्व्यय करावा अशी इच्छा प्राणिमात्राच्या मनांत त्या ठिकाणीं उत्पन्न होते. हेंच स्मशान-वैराग्य! आम्हांलादेखील हें वैराग्य बाणून गेलें, व देहाचें सार्थक कसें होणार हाच विचार

मनांत खेळूं लागला. आम्हीं परतून स्मशानाचे बाहेर येतांच वैराग्याचा जोर कमी झाला व घरीं येऊन पोहोंचतों तों त्याचा मागमूसही उरला नाहीं.

या सर्व प्रसंगांतून पार पडत असतांना वसंतानें आपल्या मनाची शांति तिळमात्रदेखील ढळूं दिली नाहीं. एकाद्या प्रसंगीं हृदयांतील उमाळ्यांचा जोर असह्य झाला तर त्याच्या मुद्रेवर विषण्णतेची छाया येत असे, पण एका क्षणांत ती नष्ट होऊन पूर्ववत् त्याचें मुख निर्विकार दिसूं लागे. त्याचा आपल्या मनावर विलक्षण ताबा होता. त्याला दुःखच झालें नाहीं हें म्हणणें बालिश होणार आहे. पण त्यानें आपलें दुःख दाखविलें नाहीं, एवढेंमात्र खरें. त्याच्या अंगीं विलक्षण पोक्तपणा आला होता, व एखाद्या पोक्त गृहस्थाप्रमाणें, ' झाल्या गोष्टी त्या थोड्याच परत येणार आहेत ? तुम्ही कितीही रडलां तरी दादा कांहीं परत येणार नाहींत. ते गेले ते सुखांत आहेत, तुम्हींमात्र उगीच रडतां. ' याप्रमाणें ठराविक सूत्रें म्हणून तो आपल्या आईचें व बहिणीचें समाधान करीत असे. आपण रडलों तर आपल्या आईला व बहिणीला अतोनात दुःख होईल व त्यांच्या दुःखाचें शमन होणें कठीण पडेल, या भीतीनेंच त्यानें आपलें दुःख दाबून ठेवलें असावें. त्याच्या मनाची शांति अवर्णनीय होती, यांत कांहीं खोटें नाहीं.

नित्यक्रम सुरळीत चालू झाला. प्रत्येक मनुष्याला आपले व्यवहार नीट चालू करावयास कोणाचा उपदेश लागत नाहीं. तहान-

भूक कोणालाच सुटली नाहीं. अतिशय आपत्तींतदेखील भुकेचा प्रभाव जाणवतो व झोंप न झाल्यास डोळे पेंगूं लागतात. या नैसर्गिक कारणांमुळें जसजसा काळ लोटूं लागतो, तसतशी दुःखाची तीव्रता कमी होऊं लागते. जर ईश्वरानें मनुष्याला भूक, तहान, झोंप वगैरे गरजाच ठेवल्या नसत्या, तर दुःखाची तीव्रता कधींच कमी झाली नसती, व मानवी आयुष्य खडतर झालें असतें. असल्या तऱ्हेचें खडतर आयुष्य सदा सर्वदा सहन करण्याची मनुष्यप्राण्यांत शक्ति नसल्यामुळें जीवनक्रमाचा अंतच झाला असता. Time is the best healer for affliction.—दुःखाला काळाचें मलम बरें करूं शकतें! केवढीही आपत्ति असली, तरी ती काळाच्या प्रचंड प्रवाहांत हळूहळू विरघळूं लागते, आणि दुःखानंतर सुख व सुखानंतर दुःख याप्रमाणें आयुष्यक्रम चालू होतो. सुख किंवा दुःख यांपैकीं कोणतेंही अनंत कालपर्यंत अबाधित राहिलें, तरी जीवित कंटाळवाणें होईल.

या दुःखाच्या परीक्षेंत वसंत उत्तम रीतीनें उत्तीर्ण झाला. धैर्यानें त्यानें आलेल्या आपत्तीला तोंड दिलें व भावि संकटाशीं दोन हात करण्यास तो दंड ठोकून उभा राहिला. मी त्याला एक दिवस ‘ तुला इतकें शांत कसें राहवतें ? ’ म्हणून म्हटलें. यावर त्यानें दिलेलें उत्तर मी कधींच विसरणार नाहीं. तो म्हणाला, “ शांत न राहून काय करणार? शांत रहावयाचें नाहीं, तर काय करावयाचें ? ह्या मानवी शक्तीच्याबाहेरच्या गोष्टी आहेत. ह्यां-

च्याबद्दल काय ईश्वराला दोष देत बसावयाचें? सौख्याच्या दिवसांत त्याला स्मरावयाचेंदेखील नाहीं व दुःखाच्या प्रसंगीं अपयशाचें खापर त्याच्या माथीं फोडावयास तयार व्हावयाचें, हा कुठला अंधेरनगरीतला न्याय? भावि आयुष्यांतील जबाबदारी पार पाडण्याची शक्ति आपल्या अंगीं यावी, म्हणून या परीक्षा ईश्वरानें योजिल्या आहेत. यांच्यांतून नीट निभावून आपल्यला पार पडलें पाहिजे. या कसाला आपल्याला उतरलें पाहिजे, नाहीं तर आपण बुद्धिहीन पशु आहोंत, असेंच आपण आपल्या वर्तनानें सिद्ध करूं. 'नरदेह क्षणभंगुर आहे,' किंवा, 'How frail is human life!' अशा ओळींची घोकंपट्टी केल्यानें ज्ञान होत नाहीं. तर या ओंळी समजल्या, असें जो आपल्या वर्तनानें सिद्ध करून देईल, तोच ज्ञानी—त्यालाच सारें ज्ञान झालें. प्रत्येक मनुष्याच्या आयुष्यांत परीक्षेची वेळ केव्हां तरी येणारच! मग तींतून त्यानें पार पडूं नये, तर काय करावें?" वसंत क्षणभर स्तब्ध राहिला. त्याचें म्हणणें मला पटलें. त्याला उत्तर देण्याला कोणताच मुद्दा मजजवळ नव्हता. असें जरी होतें, तरी मला मागची स्मृति होऊन रडूं कोसळलें. बाबांची व आजीची आठवण झाली. डोळ्यांतून गंगा-यमुना वाहूं लागल्या. वसंत 'हें काय! हें काय!' म्हणून म्हणतच होता. पण त्याच्या बोलण्याचा माझ्या मनावर परिणामच झाला नाहीं. थोडा वेळ अश्रु गाळल्यानंतर माझें मन शांत झालें—मनाचें समाधान झालें! आला प्राणी तो मरणार आहे, या ज्ञानाची सत्यता पटवून

घेऊन मनावर ताबा चालविण्यापेक्षां, आपल्या उमाळ्याला बळी पडून घटकाभर मृताबद्दल अश्रु ढाळणें–हें अज्ञानाचें लक्षण असलें तरी–बरें आहे असें मला वाटलें. मनाला कोण काय करणार?

वसंतानें या आठ दिसांत निरवानिरव केली. घरांतील डागदागिने व इतर दिखाऊ सामान विकून त्यानें पैसा उभा केला. गोविंदरावांचे चार हजार रुपये ब्यांकेंत होतेच. ते व हे मिळून सर्व रकम त्यानें व्याजीं लाविली. दरमहा तीसपस्तीस रुपये येण्याची व्यवस्था झाली. घरच्या मंडळींनीं भंडाऱ्यासच रहावें असें वसंतानें ठरविलें, कारण गोविंदरावांचें–त्यांचें कशाचें, आतां वसंताचेंच–घर भंडाऱ्यास होतें. अर्ध्या घरांत घरच्या मंडळींनीं राहून अर्धें घर कोणाला तरी भाड्यानें द्यावें, असें त्यानें ठरविलें; व त्याप्रमाणें करण्यास त्यानें आपल्या आईला सांगितलें. वसंताला या प्रसंगीं पैशाची मदत करावी व माझा सर्व पैसा तुझाच आहे, असें त्याला सांगावें, असें माझ्या मनांत हजारदां आलें; पण त्याच्या मानी स्वभावाला ही गोष्ट आवडणार नाहीं, इतकेंच नाहीं, तर त्याला आपली हेंटाळणी झाली असेंही कदाचित् वाटण्याचा संभव आहे, या भीतीनें मी कांहींच बोललों नाहीं. आपले विचार आपल्या मनांतच ठेवले. त्याचें मन एकपदावर आलें म्हणजे हळूच संधी साधून आपण त्याच्याजवळ ही गोष्ट काढूं, असें मीं ठरविलें.

और्ध्वदेहिक संपलें. काकूंच्या समजुतीकरितां वसंतानें थोडे-

बहुत औपचारिक विधि कसे तरी केले. आमचे जाण्याचे दिवस आले. आम्ही त्यांच्या निरोप घेऊन नागपूरला जाण्याकरतां निघालों. मायलेकी घरांत एकट्याच राहिल्या. संसार उघडा पडला!

---

## प्रकरण पंधरावें.

### मी बी. ए. झालों.

नागपूरला आल्यावर अभ्यासाला पुन्हा सुरुवात झाली. झालेल्या गोष्टींचें प्रतिबिंब मनावर बरेंच उमटलेलें असल्यामुळें मन पूर्वस्थितीवर येण्याला कांहीं दिवस लागले. पण हळूहळू झाल्या गोष्टी विसरण्याकडेच मनाची प्रवृत्ति होऊं लागली. दुःख तीव्र नसलें, म्हणजे त्याचा परिणाम फार वेळ उरत नाहीं. आमचा पूर्वक्रम लवकरच सुरळीत चालू झाला. वसंतालामात्र बराच पोक्तपणा आला होता. त्याच्यावर हल्लीं संसारांतील जी जबाबदारी पडली होती, तिच्याखालीं तो वांकून गेला होता; त्याचा पूर्वीचा उत्साह बराच कमी झाला होता.

विमलेनें केलेल्या निराशेमुळें माझें मन थोडेंसें अस्वस्थ झालें होतें; पण ती पुढें माझीच होणार या आशेनें माझ्या हृदयांत अंकुर फुटले. नवजीवनाचा संचार झाला; व चार वर्षांनंतर आपलें प्रेममीलन होऊन प्रेमतपश्चर्येची परिसमाप्ति होणार, या विचारानें माझें मन बरेंच शांत झालें. हीं चार वर्षें नीट धीरानें अभ्यास करून घालवावयाचीं व या विरहानंतर—या दगदगीनंतर—पुढें

येणारा आनंद अधिक वाटेल अशी आशा माझ्या मनांत उत्पन्न झाली, व मीही नेटानें अभ्यासास लागलों.

आमची बँक सुरळितपणें चालली होती. पंतांच्या नेतृत्वाखालीं तिची एकसारखी भरभराट चालली होती. बँकेबद्दलची सर्व हकीकत मला पंतांकडून सविस्तर कळत असे. मधून मधून त्यांचीं पत्रें येत त्यांवरून सर्व कांहीं कळे. माझा पैसा सुस्थानीं गुंतला गेला होता, म्हणून माझी व्यावहारिक काळजीही दूर झाली होती. विमलेबद्दल पंतांनीं एकदोनदां चवकशी केली, पण मलाही तिच्या ठावाठिकाणाची माहिती त्यांच्याइतकीच होती, मग मी तरी त्यांना काय कळविणार?

दामू नागपूरला शिकण्याकरितां आला होता. मीं त्याला एका चांगल्या शाळेंत घातलें; व त्याच्यावर नीट नजर ठेवण्याकरितां त्याच्या शिक्षकालाही विनंती केली. दामू शाळेंतील वसतिगृहांत रहात असे. कारण आमच्या वसतिगृहांत त्याला ठेवण्याची परवानगी मिळणें शक्य नव्हतें. दामूबद्दल मला अतिशयच भीति वाटत होती व ती पुढें खरीही ठरली. तो जरी हुशार होता, तरी त्याचा हूडपणा दिवसेंदिवस मर्यादेच्याबाहेर जाऊं लागला होता, व हा हूडपणाच त्याला अखेर भोंवला!

दामूचे विचार किती पोरकट होते, याचें दिग्दर्शन मागें एका ठिकाणीं झालें आहे. अमरावतीला असतांना त्याला घरच्या वडील मंडळींचा धाक होता. इथे जरी मी त्याच्यावर देखरेख करीत

होतों, वसतिगृहाच्या सुपरिंटेंडंटची जरी त्याच्यावर हुकमत चालत होती व शाळेंतील शिक्षकांच्या कह्यांत त्याला रहावें लागत होतें, तरी घरच्या धाकाची या गोष्टींस सर येण्याजोगती नव्हती. घरच्या धाकांत ( Discipline ) असणारी जादू अजब आहे. त्यांत भयापेक्षां आदर व प्रेम यांचाच भाग अधिक असतो. हल्लींच्या शिक्षणपद्धतींत तरी शाळेंतील आदर व धाक निवळ भाडोत्री असतो. मुलांना माहीत असतें कीं, आपली शेंडी मास्तरांच्या हातांत आहे; म्हणून तीं मास्तरांना दचकून वागतात. वर्ग बदलला कीं, त्या मास्तरांविषयींचा आदर कमी होतो, व शाळा बदलली, तर त्या जुन्या गुरूंची आठवणदेखील कधीं होत नाहीं, हा अनुभव पुष्कळांना असेलच. शिक्षकांचेंदेखील हेंच धोरण! आपल्याला पगार मिळत आहे तेवढ्यापुरतेंच चार तास शिकविलें कीं पुरे—संपलें कर्तव्य! हीच प्रत्येक शिक्षकाच्या विचारांची दिशा. पुढें मुलांचें कसेंही होवो, त्याची पर्वा शिक्षकाला नसावयाची.

या व्याख्यांना कोणी अपवाद नसतील, असें माझें म्हणणें नाहीं, पण सर्वसाधारण स्थिति वरील प्रकारची आहे. अशा स्थितींत गुरु-शिष्यांचें प्रेम जमावें कसें? ऋषिकालीं जेव्हां शिष्य गुरुगृहीं अध्यापनाकरितां जात असत, तेव्हां शिष्यांची कर्तव्यतत्परता, गुर्वाज्ञापालन व सत्यभाषण—इत्यादि गुणांविषयीं माहिती वाचली म्हणजे अंतःकरण कसें भरून येतें; व त्या थोर अध्यापकऋषींचें पवित्राचरण, निर्लोभता, निरिच्छता व शिष्यांविषयींचें प्रेम पाहिलें

म्हणजे आजकालच्या भाडोत्री शिक्षकांविषयीं तिरस्कार व कींव उत्पन्न होते.

गुरुशिष्यांचा संबंध फार प्रेमळ—केवळ पितापुत्राप्रमाणें असावा, हें आमचें जुनें ध्येय नवीन पिढीलादेखील 'तत्त्व,' (theory) या दृष्टीनें कबूल होईल. पण आज वस्तुस्थिति कशी आहे इकडे-मात्र आम्हांला कानाडोळा करतां उपयोगी नाहीं. या परिस्थितींत वाढत असलेल्या दामूचा हूडपणा पालटून त्या जागीं सुविचार-रोपटीं वाढलीं नाहींत तर त्यांत नवल तें कोणतें? उलट त्याचे विचार दिवसेंदिवस अधिक अधिक वहावत जाऊन शिक्षकां-विषयीं त्याची बेपर्वाई वाढत चालली.

त्याच्याबद्दलच्या कागाळ्या मधून मधून माझ्या कानांवर येत व त्या त्या वेळीं मी त्याला रागेंही भरत असें. मी रागावलों म्हणजे त्याला वाईट वाटे व त्याचे डोळे पाण्यानें भरून येत. त्याचें मन जात्याच कोंवळें होतें; व या परक्या मुलुखांत माझ्या-शिवाय प्रेमाचें दुसरें मनुष्य त्याला कोणी नसल्यामुळें मी रागाव-ल्यावर त्याचा जीव कासावीस होई. मी पुन्हा असें करणार नाहीं, अशी कबूलीही तो माझ्याजवळ देई, पण सर्व पालथ्या घड्यावर पाणी! आठचार दिवस गेले कीं, त्याच्याबद्दलची दुसरी कागाळी तयारच!

मी हा सर्व प्रकार पंतांना कळवीत होतों. पण त्यांना आपल्या मुलाचा स्वभाव चांगला माहीत होता. ते त्याला पुष्कळ रागावून

पत्रें पाठवीत, किती तरी उपदेश करीत. त्याच्याही मनावर तात्पुरता परिणाम घडत असे. पण वर्गांत धडे सुरू झाले, समवयस्क मंडळींशीं गप्पागोष्टी चालू झाल्या व क्रीकेटच्या खेळांत मन रंगलें कीं, त्याला पंतांच्या पत्रांची आठवण तरी रहात असेल कीं नाहीं, याची मला वानवाच आहे.

एके दिवशीं डायरेक्टरसाहेब दामूच्या शाळेंत आले होते. ते व हेडमास्तर मिळून प्रत्येक वर्गांतून हिंडत होते. ते दोघे जण जेव्हां दामूच्या वर्गांत आले, तेव्हां सर्व मुलें त्यांच्या सन्मानार्थ शाळेंतील नेहमींच्या शिस्तीप्रमाणें उठून उभीं राहिलीं. दामूमात्र बसलाच होता, तो उठून उभा राहिला नाहीं; तेव्हां हेडमास्तरांनीं रागावून त्याला उभा राहण्यास सांगितलें. तो उभा तर राहिला, परंतु उठतां उठतां 'वंदे मातरम्' म्हणून ओरडला! डायरेक्टरसाहेब कांहींच न बोलतां दुसरीकडे निघून गेले.

सर्व मुलांनीं दामूची त्याच्या धैर्याबद्दल वाखाणणी केली. मुलेंच तीं—त्यांना खरें धैर्य म्हणजे काय हें कसें कळणार? त्यांना वाटलें या पोरकटपणांतच धैर्य भरलें आहे. पण यामुळें आमचे दान्याजी अगदीं शेफारले. त्यांना स्वर्ग दोन बोटेंच उरला. दुसरे दिवशीं जेव्हां हेडमास्तरांनीं झालेल्या प्रकाराबद्दल त्याची कानउघाडणी केली, तेव्हां तो भर वर्गांत "ज्याला वंदेमातरम् हा शब्द खपत नाहीं तो देशद्रोही होय! मग तो हेडमास्तर असला तरी काय झालें?" असे शब्द बोलला. आधींच हेडमास्तर

रागावले होते. त्यांत या इंधनाची भर पडली. त्यांनीं या सर्व गोष्टींचा रिपोर्ट करून दामूला शाळेंतून काढून टाकलें. दामूला कोणत्याही शाळेंत घेऊं नये, असा ठराव झाला. शिक्षणाला दामू पारखा झाला.

मला हा सर्व प्रकार दोन दिवसांनीं कळला. झालेल्या अपराधावर दयेचें पांघरूण पडावें, याबद्दल मीं पुष्कळ खटपट करून पाहिली, पण मला मुळींच यश आलें नाहीं. दामूवरही मी पुष्कळ रागावलों. त्यानें आपली चूक कबूल केली. मास्तरांची माफी मागण्यासही तो तयार झाला. पण तेवढ्या प्रायश्चित्तानें पापाचें परिमार्जन होणें शक्य नव्हतें. दामूच्या हातून हूडपणामुळें व सारासार विचाराच्या अभावामुळें अपराध होऊन जात. पण मागून सर्व गोष्टी नीटपणें समजावून दिल्यावर त्याला आपली चूक कळून येत असे. पोरच तें! त्याला पोक्तांचा अनुभव कसा येणार? पण हूडपणाचा अतिरेक झाला व दामूला त्याचें चांगलेंच प्रायश्चित्त मिळालें. झालेल्या अपराधाबद्दल त्याचें भावी शिक्षण संपावें—ही शिक्षा फारच मोठी होती, यांत तिळमात्र संशय नाहीं; पण परिस्थितीपुढें कोणाचा इलाज चालणार? दामू रडत रडत मुंबईला निघून गेला.

मीं सर्व हकीगत नरसोपंतांना कळविली. ते तरी काय करणार? सर्व गोष्टी प्राक्तनानें घडून येतात, आपण त्याबद्दल मनाला दुःख वाटवून घेऊं नये, अशा अर्थाचें पंतांचें त्यावर उत्तर

आलें. मलामात्र खरोखरच फार वाईट वाटलें. एका बुद्धिमान मुलाच्या आयुष्याचें मातेरें व्हावें, व तेंही हूडपणापासून घडून आलेल्या अपराधामुळें—ही कल्पनाच तापदायक वाटूं लागली. त्याचा अपराध होता, पण त्याला चांगली अद्दल घडेल अशी शिक्षा दिली असती, तर काम भागलें असतें. विंचवाचा प्राण जोड्यानें घेतां येतो, त्याला बंदुका आणण्याची गरज नाहीं. कसेंही असो, दामूच्या भावी आयुष्यक्रमावर परिस्थितीचें काळें पोतेरें सारवलें गेलें, एवढेंमात्र खरें !

दामू गेल्यानंतर माझें मन बरेंच उद्विग्न झालें. आपण आपल्याकडून त्याची नीट व्यवस्था लावली, तरी आपल्या अंगावर टाकलेल्या जबाबदारींतून आपण सुखरूपपणें पार पडूं शकलों नाहीं, याचेंच माझ्या मनाला—माझा अन्याय नसतांनादेखील—वाईट वाटे. हळूहळू बहकलेलें मन आंवरून घेऊन तें अभ्यासाकडे लावलें. वसंताचाही अभ्यास जोरानें चालूं लागला. व या दीर्घ परिश्रमाचें फळ म्हणजे आम्ही दोघेही बी. ए. च्या परीक्षेंत पहिल्या वर्गांत पास झालों.

बी. ए. झाल्यावर आमच्या अंगावर एकप्रकारची जबाबदारी येऊन पडली. स्वतांला थोडा मोठेपणा आल्यावर त्या मोठेपणाला शोभण्यासारखें वर्तन आपल्या हातून होतें कीं नाहीं, इकडे लक्ष लागणें स्वाभाविक आहे. कॉन्व्होकेशनच्या वेळीं अध्यक्षाच्या (Chancellor) हातून पदवी घेतांना जी शपथ घ्यावी लागते तिचा

मनावर फारच परिणाम होतो. मला आज जी पदवी मिळाली आहे तिला योग्य असें सदोदित वर्तन करण्याचा मी प्रयत्न करीन, ही शपथपुरस्कर कबूल केलेली गोष्ट विसरणें अशक्य आहे. या आलेल्या जबाबदारीबरोबर मनाला एकप्रकारचें समाधान वाटत होतें. आपणाला जगांत थोडीशी योग्यता आली आहे, वाटेल तिथे गेलों तरी स्वतांच्या पायांवर उभें राहण्याची धमक आपल्या अंगीं आहे, व डोक्यावर इतके दिवस जें परिश्रमाचें ओझें सहन केलें, त्याचा परिणाम चांगला झाला, हे विचार त्या समाधानाच्या मुळाशीं होते.

आतां पुढें काय करावें हाही विचार मनांत घोळूं लागला. माझ्याबद्दल कांहींच प्रश्न नव्हता. वकिलीचा अभ्यास करून बाबांसारखी अमरावतीला वकिली करण्याची माझी लहानपणची महत्त्वाकांक्षा दिवसेंदिवस बळावली होती. त्या महत्त्वाकांक्षेची पूर्णता झाल्यावरच विमला माझी होणार होती. त्यानंतर ती मला भेटणार, असें तिनें आपल्या पत्रांत लिहिलें होतें. त्या दिवसाला आतां दोनच वर्षांचा अवधि राहिला, ही कल्पनादेखील मनांत येऊं लागली. या कल्पनेनें अभ्यास नेटानें करण्याविषयीं मनाला धीर आला, व कसेंही होवो, पहिल्या वर्षींच एल्. एल्. बी. ची परीक्षा पास करावयाची असा माझा ठाम निश्चय झाला.

पण वसंत पुढें काय करणार, हा प्रश्नच होता. कॉलेजांत आल्यापासून आम्हां दोघांची असाधारण मैत्री जमली होती. दोघां-

नाही एकमेकांवांचून दुसरें कांहीं सुचत नव्हतें. गेलीं चार वर्षे आम्ही बरोबरच अभ्यास केला व बसंत एल्. एल्. बी. चा अभ्यास करील तर मला तें इष्टच होतें. कारण त्याच्या कुशाग्रबुद्धीचा मला फायदा मिळाला असता व माझें यश अधिक निश्चित झालें असतें. पण तो वकिलीचा अभ्यास करील, हें मला संभवनीय वाटत नव्हतें; कारण लहानपणापासूनच त्याला ह्या धंद्याचा कंटाळा असे. त्याच्या मनाचा ओढा वाङ्मयाकडे होता व कदाचित् तो भाषाविषय घेऊन एम् ए. ला बसेल अशी कल्पना माझ्या मनांत आली.

वसंत हल्लीं नागपूरला नव्हता. परीक्षा झाल्यानंतर तो लागलाच भंडाऱ्याला गेला होता. मलाही त्यानें आपल्याबरोबर येण्याचा बराच आग्रह केला, पण मला जाणें बरें वाटलें नाहीं. मी नागपुरासच एका 'आश्रमांत' आपला तळ दिला. नरसोपंतांनीं मुंबईला चार दिवस ये, असें मला लिहिलें होतें. पण झालेल्या दामूच्या प्रकारावरून मला त्यांच्याकडे जाण्याची—त्यांना तोंड दाखवण्याची लाज वाटूं लागली. वास्तविक, झालेल्या प्रकारांत माझा कोणताच दोष नव्हता, पण आपल्या अंगावर टाकलेली जबाबदारी जर बिनसली, तर मनाला जें दुःख होतें, तेंच या वेळीं मला लाजवीत होतें.

वसंताला एकदां बोलावून पुढील आयुष्यक्रमाविषयीं बेत ठरवावे अशी माझ्या मनाला अनिवार इच्छा उत्पन्न झाली. पण वसंत

धडपणें आपल्या मनांतले बेत उघड कळवील कीं नाहीं, याबद्दल मला शंकाच वाटत होती. कारण गेल्या चार महिन्यांत वसंताचें वर्तन फारच तुटक होतें. गोविंदरावांच्या मृत्यूपासून वसंत फार उदास झाला होता. अंगावर पडलेल्या जबाबदारीशिवाय दुसरें कांहीं तरी कारण या औदासीन्याच्या मुळाशीं असावें, असें मला वाटत होतें. पण वसंत नीट कांहींच सांगेना. 'विधिलिखित' हें त्याचें ठराविक उत्तर. फारच आग्रह केला तर तो म्हणे, "नाना! तुझ्यावांचून मला कोण आहे? पण तें सांगण्यापासून कांहींच निष्पन्न होणार नाहीं. उलट तुझ्या मनालामात्र फार वाईट वाटेल व माझ्याकरतां तूं कष्टी तेवढा होशील. योग्य वेळ आली म्हणजे मीच आपण होऊन तुला सर्व सांगेन."

पण या वेळीं त्याला बोलावून त्याच्यापासून सर्व खुलासा करून घ्यावयाचा, व त्याच्या मनाला धीर देऊन पुढील आयुष्यक्रमाचे बेत योजावयाचे, असा मीं आमल्या मनाशीं ठाम निश्चय केला. त्याला एल्. एल्. बी. चा क्रम आवडत नसला तरी त्याला एम्. ए. चा कोर्स घ्यावयास भाग पाडावयाचें, व पुढलीं दोन कष्टद वर्षें त्याच्या प्रेमळ संगतींत आनंदानें घालवावयाचीं व मनाला होत असलेल्या चिंतेच्या वेदना त्या प्रेमळ मैत्रीच्या अंजनानें थंड पाडावयाच्या, असा माझा बेत ठरला, व या निश्चयाला अनुसरून, असशील तसा निघून ये, मला तुझ्याशीं कांहीं महत्त्वाच्या विषयावर बोलावयाचें आहे, अशी मीं त्याला तार पाठविली.

वसंत येतो कीं नाहीं ही शंकाच होती. कारण माझ्या मागच्या तीनचार पत्रांचीं उत्तरें त्याच्याकडून फारच तुटक आलीं होतीं, व एकदोन पत्रांचीं तर मुळींच आलीं नव्हतीं. "मी भंडाऱ्याला यंदां तुझ्याबरोबर आलों नाहीं म्हणून तुला राग येऊन तूं माझ्याशीं अबोला धरलास कीं काय ?" असें मीं त्याला रागावून लिहितांच, "तुझ्यासारख्या प्रेमळ मित्राचा राग येणें अशक्य आहे. पण माझी मनःस्थिति अति भयंकर असल्यामुळें माझ्या हातून तुटकपणाचें वर्तन झालें, याबद्दल तूं क्षमा कर." असें त्याचें उत्तर आलें. मनांतला राग तरी असल्या प्रेमळ शब्दांपुढें काय टिकणार ? उलट त्याच्या केंविलवाण्या मनःस्थितीबद्दल मला वाईटमात्र वाटलें. व मनाला अतोनात काळजी लागून राहिली.

या तारेचें उत्तर वसंताकडून कसें काय येतें, याबद्दल मी विचार करीत होतों; तोंच दुसरे दिवशीं सकाळीं मी चहा पीत असतांना हातांत एक लहानशी बॅग घेऊन वसंताची स्वारी दत्त म्हणून उभी राहिली. मी, 'कोण वसंत ! केव्हां आलास ?' असें म्हणून त्याला भेटण्याकरितां पुढें उठून गेलों, पण त्याच्या चेहेऱ्याकडे माझी नजर जातांच मी अतोनात दचकलों. वसंताची मुद्रा प्रेतासारखी फिकट दिसत होती ! माझ्या हृदयाला चरका बसला!

———

# प्रकरण सोळावें.

## वसंताची दुःखकहाणी.

दोघांनाही अतोनात वाईट वाटलें. वसंताचें अंतःकरण कळवळलें, मला अनिवार दुःख झालें. एकमेकांच्या गळ्यांत गळे घालून आम्ही किती वेळ तरी रडत होतों. त्या रडण्यानें हृदयाचें थोडेंफार समाधान झालें. अश्रूंतही प्रचंड शक्ति आहे. दुःखाचें सर्वस्वीं नाहीं तरी थोडेंफार शमन करण्याची शक्ति त्यांच्यांत आहे. रडण्यानें कंठ मोकळा होतो, व डोळ्यांतून अश्रु गळून गळून आधींच तयार झालेल्या वाटेनें हृदयाची कालवाकालव संथपणें बाहेर येऊं लागते. आपल्या मनाला दुःख झालें व आपण जरी तें विवेकानें व धैर्यानें दाबून बाहेर पडूं दिलें नाहीं, तरी प्रेमाचें मनुष्य भेटल्यावर तो विवेक व तें धैर्य हीं पार कोठल्या कोठें नाहींतशीं होतात ! हृदयावरचें दडपण एका क्षणांत बाजूला पडतें. तलावाची पाळ फोडून वाहणाऱ्या पाण्याच्या भीषण लोंढ्याला बांध कोण व कसा घालणार ? वसंताची हीच स्थिति झाली !

थोड्या वेळानें वसंत भानावर येऊन म्हणाला, " नाना, माझ्या प्रेमाची व माझ्या निराशेची हकीकत एकाच वेळीं तुला सांगण्याचें माझ्या कपाळीं आलें आहे. मला असें वाटलें नव्हतें, पण मी डोळे झांकूनच होतों. मी मुद्दामच डोळ्यावर कातडें ओढून घेतलें होतें. मला हा प्रकार अगोदरच कळावयास पाहिजे होता. माझ्या प्रेमाचा शेवट निराशेंत होणार हें पक्कें जाणत

असून मी आपण होऊनच त्या फांसांत सांपडलों—आपण होऊनच आगींत उडी घेतली ! आतां देवाला दोष देण्यांत काय अर्थ ? वसंताच्यानें रडण्याचा हुंदका आंवरवेना. माझीही तीच स्थिति झाली. समाधान करण्याला मुळींच जागा उरली नाहीं, हें मी त्याच्या रोगट मुद्रेवरूनच समजून चुकलों. त्याच्या शब्दांनीं तें कळण्याची आवश्यकता नव्हती. प्रिय मित्रावर कोसळलेल्या आघातामुळें मी किंकर्तव्यमूढ झालों. माझा बी. ए. चा आनंद कोणीकडच्या कोणीकडेच मावळला. भावि मनोराज्याचें चित्र पुसट झालें !

वसंत रडतरडत म्हणाला, " नाना ! माझ्या दुर्दैवाची कहाणी ऐक. ती ऐकून तूं तरी काय करणार ? मी तुला पूर्वींच सांगावयास पाहिजे होतें. पण त्याचा तरी काय उपयोग झाला असता ? जिथे अज्ञानी रूढींचीं बंधनें समाजावर पडलीं आहेत, समाज अंधपरंपरेनें जखडला गेला आहे, तेथें प्रेमाची जादू फोलच ठरणार ! नाना ! माधवराव वकील तुझ्या माहितीचे आहेतच. त्यांची मुलगी शांता हेंच माझ्या प्रेमाचें स्थान ! तीच माझ्या प्रेमाचा विषय ! दुर्दैवाचा वारा आला, प्रीति उन्मळून जमीनदोस्त झाली. आशा जळून दग्ध झाली ! आज मला जिकडे तिकडे उदासीनताच दिसत आहे. माझ्या हृदयाला पीळ पडत आहे; तो कसा हें मला वर्णन करून सांगतां येणार नाहीं. केशवसुतांच्या—

" शूळ कपाळीं, कंडण हृदयीं, कंप शरीरीं भरलासे,
सलिल लोचनीं, शीण अवयवीं, उदासीनता मनीं वसे. "

या ओळींचा अर्थ आज माझ्या प्रत्ययास आला. 'कंडण हृदयीं,' म्हणजे कसें असतें ह्याची मला जाणीव झाली. मी आपलें आयुष्य या निराशापूर्ण जगांत कसें घालवूं?"

वसंताच्या केंविलवाण्या शब्दांचा माझ्या मनावर अतोनात परिणाम झाला. कोणत्याही आपत्तींत वसंताचें धैर्य अढळ असतांनाच मीं पाहिलें होतें. गोविंदराव वारले त्या वेळची त्याची शांत वृत्ति माझ्या मनांत बाणली होती. यामुळें या प्रसंगावर तोडच नाहीं अशी माझी वसंताच्या निराशेनें खात्री झाली. तरी पण बुडता काडीचा आधार घेतो त्याप्रमाणें मीं त्याला म्हटलें, "पण तूं निराश कां होतोस? अजूनही तुझी आशा परिपूर्ण होईल."

वसंत डाग दिल्याप्रमाणें किंचाळून म्हणाला, "अजून? नाना! तूं भ्रमांत आहेस! शांता आतां कुमारी राहिली नाहीं. शांता परस्त्री झाली आहे. तिच्याकडे पाहणें, तिच्याविषयीं विचार करणें, तिचें नांवदेखील आतां उच्चारणें पाप आहे. आज पंधरा दिवस झाले, शांतेचें लग्न झालें! हें लग्न कसचें? ही गुलामगिरी! तिच्या मनांत त्या नवऱ्याविषयीं प्रेमाचा अंकुरदेखील नाहीं. आतां तो पुढें फुटेल, व तीं सुखानें संसार करतील हेंही खरें; पण आज माझ्या हृदयाला ज्या डागण्या लागल्या आहेत त्यांची वाट काय? माझीच कशाला, तिची बिचारीची काय स्थिति झाली असेल, ती तिची तिलाच ठाऊक. देवा!" वसंताच्यानें पुढें बोलवेना.

नीं रडतच म्हटलें, "तुमचें दोघांचें एकमेकांवर प्रेम जडलें असतां माधवरावांसारख्या सुज्ञ गृहस्थानें असें कसें केलें ? त्यांना इतकें कसें उमगलें नाहीं ? त्यांना काय .... .... "

"नाना ! माधवरावांना कशाला दोष देतोस ? त्या तुमच्या रूढींना, त्या तुमच्या शास्त्रांना हरताळ लाव. तो त्यांचा अपराध नव्हे; असला तर तो तुझ्या हिंदुधर्मशास्त्रकारांचा व त्यांना घालून दिलेले नियम अक्षरवरहुकूम पाळणाऱ्या आमच्या अंध समाजाचा ! नाना ! मी आपली प्रेमकहाणी—प्रेमकहाणी कशाची, दुःखकहाणी—आगीनें होरपळून टाकणारी दुःखकहाणी—तुला अथपासून सांगतों.

"माधवरावांशीं आमचा पुष्कळ दिवसांचा घरोबा; व शांती दोन वर्षांची होती तेव्हांपासूनची माझी तिच्याशीं मैत्री. त्या मैत्रीला प्रेमाचें स्वरूप कसें व केव्हां आलें, हें मला निश्चित सांगतां यावयाचें नाहीं; पण शांतीची आई माझ्या आईला, 'हिला तुम्ही आपली सून करून घ्या," असें नेहमीं म्हणे. आम्हां उभयतां मुलांची अशी नेहमीं थट्टा होत असे. मी शांतीला कडेवर घेतलें म्हणजे मला सर्व चिडवीत. पहिल्यांदां मी फार लाजत असें; पण तें पुढें अंगवळणीं पडल्यामुळें मला त्या थट्टेचें कांहींच वाटेनासें झालें. आमच्या प्रेमाचें मूळ हेंच असावें असें वाटतें. वडील माणसांनीं केलेली थट्टा, पण ती आम्हां लहानांना फारच घातक ठरली.

शांती मोठी होऊन शाळेंत जावयास लागली. मीही हाय-स्कुलांत जाऊं लागलों. मी माधवरावांच्या घरीं नेहमीं जात असें. शांती मला किती तरी प्रश्न रोज विचारी. मी तिच्या प्रश्नांचीं उत्तरें किती प्रेमानें देत असें ! पुढें पुढें मी तिला इंग्रजी शिकवूं लागलों. शांतीची आई आमचें कौतुक करीत असे. आमच्यांत गाढ स्नेह उत्पन्न झाला. मी एकाद्या दिवशीं त्यांच्या घरीं गेलों नाहीं, तर कोणालाच करमत नसे; त्यांतल्या त्यांत शांतीला तर तो दिवस जातां जात नसे.

हळूहळू स्नेहाचें प्रेमांत रूपांतर होत चाललें. शांता मोठी झाली. तिला जगांतील बऱ्याच गोष्टी कळूं लागल्या. तिच्या लग्नाविषयीं घरांत विचार होऊं लागले. माधवराव बालविवाहाच्याविरुद्ध होते; पण शांतीच्या आईचा आग्रह चालला होता. घरांत तिच्या लग्नाबद्दल गोष्टी सुरू झाल्या. शांता बारा वर्षांची होती. माझ्या-बद्दल तिच्या मनांत प्रेम उत्पन्न झालें होतें. मला लहानपणापासून काव्याची गोडी; तिलाही तीच गोडी होती. मीं केलेल्या आपल्या वेड्यावांकड्या कविता तिला नेहमीं म्हणून दाखवीत असें. तीही आपलीं गाणीं मला ऐकवी. माझ्याशीं लग्न व्हावें, अशी इच्छा तिला झाल्यास तिचा काय दोष ? तिला कांहींच अडथळा दिसत नव्हता. मी मोठा होतों तरीदेखील मला कोठें कांहीं विघ्न येईलसें दिसत नव्हतें !

मी म्याट्रिक पास झालों. कॉलेजांत शिकावयास लागलों. माझी

प्रीति वाढूं लागली. माझें मन पूर्वींपासूनच काव्याच्या अभ्यासामुळें रोमॅन्टिक (Romantic) बनलें होतें. त्याचा परिणाम माझ्या मनावर दृढ झाला. शांतेची प्रतिमा माझ्या हृदयांत कोरली गेली. शांता पुढेंमागें आपली होणार व आपलें आयुष्य तिच्या प्रेमळ संगतींत मोठें सुखानें जाणार, ही आशा माझ्या मनांत उत्पन्न झाली.

एके दिवशीं या आशेचा अवचित भंग झाला. माझ्या आशेखालील पाया किती कच्चा आहे हें मला कळून आलें. मीं बांधलेला मनोरा केव्हां ढांसळेल याचा नियमच मला वाटेनासा झाला. भीतीनें मी व्याकुळ झालों. एके दिवशीं शांतीची आई माझ्या घरीं आली होती. सहज शांतीच्या लग्नाच्या गोष्टी निघाल्या; तेव्हां शांतीची आई म्हणाली, "काय करावें काकू ? मला या पोरीच्या लग्नाची काळजी लागली आहे. घरांतून पहाणें होत नाहीं. म्हणायला गेल्यें तर म्हणतात अजून काय झालें आहे ? होईल पुढें. अद्यापि संसार करायचें तिचें वय झालें नाहीं. पण काकू तेरा वर्षांची झाली शांता! काय करावें ! तुमचें आमचें गोत्र एक आलें, नाहींपेक्षां वसंताला करून घेण्याबद्दल आम्हीं तुम्हांला सांगितलें असतें. असें सोन्यासारखें स्थळ पाहूं गेल्यानें मिळायचें नाहीं. त्यांनादेखील वसंताच्या हुशारीचें भारी कौतुक वाटतें. पण बाई, या गोत्रापुढें इलाजच नाहीं !"

एक गोत्र आलें म्हणजे लग्न होत नाहीं, हें मला ठाऊकच होतें. पण माझ्यावर बेतेपर्यंत मी या प्रश्नाचा विचारच केला नव्हता.

माधवराव सुधारक आहेत, ते असल्या जुन्या चालीकडे लक्ष देणार नाहींत, अशी मीं आपल्या मनाची समजूत करून घेतली. आमचें प्रेम वाढतच होतें. मागेंच जर कोणीं त्याला बांध घातला असता, तर आज माझी ही दशा कां झाली असती ? माझें मन काबूंतून निघून गेल्यावर तें आंवरण्याविषयीं मला हुकूम झाला. मी तो आतां कसा पाळूं ? मी सर्वस्वीं गोत्यांत सांपडलों.

माधवरावांच्या निश्चयामुळें शांतीचें लग्न बरेंच लांबणीवर पडलें. शांती पंधरा वर्षांची झाली. आमच्या दोघांच्या प्रेमाला बांध घालणारा हा धर्म-राक्षस आहे, ही तिला कल्पनाच नव्हती. आमचें भाषण आतां शब्दांनीं क्वचित्‌च होत असे. पण नेत्रांनीं आमचीं हृदयें एकमेकांना कळत. एखादे वेळीं शांती माझ्याशीं बोलली, तर त्या शब्दांत प्रेमाची जादू दृग्गोचर होत असे. मलादेखील तिच्या प्रेमानें मोह पडला. माझें प्रेम तिच्यावर पूर्णपणें जडलें. हृदयांत रेखलेली प्रतिमा स्थापन झाली. चिकटविलेलें चित्र निघूं शकेल. कोरून काढलेली प्रतिमा कशी नष्ट होणार ?

बाबा होते तोंपर्यंत मी त्यांच्याशीं फारसा बोलत नसें. मला त्यांची भीतिच अधिक वाटे. त्यांचा आमच्यावर धाकच तसा होता. पण आईपाशींमात्र मीं आपलें मन मोकळें केलें. माझ्या प्रेमाची कल्पना तिला झाली. पण तिनें मला हा अविचारी नाद सोडून देण्याचा आग्रह केला. ती म्हणाली, ' वसंत ! सगोत्रांत कुठे लग्न का होतें ? आपण जातीबाहेर पडूं. ' मीं म्हटलें, " पण

आई ! माझें सुखच नष्ट झालें. मी जन्मभर वणवण करीत बैराग्याप्रमाणें भटकलों तर त्या जातींत राहून तरी काय फायदा? आजकाल सुधारक लोक कुठे जुनीं बंधनें पाळतात! माधवराव सुधारक आहेत. ते या असल्या अडचणींना जुमानणार नाहींत. आई ! जर माझें शांतीशीं लग्न झालें नाहीं, तर मी यावज्जन्म लग्न करणार नाहीं. मी एखाद्या विरक्ताप्रमाणें आपलें आयुष्य कंठीन. हें माझें बोलणें फोल नाहीं. मी तुझ्या पायांची शपथ घेऊन सांगतों. माझी स्थिति इतकी करुणास्पद झाली आहे ! आई ! मीं वांचावें अशी तुझी इच्छा आहेना ?"

मातृहृदयच तें ! तें द्रवल्यावांचून कसें राहील? तिच्या मनावर बसलेला जुन्या धर्मबंधनांचा पगडा या पुत्रवात्सल्यानें पार नाहींसा झाला. पुत्रप्रेमानें हृदय भरून आलें. पुत्राला सौख्य कसें व्हावें, या विवंचनेंत ती पडली. माझ्यासाठीं–आमच्या या प्रेमासाठीं खटपट करण्याचें तिनें कबूल केलें. पण हाय ! तिला तसा वेळच मिळाला नाहीं. थोडक्याच दिवसांत बाबा आम्हां सर्वांना सोडून चालते झाले. आईवर दुःखाचा डोंगर कोसळला ! तिचें घराबाहेर पडणें बंद झालें, ती खटपट कशी करणार? विधवांना आजन्म दुष्टा म्हणून घरांत दाबणाऱ्या आमच्या समाजाचा धिक्कार असो ! मनाला झालेलें दारुण दुःख समाजांत वावरल्यानें थोडेंबहुत तरी विसरण्याचा संभव असतो; पण त्यांना ती मोकळीक ठेवलेली नाहीं. आईचें दुःख पाहून माझें हृदय करपून

गेलें. माझ्या प्रेमाची गोष्ट तिच्याजवळ काढण्याचें मला धैर्यच झालें नाहीं.

मी स्वस्थच होतों. पुढेंमागें आपली आशा सफल होईल असा मला भरंवसा होता. पण एके दिवशीं शांतीच्या लग्नाची कुजबुज माझ्या कानीं पडली. मी चकित झालों. लागलीच मी माधवरावांच्या घरीं गेलों. शांतीच्या डोळ्यांत निराशा दिसत होती. लग्नाचा विचार बऱ्याच जारीनें चालला होता. शांतीची आई मला म्हणाली, " वसंत! आमच्या शांतीच्या लग्नाचें ठरत आहे. तूं राहशील ना लग्नाला?" हे साधेच शब्द, पण ते माझें हृदय कापीत गेले. कंपित स्वरानें मीं विचारलें, " अजून पक्कें ठरलें नाहीं ना?" त्या म्हणाल्या, " अजून पक्कें ठरलें नाहीं. पण ठरण्याच्याच बेतांत आहे." हें उत्तर ऐकून मला थोडासा धीर आला व तसाच तडक मी माधवरावांच्या खोलींत गेलों.

मला सर्व लाजाळू, संकोची, नम्र म्हणून वाखाणतात, पण त्या दिवशीं माझ्या स्वभावाचा रंग पार बदलला. संकटांत सांपडलेली गायदेखील वाघावर चालून जाते, असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. मीं निर्लज्ज बनून आपली प्रेमकहाणी माधवरावांच्या कानांवर घातली व हिंदूसमाजाचे सर्व नियम बाजूला गुंडाळून ठेवून मीं स्वतांच शांतीला मागणी घातली. हा संबंध घडला नाहीं तर माझी किती निराशा होईल हें मी त्यांना कळवळून सांगितलें; व सरते शेवटीं मी प्रसंगांत सांपडल्यामुळें मला स्वतांला निर्लज्ज बनून मागणी घालावी लागली, याबद्दल मीं त्यांची माफी मागितली.

माधवरावांचें हृदय बरेंच द्रवलें. पण ही सगोत्राची बाब आडवी होतीच. त्यांनीं मला ती अडचण कळविली. मीं आपल्याकडून पुष्कळ पांडित्य केलें. आपल्यासारख्या विद्वान पुढाऱ्यांनीं जुन्या अंध रूढींना चिकटून राहण्याचें कांहींच कारण नाहीं, असें मीं त्यांना सांगितलें. प्रेमाला बांध घालूं नका, म्हणून त्यांची विनवणी केली, व अखेर आपल्यावांचून मला दुसरा कोणीच तारक नाहीं, असें म्हणून त्यांची करुणाही भाकली. माधवराव विचारांत पडले. 'उद्यां काय तें सांगेन' म्हणून ते मला म्हणाले.

शांतीला हें सर्व कळवून मी घरीं आलों. तो एक दिवस मीं कोणत्या विवंचनेंत, कसल्या मनःस्थितींत घालवला, तें माझें मलाच ठाऊक. माझ्या खटल्याचा निकाल होण्याकरितां मी ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं त्यांच्या घरीं गेलों. या निकालावर माझें सर्व भावी सौख्य अवलंबून होतें. माझी मनःस्थिति किती लवचीक झाली होती! पालीच्या चुकचुकण्यानें मला भीति वाटे व फुलाच्या दर्शनानें माझी आशा जागृत होई! मी माधवरावांच्या घरीं गेलों. तेव्हां आकाश निरभ्र होतें. पश्चिमभागीं अस्तास जाणाऱ्या सूर्यामुळें उत्पन्न झालेल्या विविध रंगांची अवर्णनीय शोभा दिसत होती. फुलें डोलत होतीं. वारा मंद मंद वाहत होता. या सुंदर दृश्यानें माझी आशा जागृत झाली, तर त्यांत नवल तें कोणतें! उल्हासानें मी त्यांच्या घरीं गेलों. माझें प्रेम फलद्रूप होणार अशी खात्री मला वाटूं लागली. पण हाय!

माधवराव म्हणाले, “ वसंत ! मीं पुष्कळ विचार केला. तुझ्या-पेक्षां चांगला अन्य वर शांतीला मिळणें अशक्य आहे, हें मी जाणून आहें. तुला जांवई करण्यांत मलाच काय, पण कोणालाही भूषणच वाटेल. विद्येनें, कुलानें व शीलानें तूं श्रेष्ठ आहेस. मी स्वतां सुधारक आहें. जुन्या अंध चालींचा मी निषेध करतों व त्यांचा उपहास आणि त्याग करतांना मी जगाची पर्वा बाळगीत नाहीं, हेंही खरें. असल्या जुन्या चालींना भिऊन तुमच्या नैसर्गिक प्रेमांत मीं कधींच बंध घातला नसता. पण हा चालींचा प्रश्न नाहीं. हा प्रश्न फार बिकट आहे. सगोत्रांत लग्न कां होऊं नये, हें मला कळत नाहीं. दहा हजार वर्षांपूर्वीं एका ऋषीचे शिष्य असलेल्या लोकांचे वंशजांत आतां लग्न घडवून आणण्याची बंदी असणें म्हणजे निव्वळ जुलूम होय, हेंही पण मी जाणतों. पण आहे या परिस्थितींत असलें लग्न होणें शक्य व इष्ट नाहीं. मला जातीबाहेर टाकून बहिष्कृत करतील ही भीति वाटत नाहीं. पण हा कायद्याचा प्रश्न आहे. हिंदूलॉप्रमाणें (Hindu Law) हें लग्न बेकायदेशीर ठरेल. तुमची संतति बेकायदेशीर समजली जाईल. हें लग्नच नव्हे. या परिस्थितींत सांपडल्यामुळें मला तुला नाहीं म्हणावें लागतें. मला तुझ्यासारख्या सालस मुलाला दुखविणें जड वाटत आहे; पण नाइलाजाची गोष्ट आहे. तूं विवेकी आहेस. मागील गोष्टी तूं विसरून जा. लहानपणच्या या असल्या क्षणिक प्रेमाबद्दल—प्रेम कसलें हें—मैत्रीबद्दल तूं विषाद बाळगणार नाहींस, अशी माझी

खात्री आहे. माझ्या मुलीला व तुलासुद्धां संसारांत गुंग झाल्यावर एकमेकांची ओळखदेखील राहणार नाहीं. "

माधवराव बोलत होते पण त्यापैकीं, माझें दुर्दैव ओढवलें, या गोष्टीशिवाय दुसरें कांहींच माझ्या मनाला दृग्गोचर झालें नाहीं- ' मला नाहीं म्हणावें लागतें, ' या शब्दाशिवाय अन्य माझ्या मनांत खेळेनासें झालें. माधवरावांना प्रेमाची खरी ओळख नसावी; नाहींपेक्षां प्रेम विसरून जा, असें मला त्यांनीं कधींच सांगितलें नसतें- माझ्यावर आकाशाची कुऱ्हाडच कोसळली. दारुण निराशेनें मी खालीं आलों. मला भेटण्याकरितां, काय झालें तें विचारण्याकरितां शांता दारांतच उभी होती. हाय हाय! माझ्या खिन्न चेहऱ्यावरून ती सर्व समजली. आपल्या दुर्दैवाची कहाणी शब्दांनीं तिला कळविण्याची मला जरूरच पडली नाहीं. 'हायरे दैवा!' असें म्हणून ती खालीं पडली. माझ्या मनाला दुःख झालें—प्राणांतिक यातना झाल्या. पण मन कठिण करून मी तिला तसल्या स्थितींतच सोडून घरीं आलों. मला काय वाटलें, हें मला शब्दांनीं सांगतां येत नाहीं.

दुसऱ्या दिवशीं 'तूं कांहीं दिवसपर्यंत आमच्या घरीं येणें इष्ट होणार नाहीं!' अशा अर्थाची प्रेमळ पत्रिका माधवरावांकडून मला मिळाली. पुढचें मी काय सांगूं? शांतीचें लग्न घडून आलें. पुण्याच्या रावसाहेब जोशांच्या मुलाबरोबर शांतीचें लग्न झालें.

शांता आतां परस्त्री झाली आहे. तिच्याबद्दल मीं बोलणें जगाच्या दृष्टीनें पाप ठरेल. हाय हाय! पण माझ्या हृदयांत तिची कोरलेली प्रतिमा आहे, तिजबद्दल जग काय म्हणूं शकणार? व ती प्रतिमा कशी नष्ट होणार?"

## प्रकरण सतरावें.

### विपरीत सृष्टि.

वसंताची दुःख-कहाणी ऐकून माझें हृदय कळवळलें. तो आपली कहाणी सांगत असतांना मी एखाद्या वेड्याप्रमाणें ऐकत होतों. त्याची हकीकत संपली तेव्हां त्यानें एक दीर्घ निश्वास सोडला. मी त्याच्या खांद्यावर आपली मान टाकून अश्रुवर्षाव करूं लागलों. त्याचें समाधान मी कसें करणार? आपल्या प्रेमाची-देखील अशीच दारुण निराशा नाहींना होणार, अशी शंका माझ्या मनांत येऊन गेली. 'मन चिंती, तें वैरी न चिंती.'—माझ्या मनांत कितीक गोष्टी येऊन गेल्या; पण मनुष्याच्या स्वभावांत सर्व दुःखां-वर रामबाण औषध भरलें आहे. तें औषध म्हणजे आशा. ह्या औषधाच्या घुटक्यानें कसलेंही महादुःख समोर आलें तरी त्याला थोडा बहुत तरी आराम पडतो. जेव्हां या जालीम मात्रेचे वळसे संपतात, तेव्हांमात्र जीवन रुक्ष भासूं लागतें व पूर्वींच्याच गोष्टी अधिक विषादानें नेत्रांसमोर दिसूं लागतात. माझी तशीच स्थिति झाली. आशेच्या आधारावर मनांत आलेल्या कुशंकांना मीं तिलां-जलि दिली.

माझ्या मुग्ध कृतीनें मी वसंताचें समाधान करण्याचा प्रयत्न करीत होतों. कारण समाधानाला शब्द उरलेच नव्हते. त्याच्या आयुष्याचा सर्वस्वीं नाश झाला, हें मला स्पष्ट कळत होतें. दुसरा कोणी असता, तर तो ही निराशा लवकरच विसरून पुन्हा आपली विस्कटलेली घडी जुळविण्याच्या उद्योगास लागला असता. पण वसंताची तशी गोष्ट नव्हती. त्याचें मन अतिशय कोंवळें होतें. कोणत्याही गोष्टीचा परिणाम त्याच्या मनावर तेव्हांच होत असे. शांतीची प्रतिमा त्याच्या चित्तांत आमरण राहणार, हें मी जाणून होतों. संसारांत वसंताला कसलेंच बंधन राहणार नाहीं. हें मी उमगलों. पुढेंमागें तो कदाचित् ही गोष्ट विसरेल व दुःखाची तीव्रता कमी होईल, अशी किंचित् आशा मला वाटत होती; पण सध्यां तरी त्याचें समाधान होणें अशक्य कोटींतलें आहे, हें मी पूर्ण जाणून चुकलों.

दुपारची वेळ झाली. जेवणाची घंटा वाजली, तरी आम्ही तसेच बसलेले होतों. अखेर मीं हळूहळू वसंताला उठविलें. आम्हा आमचीं स्नानें आटोपलीं, व दुसऱ्या पंक्तीला जेवावयास बसलों. ईश्वरानें मनुष्यप्राण्याला पोटाची चिंता ठेविली आहे, म्हणून बरें; कारण ही जरूरी इतकी तीव्र असते कीं, वाटेल त्या अडचणी, वाटेल तीं दुःखें गुंडाळून ठेवून मनुष्य पोटाची खळगी भरण्या-करितां बारा वाजतां तडफडून उठतो. जीवनरक्षणाची ही जबाबदारी कोणी कधींच विसरत नाहीं. हळू हळू आमचीं जेवणें झालीं. तो

सर्व दिवस उदासीनतेंतच गेला. पुढें तूं काय करणार, म्हणून मीं वसंताला विचारलें. तो म्हणाला, " सध्यां तरी मीं कांहींच ठरविलें नाहीं. एल्. एल्. बी. होण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं, हें मी तुला बजावून सांगतों. तूं एल्. एल्. बी. हो, वकिली कर, व उमरावतीला राहून पित्याप्रमाणें कीर्ति मिळव. तूं रेखलेला मार्ग योग्य नाहीं असें कोण म्हणेल ? पण माझी स्थिति तशी नाहीं. मला आतां दाही दिशा मोकळ्या आहेत. यमूचें लग्न झालें असतें तर मी आतांच कोठें तरी निघून गेलों असतों. फिरण्यानें माझ्या मनाला शांति मिळेल. तूं दचकूं नको; मी मृत्यूची इच्छा करीत नाहीं. मला या जगांत माझ्या देशबांधवांकरितां पुष्कळ करतां येण्यासारखें आहे. तें केल्यावर—तें करीत असतांनाच—ज्या दिवशीं वरून आमंत्रण येईल त्या दिवशीं मी सुखानें वर जाईन."

मला अतोनात वाईट वाटलें; पण उपयोग काय ? एक दोन दिवस अशाच उदासीनतेंत गेले. एल्. एल्. बी. चे वर्ग भरावयास अजून कांहीं दिवस अवकाश होता. 'चार दिवस भंडाऱ्यास रहावयास चल म्हणजे मला बरें वाटेल.' असा मला वसंतानें पुष्कळ आग्रह केला. वसंताचें मन अशा नाजुक व दुःखद प्रसंगीं यत्किंचित्‌ही दुखवण्याची माझी इच्छा नव्हती. मी वसंताबरोबर भंडाऱ्याला गेलों. या खेपेला आम्हांला कोणताच उत्साह नव्हता. फिरावयाला जाणें आम्हीं सोडून दिलें होतें; कारण वसंताची बाहेर पडण्याची लहर लागत नसे. घरांतल्या घरांत जेवून निजा-

वयाचें किंवा वसंतानें लिहिलेल्या कविता वाचावयाच्या, याशिवाय दुसरा कोणताच उद्योग आम्हांला नव्हता. वसंताची प्रतिभा किती उज्ज्वल आहे, याचीमात्र या खेपेला मला जाणीव झाली. मागें मी त्याच्या दोन चार स्फुट कविता वाचल्या होत्या, व त्या मला आवडल्याही होत्या; पण या खेपेला दुसरा कांहींच उद्योग नसल्यामुळें वसंताच्या सर्व वह्या मीं चाळून पाहिल्या. वसंतानें आजपर्यंत शें-दोनशें कविता लिहिल्या असून त्यांच्यापैकीं बऱ्याच उच्च दर्जाच्या होत्या. कांहीं कविता वाचून हृदय अगदीं द्रवत असे. गेल्या पंधरा दिवसांत वसंतानें लिहिलेल्या कविता फारच भेसुर व कितीही कठोर हृदयाचें पाणी पाणी करून सोडणाऱ्या होत्या. कवीचें हृदय त्यांत मूर्तरूपानें दृग्गोचर झालें होतें.

वसंताच्या वह्या चाळतांना मला त्याची एक गुप्त गोष्ट कळून आली. वसंताच्या वहींत ‘ प्रेमाचा भास ’ अशी एक कविता होती. ही कविता मीं नुक्तीच कोणत्याशा मासिकांत पाहिल्याचें मला स्मरलें. मी त्या दिवशीं मुद्दाम लायब्ररींत जाऊन गेल्या चार महिन्यांचे मासिकांचे अंक चाळून पाहिले. मला जें पाहिजे होतें तें मिळालें. ‘ प्रेमाचा भास ’ ही कविता ‘वसंत’ मासिकांत ‘ नारायण-प्रेमी ’ या सहीनें छापलेली होती. मीं वसंताला विचारिलें. तो म्हणाला, “तुझ्या नांवाचा उपयोग तुला न विचारतां केल्याबद्दल तूं क्षमा करशील या भावनेनेंच मी तें टोपण नांव घेतलें आहे. तुझ्या प्रेमाचा मी भुकेला आहें, व तुझ्या प्रेमामुळें मी तुझा दासही

बनलों आहें." वसंत पुढेंमागें महाराष्ट्रांत प्रसिद्ध कवि होणार, याबद्दल मला तिळमात्रही संशय राहिला नाहीं. त्याच्या महत्त्वाकांक्षेप्रमाणें वाङ्मयाच्या द्वारें समाजाची सेवा त्याच्या हातून चांगल्या प्रकारें होईल अशी माझी खात्री झाली.

यमू घरांच असे. तिची शाळा अजून उघडली नव्हती. उन्हाळ्याची सुट्टी इकडे फार दिवस असल्यामुळें शाळा बरेच दिवस बंद राहतात. गोविंदरावांच्या मरणामुळें यमूचें लग्न लांबणीवर पडलें होतें. वसंताचीं मतें सुधारकी असल्यामुळें तो स्थळें पाहण्याच्या खटपटीस लागला नव्हता, व त्याला तशी फुरसतही मिळाली नव्हती. काकूमात्र यमूचें लग्न लवकर केलें पाहिजे, असा तगादा वसंताच्यामागें लावीत असत; पण तो 'होईल पुढें, सध्यां काय आहे त्याचें? उगीच घाई कशाला?' वगैरे बोलून चालढकल करीत होता. त्याच्या मनांत यमूचें सोळाव्या वर्षावांचून लग्न करावयाचें नव्हतें. यमू आतां बरीच मोठी दिसत होती. बाळपणचा मुग्धपणा जाऊन त्यावर किंचित् उमलणाऱ्या यौवनाची छटा दिसूं लागली होती. यमू एखादे वेळीं कांहीं विचारण्याकरितां वसंताकडे येत असे. तिचा अभ्यास झपाट्यानें चालला होता. ती इंग्रजी चवथें पुस्तक वाचीत होती. यमूच्या शाळेंत फारसें इंग्रजी शिकण्याची सोय नव्हती. इंग्रजी तिसऱ्या चवथ्या पुस्तकापर्यंत फार तर तेथें शिकवीत. व ज्यास्त शिकूं इच्छिणाऱ्या मुली तरी कोठें मिळत होत्या? साधारण मुली मोठ्या होतात न होतात तोंच त्यांना शिकणें सोडून गृहिणी-

पद्दावर आरूढ होण्याकरितां जावें लागतें; पण सुदैवानें अगर दुर्दैवानें म्हणा यमूच्या लग्नाचें लांबणीवर पडलें. यामुळें यमूला आपलें इंग्रजी वाचन वाढविण्याला सांपडलें.

यमूच्या शाळेंत गेल्या वर्षापासून एक फारच हुषार व प्रेमळ मास्तरीण आल्याचें मला वसंतानें सांगितलें. यमूची आणि कमलाबाईची बरीच मैत्री जुळून आली असून त्या यमूला दररोज शिकवितात, असें वसंताकडून मला कळलें. नुकत्याच आलेल्या कमलाबाई तरुण व सुस्वरूप असून अविवाहित आहेत, असें समजलें, यामुळें वसंताची व त्यांची थोडी फार ओळखही झाली होती. नवीन बाईचें बरेंचसें वर्णन ऐकल्यामुळें त्यांना पहाण्याची मला साहजिकच इच्छा झाली. पण माझी इच्छा मनांतल्या मनांतच राहिली. सुट्टीमुळें कमलाबाई थंड हवेकरितां पुण्यास गेल्या होत्या.

यमूला आतां बरेंवाईट कळूं लागलें होतें. पूर्वीप्रमाणें ती मला पाहतांच अगदीं पळून जात नसे. मी आलों म्हणजे तिच्या मुद्रेवर आनंदाची छटा पसरत असे. मला पाहतांच तिचे गाल लज्जेनें आरक्त होत असत. प्रसंगानुसार ती माझ्याशीं बोलतही असे; पण हिंदुबालिकांच्या नैसर्गिक विनयामुळें माझ्याशीं ज्यास्तकमी बोलणें तिला अवघडच वाटत असे. यमूंत झालेल्या या बदलामुळें मला तिची ज्यास्त काळजी वाटूं लागली. यमूचें माझ्यावर प्रेम जडलें असावें, अशी शंका माझ्या मनांत येऊं लागली. जर माझा संशय दुर्दैवानें खराच असेल, तर त्या कोमल बालेच्या मृदुल हृद-

याला धक्का लावण्याचें पाप माझ्या हातून होणार हें मी समजून चुकलों. माझेंच काय, पण कोणत्याही तरुणाचें मन आकर्षण करून घेण्याइतकी यमू सुस्वरूप व सुस्वभावी होती. तिला शिक्षणाचीही चांगली जोड मिळाली होती. पण माझें प्रेम मजजवळ होतें कोठें? मला अंतःकरणच नव्हतें. माझें हृदय विमलेनें केव्हांच काबीज केलें होतें. त्यांत दुसऱ्याला जागा सांपडणें अशक्य झालें होतें. मी या पेंचांत सांपडलों खरा, पण माझा संशय फोल ठरेल, अशी आशा बाळगून मीं तिकडे कानाडोळा केला.

पण दिवसेंदिवस तिकडे कानाडोळा करतां येणें अशक्य झालें. प्रेम व्यक्त करण्याचे जे अनेक मुग्ध प्रकार आहेत, त्यांपैकीं कित्येकांनीं मला यमूचें अंतःकरण स्फटिकाप्रमाणें दिसूं लागलें. तिच्या हृदयांत माझी मूर्ति बाणूं लागली होती, हें मला हळूहळू कळूं लागलें. आपला पाय आतां सुखरूपपणें भंडाऱ्यांतून कसा बाहेर पडेल याचीच मला काळजी पडली. मी चार दिवसांकरितां म्हणून येथें आलों होतों, पण वसंत मला लवकर जाऊं देण्यास तयार नव्हता. लॉ–क्लास उघडण्याला अजून पुष्कळ अवकाश आहे, असें म्हणून तो माझा जाण्याचा बेत हाणून पाडी. मागें मी भंडाऱ्याला आलों होतों, त्या वेळीं निघतांना मीं यमूच्या डोळ्यांत अश्रु पाहिले होते. व त्याच वेळीं हिच्या मनांत माझ्याविषयीं प्रेम उत्पन्न झालें कीं काय, अशी शंका मला क्षणभर आली होती. गोविंदरावांच्या मृत्यूच्या वेळीं मी आलों होतों, तेव्हां त्या दुःख-

परिस्थितींतदेखील प्रेमाचें बीज मला दिसूं लागलें होतें. तें बीज वाढूं नये, त्याचा प्रचंड वृक्ष होऊन मग तो उन्मळून पडण्यापेक्षां तें बीज आपण पाणी न घालतां करपवून टाकावें असें मला वाटलें; व म्हणूनच मी भंडाऱ्याला येण्याचें टाळीत होतों. पण वसंताचें हृदय पिळवटून निघाल्यावर मीं त्याच्या म्हणण्याला नकार देणें अशक्यच झालें होतें. मी आलों, पण ज्या गोष्टीला मी भीत होतों ती माझ्यापुढें दत्त म्हणून उभी राहिली. भंडाऱ्याहून लवकर जावें, ही मनांतली इच्छा. पण जाऊं कोण देतो ?

काकू बिचाऱ्या उदासीन असत. मी त्यांच्याशीं इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलून त्यांचें मन रमविण्याचा यत्न करीत असें. एक दिवस मीं जाण्याची प्रस्तावना केली, तेव्हां काकूंनीं ओघा-ओघानें—मुद्दामच म्हणाना—माझ्या लग्नाची गोष्ट काढली. मी कांहींच बोललों नाहीं. याचा शेवट काय होणार, हें मला स्पष्टच दिसत होतें. मी बोललों नाहीं हें पाहून त्या म्हणाल्या, “ नाना ! तुम्ही आमच्या यमूला पदरांत घ्या व आम्हां सगळ्यांना धन्य करा. ती तुमच्याजोगी नाहीं हें मी कबूल करत्यें; पण तुमच्यासारख्या हिऱ्याजवळ राहिल्यानें ती चांगलीच होईल. तिचीही हीच इच्छा आहे, व आम्हां सर्वांनाही हा संबंध सोन्याहून पिंवळा वाटत आहे. मी तुमच्याजवळ गोष्ट काढूं नये खरी, पण आमच्या घरांत दुसरें कोणीच नाहीं. वसंत आपल्याच दुःखांत चूर आहे; पण त्याला-देखील मनापासून असें घडून यावें म्हणून वाटत आहे. ”

मी कांहीं बोललों नाहीं. यमूसारखी सद्गुणी बालिका मिळाल्यानें संसार खरोखरच सुवर्णमय होईल, व खरा आनंद घरांत नाचूं लागेल, हें मी जाणून होतों. पण हाय! माझें हृदय विमलेनें अगोदरच काबीज केलें होतें. यमू मला अतिशय आवडत होती. पण विमलेवर माझें उत्कट प्रेम जडलें होतें. यमूशीं लग्न करण्याला मी कसा तयार होणार? माझ्याकडून कांहींच उत्तर येत नाहीं, हें पाहून काकू म्हणाल्या, " नाना! तुम्हांला ती आवडत नसली, तर तसें स्पष्ट सांगा. आम्हांला दुग्ध्यांत कशाला ठेवितां? तुम्हांला लाजण्याचें कांहींच कारण नाहीं. कारण तुमचे तुम्हीच पहाणारे आहां. हो, जर आमची यमू तुम्हांला आवडत नसली, किंवा दुसरी एखादी थोरामोठ्याची मुलगी तुम्हांला करावयाची असली, तर तुमच्या आड कोण येणार? तुम्हांला वाटेल तितक्या थोरामोठ्यांच्या चांगल्या चांगल्या मुली मिळूं शकतील. पण यमूलामात्र तुमच्यासारखा पति मिळण्याकरितां तपश्चर्याच केली पाहिजे." यांचें मन आपल्याला दुखविणें भाग पडत आहे, याबद्दल मला किती तरी वाईट वाटलें; पण शक्य तितक्या गोडीनें आपला नकार दर्शवावा असा विचार करून मीं म्हटलें, " काकू, यमू फारच चांगली आहे व वाटेल तो गृहस्थ तिच्याशीं विवाह झाला तर स्वतांला धन्य मानून घेईल. पण माझें मन एका ठिकाणीं आधींच गुंतलें आहे, यामुळें मला नाहीं म्हणावें लागतें. काय करूं? नाहीं म्हणणें माझ्या अगदीं जिवावर आलें आहे. पण...."

मी पुढें घटमळलों. पण माझा नकार ऐकतांच काकू आपल्या कपाळावर हात मारून म्हणाल्या, “ जर आमचें सर्व दैवच फिरलें, तर एवढी गोष्ट तरी कशी सरळ होणार? देवा! आणखी किती छळशील! ” मला तेथें बसवेना. आपण जेथें जातों तेथें लोकांना दुःख देण्याकरितां जातों, या माझ्या विचित्र विधिलिखिताचें मला अतोनात दुःख झालें. मी उदास होऊन वसंताच्या खोलीकडे जाऊं लागलों. मधल्या खोलींत हुंदक्यांचा आवाज जातां जातां माझ्या कानीं पडला. मी आंत डोकावून पाहिलें, तों यमू रडत होती. यमूनें आमचें बोलणें ऐकलें असावें, अशी माझी खात्री झाली. माझ्या पावलांचा आवाज ऐकून यमू दचकून उठली; मी तिच्या दृष्टीस पडलों, तेव्हां ती रडतच पण हळू म्हणाली:— “ आपल्या पायांवांचून मी माझा जीव फार दिवस ठेवणार नाहीं. आपण मागें आलां होतां तेव्हांच मीं आपलें अंतःकरण आपल्या चरणीं अर्पण केलें आहे; आपल्याला ज्यापासून सुख लागेल तेंच आपण करा. ” यमूला पुढें बोलवेना. ती लज्जित झाली; निराशे-मुळें तिच्या शालीन स्वभावाला इतकें धैर्य आलें होतें; पण चार वाक्यें बोलल्यावर तिची तिलाच लाज वाटली, व ती डोळे पुसून घरांत आईकडे निघून गेली.

मी वसंताशीं न बोलतां आपल्या बिछान्यावर तळमळत पडलों. विमलेवर माझें निर्मल प्रेम, पण तिला माझी खात्री पटत नाहीं; तिला तें निर्व्याज वाटत नाहीं. ती माझ्यापासून दूरच आहे.

यमूचें हृदय मीं आपल्याकडे—नकळत कां होईना—आकर्षण करून घेतलें, पण अखेर मीच तिच्या कोमल मनावर चरका देण्यास कारण झालों. वसंत-शांतीचें एकमेकांवर इतकें दृढ प्रेम, पण अखेर धर्मशास्त्रानें त्यांना विभक्त केलें. या सृष्टीचा सर्व क्रम असाच विपरीत ना? देवा! तुझ्या न्यायी नेत्रांना ही विपरीत सृष्टि कशी सहन होते? या विचारांनीं मला रात्रभर झोंप येऊं दिली नाहीं. माझें मन नास्तिक बनण्याच्या पंथास लागलें.

सकाळीं उठून मीं अति दुःखित अंतःकरणानें वसंताचा निरोप घेतला. मी परत नागपुरास आलों. वसंतानें माझ्या जाण्याला या वेळीं कांहींच हरकत घेतली नाहीं. तो सर्व उमजून चुकला.

---

## प्रकरण अठरावें.

### ध्येय हातीं आलें.

एल्. एल्. बी. चे वर्ग सुरू झाले. कायद्याच्या अभ्यासाला सुरुवात झाली. सकाळीं दोन तासच—तेही आठवड्यांतून दोन दिवस—वर्ग भरत असे. अध्यापकांचें व्याख्यान ऐकण्याकरितां येणाऱ्या विद्यार्थ्यांचा वर्गांत मागमूसदेखील नसे. कसेंही करून आपली 'टर्म' भरावी व आपल्याला परीक्षेस बसावयाला मिळावें, या उद्देशानेंच येणारे विद्यार्थी लॉ-क्लासांत दृष्टीस पडतात. यामुळें हा 'फार्स' खरोखर बंद झाला तर बावगें नाहीं. अध्यापकांचेंही शिकवण्याकडे बेताचेंच लक्ष असतें. चांगली 'प्रॅक्टीस' चालत असलेले

बॅरिस्टर महिन्याच्या शेंदोनशें रुपये वेतनाची कितपत पर्वा करणार हें उघड आहे. बेतापुरती 'प्रॅक्टीस' असणारा बॅरिस्टर नेमावा तर कालेजचा आब जातो. अशा स्थितींत विद्यार्थी व अध्यापक यांना परस्परांविषयीं किती सहानुभूति व प्रेम असणार, याची कल्पना कोणालाही करितां येण्यासारखी आहे.

मी दिवसभर रिकामाच असें. अभ्यासाकडे मन लागेना. विमल, यमू व वसंत या तिघांनीं माझ्या विचाराची दिशा आपणांकडे ओढून घेतली होती. यांच्याशिवाय मला दुसरें कांहींच सुचत नसे. वसंतानें कायद्याचा अभ्यास करण्याचें साफ नाकारिलें. कायदा विकणारे दलाल होऊन देशाचा कांहींच उद्धार होणार नाहीं, असें त्याचें प्रामाणिक मत होतें. शिवाय या पेशांत मनुष्याला आपली सदसद्विवेकबुद्धि गहाण ठेवावी लागते, व खऱ्याचें खोटें व खोट्याचें खरें करून दाखविण्यांतच धंद्याची करामत मानली जाते, असें तो नेहमीं म्हणत असे. एम्. ए. चा अभ्यास करण्याचेंदेखील त्यानें नाकारिलें. विश्वविद्यालयांतील भाराभर पदव्या घेऊन कोरडे शंख राहण्यापेक्षां आपल्याला पुढें जो पेशा पत्करावयाचा आहे त्याच्या अनुरोधानें तयारी करण्यांत मनुष्यानें आपला काळ घालवावा, असें तो म्हणत असे; व त्याचें म्हणणें अगदीं खरेंही होतें. कारण पुढें वकील होणाऱ्या मनुष्याला गणितांतील '**ट्रिग्नॉमेट्रीची**' किंवा '**डायनामिक्सची**' काय गरज पडणार? पण हल्लींची शिक्षणपद्धतिच इतकी चमत्कारिक झाली आहे कीं, पुढें एंजीनियर होणाऱ्या

मनुष्याला संस्कृत व इतिहास अवश्य आला पाहिजे, असे आमच्या इकडील विश्वविद्यालयांचे नियम आहेत !

वसंत आपल्याला देशकार्यासाठीं वाहून घेणार, हें ठरल्यासारखें-च होतें. त्याची कामाची दिशामात्र अगदीं साधी व एकान्त-वासाची अशीच होती. व्याख्यानें देऊन देशभक्तीचा दांभिक डांगोरा पिटण्याची पद्धति त्याला आवडत नव्हती. आपल्या राष्ट्राची हल्लीं सर्वच बाजूंनीं नैतिक अवनति झाली आहे व म्हणून नवीन राष्ट्रांतील विचारांना पोषक होईल अशा तऱ्हेचें वाङ्मय उत्पन्न करावयाचें, ही त्याची महत्त्वाकांक्षा होती, व त्या अनुरोधानें जुन्या व नव्या महाराष्ट्र वाङ्मयाचा त्याचा अभ्यास चालू होता. जुनें तेवढें फोल असें त्याचें मत नसून आमची खरी राष्ट्रीय संपत्ति तीच होय असें त्याला वाटे; व त्या धोरणावरच आमचें महा-राष्ट्रीयत्व कोणत्याही प्रकारें न गमवितां पाश्चात्त्य संस्कृतीचा वाङ्म-यांत प्रवेश करून घ्यावा, अशी त्याची विचारसरणी होती. 'आपल्या ठरलेल्या धोरणानें माझा अभ्यास जारीनें चालू आहे.' असें त्याचें मला पत्र आलें होतें.

मला कोणतेंच राष्ट्रीय कार्य करावयाचें नव्हतें. प्रतिभाशाली पुरुषांपैकीं मी कांहीं नाहीं; मी अगदीं सामान्य मार्गानें चालणारा अगदीं साधारण मनुष्य. वडिलांसारखेंच आपण वकील व्हावें, हीच काय ती माझी उच्चतम महात्त्वाकांक्षा; व आतां मी आपल्या ध्येया-च्या बराच जवळ आलों होतों. देशाचें कल्याण होऊं नये, असें

मला वाटत होतें, किंवा अनायासें कांहीं सत्कृत्य करण्याची संधी आली असतां ती व्यर्थ घालवून स्वस्थ बसावें, असें मला वाटे, अशांतला भाग नव्हता. पण त्यासाठींच आपला जन्म आहे, अशीं कृत्यें आपल्या हातून झालीं नाहींत तर आपला जन्म व्यर्थ आहे, अशी माझ्या मनाची भावना झाली नव्हती. मला याबद्दल कोणीं 'देशभक्तीच्या नांवानें पूज्य' म्हणून गौरविलें, तरी त्यांत कांहीं वाईट वाटावयाचें मला कारण नाहीं. खरा प्रकार काय तो मीं निवेदन केला आहे. जगांत सर्वच नेपोलियन होऊं शकत नाहींत, अशांतला हा प्रकार होता. 'एक नेपोलियन तर लाख शिपाई' याप्रमाणेंच हें जग बनलें आहे.

दिवसांमागून दिवस जाऊं लागले. नरसोपंतांकडून ब्यांक उत्तम रीतीनें चालत असल्याबद्दल पत्रें येत असत, व ब्यांकेचा व्यवहार इतक्या उत्तम रीतीनें चालण्याचें उघड कारण म्हणजे नरसोपंत अतिशय नेकीनें सर्व कारभार पहात असत, हेंच होय. एकदोन सर, एकदोन सी. आय्. ई., किंवा दोनचार कॉलेजांतले प्रोफेसर, एकदोन हायकोर्टांतील वकील किंवा ब्यारिस्टर, किंवा गांवांतील एकदोन शिष्ट डॉक्टर मिळून ब्यांक चालविली तर तिची काय दशा होणार, हें बॉंबे ब्यांकिंग कंपनी किंवा क्रेडिट-ब्यांक यांसारख्या ब्यांकांच्या उदाहरणांवरून लोकांच्या लक्षांत आलेंच होतें. " जेनु काम तेनु थाय, बीजा करे सो गोता खाय " या गुजराथी म्हणीप्रमाणें प्रत्येकानें आपापल्या विषयांत लक्ष दिलें,

तर त्याला त्यांत यशःप्राप्ति होण्याचा संभव; नाहींपेक्षां रसातळीं जाण्याला काय उशीर लागणार? कॉलेजांतील संस्कृताच्या अध्यापकाला तो विद्वान् म्हणून डॉक्टरी औषधांची माहिती विचारणें, व गणिताच्या रँगलरला शस्त्रक्रिया करण्याकरितां घरीं बोलावणें, हें जितकें हास्यस्पद, तितकेंच एखाद्या वकिलापासून व्यापारी धोरणाची अपेक्षा करणें आहे. पण आमच्या लोकांची अशी समजूत कोठें आहे? एखादा मोठा मनुष्य असला, म्हणजे तो हुकमाच्या एक्याप्रमाणें कोणत्याही धंद्यांत उत्तम रीतीनें चालूं शकतो, अशीच आमची समजूत! व आमचे धंदे रसातळास जाण्याच्या कारणांपैकीं हेंच मुख्य कारण होय, अशी माझी समजूत आहे. रा. रायकरांनीं हें तत्त्व ओळखलें होतें, व म्हणूनच ब्यांकेचें काम करीत असतांना त्यांनीं आपल्यामागें दुसरा कोणताच उपद्याप लावून घेतला नव्हता. नरसोपंतांनींही त्यांचेंच धोरण पुढें चालविलें होतें; व ब्यांकेचें काम पत्करल्याबरोबर त्यांनीं आपल्या मिळकतीच्या वकिलीच्या धंद्यावर तिलांजलि दिली होती. या धोरणाचा शेवट किती चांगला झाला, हें जगाच्या प्रत्ययास आलें. ज्या सांथींत मोठमोठ्या ब्यांकांचीं दिवाळीं वाजलीं, त्याच प्रसंगांतून आमची ब्यांक अनेक संकटांना न जुमानतां नीट निभावून गेली, एवढेंच नव्हे, तर तिची दिवसेंदिवस अधिकाधिक भरभराट होऊं लागली. मला माझ्या पैशांवर चांगलेंच व्याज मिळूं लागलें. पंतांनीं, 'वाटल्यास आपले पैसे काढून घे, सध्यां आम्हांला कांहींच

अडचण नाहीं,' असें मला कळविलें होतें; पण पैशांच्या बाबतींत त्यांच्यावरच सर्व व्यवस्था सोंपवून मी निर्धास्त झालों होतों. दीड वर्ष कसें भरकन निघून गेलें. माझ्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणें मनाला झालेलें दुःख बाजूला सारून मीं अभ्यास नेटानें चालविला होता. विमलेचें अजूनदेखील आपल्याला पत्र येऊं नये, याबद्दल मला नवलच वाटे. पण तिच्या एकंदर वृत्तीकडे लक्ष पोंचविलें की, ती आपला निश्चय कधींही ढळूं देणार नाहीं, असेंच वाटे. एकदां एल्. एल्. बी. झालों कीं विमला खात्रीनें आपली होणार, या विचारानें मनाला आनंद होई, पण त्याच वेळीं यमूची करुणास्पद स्थिति डोळ्यांपुढें उभी राही. आपल्या प्रेमासाठीं ही बालिका झुरत बसणार, या विचारानें पूर्वी झालेल्या आनंदावर विरजण पडे, व हें जग अशा उलट्या रीतीनें किती दिवस चालणार, याबद्दल मनाचा गोंधळ उडत असे!

पण परीक्षेचा ससेमिरा मागें लागला असल्यामुळें हा उत्पन्न झालेला गोंधळ जागच्या जागींच जिरत असे. अभ्यास चांगला झाला. परीक्षेचे पेपर्सही चांगल्या रीतीनें सोडवितां आले, व त्यामुळें एल्. एल्. बी. पास होण्याची उमेदही वाटूं लागली. मनावरचें ओझें कमी झालें; तरी पण निकाल काय होतो, याबद्दल मनाला धागधूग वाटतच होती. कितीही पास होण्याची खात्री असली, तरी ग्याझिटांत नांव वाचल्याशिवाय मनाला शांतता उत्पन्न होत नाहीं, हें अगदीं खरें आहे. परीक्षा झाल्यावर मी तसाच अलाहा-

बादेहून पुढें बनारसला गेलों. प्रयाग, काशी, अयोध्या, मथुरा, वृंदावन वगैरे सुंदर स्थळें पाहण्यांत मीं आपला वेळ घालविला. मला या ठिकाणीं कांहीं यात्रा करावयाच्या होत्या अशांतला भाग नव्हता. पण दुसरें कोणतेंही काम नसल्यामुळें मनाला विरंगुळा पडावा, या उद्देशानेंच मी फिरत होतों. मनांत यमू व विमला यांच्यासंबंधीं विचार चालूच असत. कारण विचारांना कोण अडवूं शकणार ? त्यांचा ओघ अप्रतिहत चालणारच.

एप्रिल महिन्यांत मी परीक्षेकरितां अलाहाबादेस गेलों होतों, तो जून महिन्याच्या अखेरीस नागपूरला आलों. गंगेच्या पवित्र जलांत विहार केल्यानें माझ्या मनाला शांति आली होती. निरनिराळीं पवित्र क्षेत्रें अवलोकन केल्यामुळें त्या त्या ठिकाणच्या पौराणिक कथांची माझ्या मनांत आपोआप जागृति होऊन मनाला एक प्रकारचें पावित्र्य अनुभविण्यास सांपडत होतें. नास्तिकतेचा लोप होऊन त्या जागीं भक्तीची बारिक कोर चमकूं लागली होती. या पालटलेल्या वृत्तीमुळें पुढील घाव सोसण्याची माझ्या मनाला शक्ति आली असें मला वाटतें. निकालाचा दिवस उजाडला. कांपणाऱ्या हातानें मीं ग्याझीट फोडलें. माझें नांव दुसऱ्या वर्गांत होतें. त्या वेळीं माझ्या मनाला जो आनंद झाला तो वर्णन करितां येणें शक्य नाहीं. माझी महत्त्वाकांक्षा सफळ झाली. बाबांच्याप्रमाणें मीही वकील झालों. माझ्या आजीला—पण हाय! आज ती कोठें आहे ? पण ती कोठेंही असली तरी तिला व बाबांना व माझ्या

परम पूज्य आईला अत्यंत आनंद होईल! स्वर्गांतून तीं आपल्यावर प्रेमाश्रु ढाळतील. आज आपलें कौतुक करावयास या जगांत कोणी नाहीं, या कल्पनेनें झालेलें दुःख स्वर्गांतून पडणाऱ्या काल्पनिक प्रेमाश्रूंनीं बरेंच शमलें व ध्येय हातीं लागल्यामुळें झालेल्या महदानंदापुढें इतर सर्व गोष्टींचा तत्काळ विसर पडला.

विमला आतां माझी होणार, तिच्यांत व माझ्यांत अडथळा करणारें कांहींच बंधन आतां उरलें नाहीं, या आनंदांत मी गर्क होतों. भावी मनोराज्यें रचण्यांत मला वेळाचें भान राहिलें नव्हतें. आपण पुढें काय करूं, विमला भेटल्यावर तिची कशी थट्टा करूं, वगैरे गोष्टींसंबंधीं माझे विचार चालू होते. या आनंदाच्या भरांत माझ्या स्वार्थवृत्ति उचंबळून मला वसंताच्या आणि यमूच्या दुःखांचा अजीबात विसर पडला. पण या स्वार्थाबद्दल मला चांगलेंच प्रायश्चित्त पुढें मिळणार, हें मला त्या वेळीं स्वप्नांतदेखील खरें वाटलें नसतें. माझे काल्पनिक मनोरे जमीनदोस्त व्हावे, अशीच भवितव्यता माझ्या ललाटरेषेवर लिहिली होती!

भाविकालाचा चित्रपट मनुष्यापासून लपला असल्यामुळें कांहीं फायदे होतात, त्याचप्रमाणें कांहीं तोटेही होतात. पुढील संकटांची त्याला तरतूद कारितां येत नाहीं, हा तोटा; पण त्याबरोबर भावी संकटांच्या कल्पनेनें आज पुढें वाढलेलें सुखाचें ताट त्याला दूर लोटून देण्याची बुद्धि होत नाहीं, हा फायदा होय. मी भावी प्रकाराविषयीं बेफिकीर असल्यामुळें आनंदांत गर्क होतों. पास

झाल्याबद्दल मीं एक वसंताला व एक नरसोपंतांना, अशीं दोन पत्रें लिहिलीं.

दोघांचींही पत्रोत्तरें आलीं. दोघांनींही पास झाल्याबद्दल माझें अभिनंदन केलें होतें. पंतांनीं, "तूं आतां लग्न करून संसाराला लागावें अशी आमची उत्कट इच्छा आहे," असें लिहिलें होतें. वसंताकडून मला गेल्या वर्षांत फारशीं पत्रें आलीं नव्हतीं. तो आपल्याच काळजींत व आपल्याच उद्योगांत गढून गेला होता. माझ्या परीक्षेचा अनुकूल निकाल लागतांचमात्र त्यानें मला अत्यंत प्रेमानें एक पत्र लिहिलें. माझी इतक्या दिवसांची महत्त्वाकांक्षा अशा उत्तम प्रकारें व अल्पावधींत सफळ झाल्याबद्दल त्यानें माझ्या अभ्यासाची तारीफ केली. त्यानें लिहिलें कीं, प्रतिकूळ परिस्थिति आली असतांही तूं आपल्या मनाचा समतोलपणा राखून अभ्यास केलास, याबद्दल तुझें जितकें अभिनंदन करावें तितकें थोडेंच आहे. त्यानें असें लिहिलें खरें, पण माझ्या परिस्थितीची त्याला कितपत कल्पना होती, याबद्दल मला वानवाच आहे.

झालें. एकदांचा मी वकील झालों. बाबांच्या पावलांवर पावलें मीं येथपर्यंत तर नीट टाकलीं. पुढेंही त्यांच्यासारखाच नांवलौकिक मिळवावयाचा असा माझा ठाम निश्चय होता. माझें ध्येय म्हणजे हेंच. माझें उदाहरण म्हणजे बाबा! मी जगांत दुसरें कांहींच जाणत नव्हतों.

# प्रकरण एकोणिसावें.

## अकल्पित धक्का.

सनद काढण्याच्या खटपटीला मी लागलों. मला सनद मिळण्यासंबंधीं कोणतीच अडचण पडली नाहीं. माझे वडील अमरावतीलाच वकिली करीत असत. माझें सर्व शिक्षणही याच प्रांतांत झालें होतें, व माझें घरदारही याच प्रांतांत होतें. प्रिन्सिपाल साहेबांचे व इतर एकदोन लोकांचे दाखले घेऊन मीं आपला अर्ज दिला. चारआठ दिवसांत सनद माझ्या हातीं पडणार होती. माझें मनमात्र फार चंचल झालें होतें. विमलेच्या पत्राची मी एकसारखी वाट पहात होतों. विमलेसह अमरावतीला संसार थाटण्याची माझी इच्छा होती. मी तिच्या पत्रासाठीं अधीर झालों होतों; पण त्या अधीरपणांत भरंवसामात्र भरपूर होता. विमला आतां आपली होणार याबद्दल मला तिळमात्रही शंका वाटत नव्हती.

या मनःस्थितींत असतांना पोस्टाच्या शिपायानें एक पत्र माझ्या हातांत आणून दिलें. पत्र बरेंच जाड असून रजिस्टर केलेलें होतें. पत्रावरील सुवाच्य व बारीक इंग्रजी अक्षरावरून तें पत्र विमलेकडूनच आलें असावें, अशी माझी खात्री झाली. मी आनंदित झालों व आनंदाच्या भरांत तें पत्र झपाट्यानें फोडून वाचूं लागलों. पण हाय! आंत पहातों तों सर्वनाश! आनंदाच्या शिखरावरून दुःखाच्या भीषण दरींत त्या पत्रानें मला लोटून दिलें. परीक्षेच्या निकालानंतर माझ्या भाग्याचा कळस झाला, असें मला

वाटत होतें. या जगांत सुखदुःख हे नेहमींचे स्नेही आहेत. ज्या ठिकाणीं सौख्याची सीमा होते, त्याच ठिकाणीं दुःख आपला प्रवेश निर्विघ्नपणें करून घेतें, हा सृष्टीचा नियम तंतोतंत खरा आहे. माझा चार वर्षांचा आशावृक्ष समूळ नष्ट झाला !

झालेला प्रकार विमलेच्या अव्यावहारिक स्वभावाचा परिणाम ! माझ्या हृदयाला मोठा धक्का बसला. माझ्या हृदयावर डागण्या देणारें तें पत्रच मी खालीं देत आहें:—

प्रिय नानासाहेब !

या पत्रानें तुम्हांला अतोनात दुःख होईल, हें मी जाणून आहें; व आपल्यासारख्या प्रेमळ अंतःकरणाला ताप देण्याचें निष्ठुर कृत्य मला करावें लागत आहे, याबद्दल माझ्या हृदयाला होत असलेल्या यातना माझी मीच जाणूं शकत्यें. या जगांत स्वार्थ हेंच खरें ध्येय असतें, तर आपल्या प्रेमाची वांटकरीण होण्यांत मी अतोनात सुख मानलें असतें. माझ्या संकटकालीं आपण मला आपल्या प्रेमाचा आसरा दिला. परमप्रिय बाबांच्या मृत्यूनंतर माझें प्रेम आपण आपल्या प्रेमळ व सहानुभूतिपर स्वभावानें आपल्याकडे ओढून घतलें. चार वर्षांपूर्वी आपण माझी विवाहाला संमति विचारली, त्या वेळीं माझें आपल्यावर अत्युच्च स्थितीप्रत गेलेलें प्रेम नाहीं, असें मीं आपल्याला लिहिलें होतें, पण गेल्या चार वर्षांत माझ्या प्रेमाची वाढ किती व कशी झाली हें मला सांगतां

येत नाहीं. आपण माझें सर्वस्व आहां. मला प्रेमाची व्याख्या कळली आहे. पण ती मला लिहून दाखवितां येत नाहीं.

मी पूर्वींपासूनच अजाण, जगाचा अनुभव नसलेली मुलगी. कांहीं दिवस जगाचा अनुभव घ्यावा व आपण आपल्या पायांवर उभें राहून पहावें, या इच्छेनें आपल्या औदार्याला झिडकारून मीं भंडारा येथील मुलींच्या शाळेंत नौकरी पत्करली. मीं भंडाऱ्याला आल्यावर माझें कमलाबाई असें नांव सांगितलें. कारण माझा पत्ता कोणाला लागूं नये, निदान आपल्याला तरी चार वर्षें लागूं नये, अशी माझी इच्छा होती. बाबांच्या पावलांवर पावलें टाकून वकील होण्याच्या तुमच्या श्रेष्ठ महत्त्वाकांक्षेच्या आड मी येऊं नये, अशी माझी इच्छा होती, व म्हणूनच मीं ही चार वर्षांची मर्यादा ठरविली. कबूल केल्याप्रमाणें मी आज आपल्याला लिहीत आहें. आपण वकील झालां. इतकें असूनही हें पत्र लिहिण्याची मला अतोनात भीति वाटते. कारण हा आनंदाचा निरोप नाहीं;- हें माझें शेवटचें मागणें आहे. येथें आल्यावर माझी गोविंदरावांच्या घरीं ओळख झाली, व ती विशेषतः यमूमुळें. यमू साधारण माझ्याच वयाची व बरीच शिकलेली. मी येथें शाळेंत आल्यावर ती कांहीं दिवस शाळेंत येत असे. पुढें तिचें शाळेंत येणें बंद झालें. पण आमची मैत्री जडली तीमात्र तुटली नाहीं. तिला माझ्यावांचून व मला तिच्यावांचून करमेनासें झालें. मी इतक्या लहान वयांत मास्तरिणीची नौकरी पत्करून एकटी राहिल्यें, या-

बद्दल तिला फार नवल वाटे, व मला कोणी नसेल या कल्पनेनें तिला फार दुःखही होई. मीं माझी हकीकत नांवें गाळून तिला सांगितली होती. आपल्या प्रेमाचामात्र मीं तिला मागमूस लागूं दिला नाहीं. कारण आपली प्रेमळ मूर्ति माझ्या हृदयकपाटांत बंद करून ठेवणेंच मला इष्ट वाटलें

यमूच्या संगतींत माझीं चार वर्षें फारच आनंदांत गेलीं. एक दिवसमात्र मीं आपलें खरें नांव सांगण्यांत फार हुषारी केली, असें मला कळून आलें. कारण, यमूमुळें माझी तिच्या भावाशीं ओळख झाली. वसंतराव हें नांव ऐकतांच मी चपापल्यें. आपल्या एका जिवश्च कंठश्च मित्राचें हें नांव होतें, हें मला ठाऊक होतें. मीं यमूच्या पोटांत शिरून सर्व माहिती तिच्याकडून काढून घेतली. आपली याच वसंतरावांशीं मैत्री असून आपण एकदां भंडाऱ्याला आलांही होतां, असें मला कळलें. मी बरीच सावध झाल्यें. तेव्हां-पासून उन्हाळ्याच्या सुट्टींत भंडारा येथें राहण्याचें मी टाळूं लागल्यें. कारण उन्हाळ्यांत आपण इकडे येण्याचा कदाचित् संभव आहे, असें मला यमूकडून कळलें.

माझी यमूशीं मैत्री वाढत चालली. गोविंदरावांच्या मृत्यूमुळें या कुटुंबावर मोठाच घाला पडला. त्या वेळीं आपण येथें आलां होतां. त्यामुळें गोविंदरावांच्या घरीं जाण्याचें मी टाळलेंच. आपण नसतांना मी एकदां दोनदां संधी साधून समाचाराला जाऊन आल्यें. पण आपण अवचित शाळेंत येतां कीं काय, ही मला भीति पडली होती.

कारण मागें आपण एकदां या शाळेंत येऊन पंचवीस रुपये वर्गणी दिली, हें मला शाळेच्या जमाखर्चाच्या वहीवरून कळलें होतें. पण माझ्या सुदैवानें तसा प्रकार घडला नाहीं. आपण सर्व मंडळींचें समाधान करण्यांत गुंतला होतां.

या कुटुंबाच्या पोषणाचा आधार तुटला. वसंतरावांसारख्या मानी पुरुषाला दुसऱ्याची मदत घेणें जड वाटावयाचें, हें मी ओळखूनच होत्यें. पण ईश्वरानें त्या सर्व मंडळीची पुरती परीक्षा पाहण्याचा विडाच उचलला होता, असें वाटतें. Misfortunes never come singly ( ' छिद्रेष्वनर्था बहुलीभवंति ' ) या म्हणीची सत्यता मला पटली. आमच्या शाळेचे व्यवस्थापक माधवराव वकील यांच्या शांति नांवाच्या सुंदर मुलीवर वसंतरावांचें प्रेम जडलें होतें. शांतीचेंही वसंतरावांवर प्रेम होतें; पण आमचे जुने विधि, आमच्या मोडक्या परंपरा व आमचा सडलेला धर्म, हीं सर्व आडवीं आलीं. प्रेमाचा प्रभाव अति थोर आहे, ही कवींची गर्जना कवितांच्या वह्यांतच राहिली. जुन्या रूढींनीं व अंध परंपरांनीं प्रेमाचा बांध पायांखालीं तुडविला तरी जगाला काय पर्वा ? जग अजून झोंपाच घेत आहे. सगोत्रांतला विवाह कायदेशीर होऊं शकत नाहीं, या पोकळ सबबीखालीं माधवरावांसारख्या सुशिक्षित गृहस्थानें चेंगरून जावें व वसंतरावांची मागणी फेटाळून लावावी, हा अंधेरनगरीचा न्याय हिंदुस्थानांतच शोभतो. अजून तरी आमचे लोक पैशाचा पाठलाग सोडून या घातकी रूढि-

राक्षसिणींचा नायनाट करण्याला सज्ज होतील का ? पण आमच्या लोकांना हें सुचेल तेव्हां खरें ! पैसे कसे मिळवावे व आपला बडेजाव कसा वाढवावा इतकेंच आमच्या लोकांना ठाऊक आहे !

या रूढींचें बंड मोडण्याचा निश्चय वसंतरावांसारख्या पाणीदार मनुष्यानें करावा, यांत कांहींच नवल नाहीं. वसंतरावांचें भावि आयुष्य म्हणजे संसारांतून निरिच्छ होऊन बाहेर पडलेल्या संन्याशाप्रमाणें जाणार, हें ठरलेलेंच आहे. त्यांचा स्वभाव अत्यंत करारी व त्यांची सृष्टिही अत्यंत मनोमय. ज्या ठिकाणीं त्यांनीं आपलें अंतःकरण वाहिलें होतें, त्या ठिकाणीं त्यांची निराशा झाल्यावर त्यांचें दुसऱ्या ठिकाणीं प्रेम जडणें अशक्य आहे. महाराष्ट्रांतील वाङ्मयांत पोंचट प्रेमकथा लिहिण्याचे ऐवजीं राष्ट्रांत नवीन जोम उत्पन्न करणारे लेख लिहून ते देशाच्या उन्नतीसाठीं पुढें सरसावणार. त्यांनीं भावि महत्कार्यासाठीं तयारी करण्याकरितां आज कंबर बांधली आहे. माझें त्यांच्याशीं या विषयावर पुष्कळ बोलणें झालें. संसारांत त्यांनीं पडावें म्हणून काकूंच्या आग्रहावरून मीं त्यांचें मन वळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण सर्व फोल झाला ! त्यांनीं देशसेवेचें अखंड व्रत घेतलें आहे. व ते संन्याशाप्रमाणें आपलें सर्व आयुष्य घालविणार आहेत.

आपल्याला त्यांची ही दुःखकहाणी कळलीच असेल. आणि त्यांच्या भावि आयुष्यक्रमाचीही आपल्याला माहिती झाली असेल. देशाच्या दृष्टीनें झालें हें ठीकच झालें. त्यांच्यासारख्या

बुद्धिमान तरुणाचा उपयोग वाङ्मय-उन्नतीकडे होणार, हें इष्टच आहे. कारण आज महाराष्ट्राला अशाच लोकांची गरज आहे. पैसा मिळवून संसार करणारे लाखों लोक आहेतच. पण त्यांच्या या निश्चयामुळें त्यांच्या कुटुंबाची जी शोचनीय स्थिति झाली आहे, ती पाहिली म्हणजे अंतःकरण कसें भडभडून येतें! गोविंदरावांच्या मृत्यूमुळें काकूंचा आधारच तुटला. एकुलता एक मुलगा तर वैतागून अंगाला राख लावण्याच्या बेतांत आला. बिचारीनें आयुष्यांत सौख्याची तरी कोणती आशा बाळगावी?

झालें दुःख तें थोडें म्हणूनच कीं काय, त्यांत आणखीही दुर्दैवानें एक भर पडली. आपल्याशीं यमूचें लग्न लावून द्यावें, याबद्दल त्यांचे विचार माझी आपल्याशीं ओळखदेखील होण्याच्यापूर्वीं-पासून चालले होते, असें मला यमूकडूनच कळलें. बिचाऱ्या कोमल बालिकेच्या मनांत तेव्हांपासूनच प्रेमोद्भव झाला. अधिक परिचयानें प्रेमाचें मूळ अधिक खोल रुतूं लागलें. आपणांसारख्या प्रेमळ व निष्कपटी मनुष्यावर कोणाचें प्रेम जडणार नाहीं? पण आपल्या चित्तांत, मध्यें पडलेला फरक त्या बिचारीला कसा कळ-णार? ती आपल्या प्रेमाच्या आशेवर दिवस कंठीत होती. आपली प्रीति अनाठायीं नाहीं व तिचा आपल्याला उलट मोबदला मिळेल असा तिला पूर्ण भरंवसा होता. बिचाऱ्या काकूंनाही तीच आशा होती. पण आपण त्यांची तीही आशा तोडून टाकली. पृथ्वी दुभं-गून पोटांत घेईल तर बरें होईल, असें दोघींनाही झालें आहे.

ाकूंच्या शोकाला पारावारच नाहीं. बिचारी यमू आपलें रडें ाहेर दाखवूं शकत नाहीं, पण मनांतल्या मनांत ती अगदीं झुरिला लागली आहे. तिच्या फिकट गालांवरून व खोल गेलेल्या ोळ्यांवरून ती क्षयाच्या दुखणेकऱ्यासारखी दिसत आहे. तिच्या ःखाचेंही परिमार्जन होणें कठीणच.

हा सर्व विपरीत प्रकार पाहून माझें अंतःकरण भडभडून आलें. मू माझी प्रिय मैत्रीण, पण तिला सुखी कसें करावें हें मला सुचेना; लट पक्षीं, मीच तिच्या सुखाआड आल्यें, असें मला दिवसें दिवस ाटूं लागलें. कारण मी जर आपल्या दृष्टीस पडल्यें नसत्यें, तर ात्रीनें आपण यमूशीं लग्न लावून सुखी झालां असतां. यमू हणजे खरोखरच रत्न आहे. पण त्या रत्नाचें योग्य कोंदण मीं ड्सकावून घेतल्याबद्दल मला पश्चात्ताप वाटूं लागला. या दुर्दैवी ुटुंबाला सुखी केल्याशिवाय झाल्या अपराधाची भरपाई होणार ाहीं, असें माझें मला वाटूं लागलें; पण मार्गच सांपडेना. शांति रस्त्री झाल्यामुळें तो मार्ग खुंटला. वसंतरावांचें मन फिरविणें हणजे ब्रह्मदेवाची रेघ फिरविण्याइतकेंच अशक्य कोटींतलें! ाऊन जाऊन राहिली यमूची इच्छा! पण ती पुरविणें म्हणजे मीं ापण होऊन आपल्या पायांवर धोंडा मारून घेण्यासारखें होतें. ाझी अगदीं वेड्यासारखी स्थिति झाली.

या मानसिक तळमळींत गेलें वर्ष युगासारखें गेलें. कांहींच ेश्चय होईना. यमूचें दुखणेंमात्र दिवसें दिवस वाढत्या प्रमाणा-

वर दिसूं लागलें. पोरगी हातची जाते म्हणून काकू उदास झाल्या. डॉक्टर-वैद्यांचीं औषधें चाललींच होतीं; पण मानसिक रोगांवर डॉक्टरांचीं औषधें काय करणार? वसंतराव बिचारे मनांतल्या मनांत तळमळत. आपल्याला सुख नाहीं तर नाहीं, पण बिचाऱ्या एकुलत्या एक बहिणीलादेखील सुख न लाभून तिचा दुःखांत अंत होण्याची वेळ यावी, या विचारामुळें त्यांना कांहींच सुचेना. पण त्यांची धन्यच आहे. इतकी स्थिति झाली तरी त्यांनीं आपल्याला एका शब्दानेंदेखील म्हटलें नाहीं. प्राक्तनावर भरंवसा ठेवून ते स्वस्थ बसले.

आपण माझे जीवनाधार, आपण माझें जीवनसर्वस्वच ! आपणांशिवाय मला सर्व पृथ्वी असार आहे, हें मला ठाऊक होतें. आपलें माझ्यावर अतोनात प्रेम जडलें आहे, हेंही मला ठाऊक आहे. मनांत आणलें असतें तर मी आपल्याशीं विवाह करून सुखी झाल्यें असत्यें व स्वर्गसुखाचा अनुभव या मर्त्यलोकावरच घेतला असता; पण स्वतांच्या पोळीवर तूप कोणीही ओढील. आपल्या स्वार्थावर लाथ मारून दुसऱ्यावर उपकार करणें हीच उच्चपणाची पायरी. यमूला सुख व्हावें या पवित्र उद्देशानेंच मी आपल्या सुखावर तिलांजली देण्यास सिद्ध झाल्यें. त्या दुर्दैवी कुटुंबाला एवढा तरी आशेचा किरण लाभावा, या इच्छेनेंच मी आपल्याला अंधारांत लोटून द्यावयास तयार झाल्यें. मनुष्यानें जर स्वार्थत्यागाचे धडे गिरविले नाहींत, तर त्याचें देवपण कुठे राहिलें? त्याच्यांत व पशूंत मग फरक तरी कोणता ?

प्राणनाथ, ! (कारण, कायावाचामनेंकरून मीं आपल्याला माझें जीवन अर्पिलें आहे.) या हेतूनें प्रेरित होऊन मी आपल्या जिवाचें बरेंवाईट करून घेत आहें. ज्या वेळीं हें पत्र आपल्या हातांत जाईल, त्या वेळीं विमलेचा या मर्त्यजगावर मागमूस-देखील उरला नसेल. पण माझा देह जरी नष्ट झाला, तरी माझा आत्मा नेहमीं आपल्याभोंवतीं घिरट्या घालून आपल्या रक्षणांत तत्पर राहील. आपलें सुख पाहणें हेंच माझ्या आत्म्याला भूषण वाटेल. एक दिवस असा येईल कीं, या मर्त्यशरीरविरहितसृष्टींत आपली गांठ पडेल. तें मीलन चिरकाल टिकेल. येथील मीलन अविनाशी आहे. आपला तो विवाह अनंत कालपर्यंत आपल्याला सुख देईल. कारण माझ्या प्रेमाची परीक्षा आतां आपल्याला होईलच व आपल्या सरलत्वाची मला झालेलीच आहे.

पण हृदयेश्वर ! हें जग सोडण्यापूर्वीं माझी एकच इच्छा आहे, व ती आपण पूर्ण करा! आपण जर माझें ऐकलें नाहीं, तर माझा आत्मा तळमळत राहील ! कारण ज्या कार्यासाठीं मी आपला देह नष्ट करण्यास सिद्ध झाल्यें, तें जर अपुरेंच राहिलें, तर मला किती दुःख होईल, हें आपण जाणतच आहां. आपण यमूचें पाणिग्रहण करून तिला व तिच्या घरच्या सर्व मंडळीला धन्य करा ! त्या बिचाऱ्यांना एवढें तरी सुख लाभू द्या. यमूच्या संगतींत आपल्याला सुख लागेल. तिचें पाणिग्रहण केल्याबद्दल आपल्याला कधींच पश्चात्ताप होणार नाहीं. त्या सर्वांच्या सुखासाठीं, वसंतरावांच्या

मैत्रीसाठीं, यमू दुखण्यांतून उठावी एवढ्यासाठीं, निदान जिच्यावर तुमचें अतोनात प्रेम आहे तिची या मर्त्यजगांतील शेवटची इच्छा म्हणून तरी तुम्ही यमूचें पाणिग्रहण कराच! ईश्वराच्या घरीं तुमची वाहावाच होईल!

प्राणेश्वरा! ही विमल आतां तुम्हांला मर्त्यस्वरूपांत दिसणार नाहीं, हें खरें; पण पुढें आपली भेट होणार हेंमात्र खरें. माझ्या धाडसाबद्दल मला क्षमा करा. मी अजाण म्हणून पाहिजे तर माझी कींव करा. **स्वार्थापेक्षां आत्मत्यागानेंच देवपण कळतें.** व आपल्यावरील माझ्या प्रेमाचा हाच दाखला! आपल्या परीक्षेचा निकाल लागला. आज अखेरचा निश्चय करून हें पत्र लिहिलें-पण आपल्या प्रेमाचा, आपल्या रम्य मूर्तीचा लोभ सुटेना. मनाचा निश्चय करून, आपला फोटो हृदयाशीं धरून मी माझ्या देहाचें विसर्जन करीत आहें. आपल्याला हें पत्र मिळेल, त्या दिवशीं मी अदृश्य रूपानें आपल्याभोंवतींच असेन. शेवटची इच्छा काय हें-मात्र आपण विसरूं नका.

याशिवाय, माझे बाबा माझी वाट पहात असतील. त्यांचें माझ्यावर अत्यंत प्रेम असे व नाइलाजामुळें त्यांना मला सोडून जावें लागलें. मला सोडून जातांना त्यांच्या हृदयाला किती दारुण यातना झाल्या असतील हें एक देवच जाणे. त्यांना मी व मला ते अशा स्थितींत आम्हीं दहा वर्षें काढलीं. माझ्यावांचून त्यांना करमत नसेल. माझ्या आईलादेखील मला पाहण्याची किती उत्कंठा लागली

असेल. मलादेखील तिला पाहवेंसें वाटतें. प्राणनाथ! माझ्या जाण्यांत हाही एक हेतु आहे. त्यांचें–बाबांचें व आईचें–समाधान माझ्या भेटीनें खास होईल. माझ्यावांचून त्यांना मायेचें दुसरें कोण आहे?

हृदयदेव! मी चालल्यें. उगीच वाईट वाटून घेऊं नका. आपली भेट–आपलें चिरमीलन होईलच. तोंपर्यंत—

आपली दासी
विमला.

---

## प्रकरण विसावें.

### नवी विटी, नवें राज्य.

पत्र वाचून माझ्या अंतःकरणाला ज्या वेदना झाल्या त्यांचें वर्णन माझ्या लेखणीनें होत नाहीं. माझ्या सर्व आशा नष्ट झाल्या. माझ्या प्रेमाचा आधार गेला. सर्व जीवन प्रीतिशून्य झालें. मनाला भयंकर धक्का बसला! विमलेच्या थोर स्वभावाची पूर्ण पारख झाली. मनोमय सृष्टींत विहार करणाऱ्या या रम्य बालेचें परोपकारी हृदय पाहून माझी मला लाज वाटली. पण हें तिचें करणें म्हणजे एकंदर मानवी स्वभावाच्याविरुद्धच झालें. विमलेला जर जगाचा थोडा तरी अनुभव असता, तर आपल्या प्रेमसर्वस्वावर तिनें अशी कधींच लाथ मारली नसती. माझें मन भांबावलें. मला

वेडच लागलें असें म्हटलें तरी चालेल. डोळ्यांपुढें अंधारी आली. काजवे चमकूं लागले. मी क्षणार्धांत बेशुद्ध होऊन पडलों. हा प्रकार लिहावयाला जितका वेळ लागला, त्याच्या पाव हिश्शांतच हा सर्व प्रकार घडूनही चुकला.

बऱ्याच वेळानें माझी धुंदी उतरली. विवेकबुद्धि ठिकाणावर आली. विचारशक्ति जागृत झाली. भंडाऱ्याला जाऊन विमलेला शोधावें म्हणजे कदाचित् ती मिळण्याचा संभव आहे, असेंही एकवार मनाला वाटलें; बाकी तिच्या पत्रावरून ही कल्पना किती फोल होती, हें उघड उघड दिसत होतें. पण बुडत्याला काडीचा आधार वाटतो, त्याप्रमाणें माझ्या मनाची स्थिति झाली होती. मी लगबगीनें भंडाऱ्याला जाण्याकरितां स्टेशनाची वाट धरिली.

गाडी मिळाली. मी भंडाऱ्याची वाट चालूं लागलों. मनांत ती मिळेल का, हेच विचार चालू होते. एखादी अकल्पित गोष्ट घडून येऊन तिचा जीव वांचला असेल असेंच मनाला वाटे. इतक्या-जवळ ती असून माझ्या तें ध्यानींमनींदेखील येऊं नये या भवि-तव्यतेबद्दल मी आपल्या प्रारब्धाला दोष देत बसलों होतों. अथवा प्रारब्धाचा तरी काय दोष? जो प्रकार घडला तो विमलेच्या आप-खुषीनेंच घडला. हाय हाय! माझ्या सर्व आशा अशा फोल होतील, असा संशय मला स्वप्नांतदेखील कधीं आला नाहीं. नेत्र अश्रूंनीं भरलेल्या स्थितींतच मी भंडाऱ्याला आलों व तडक गांवची वाट धरली. प्रथम मी मुलींच्या शाळेंत गेलों. आज चार वर्षांनीं

मी या शाळेंत आलों होतों. पण आज मी कोणत्या मनःस्थितींत आलों ! चौकशी करतांच माझें कपाळ चार दिवसांपूर्वींच फुटलें असल्याबद्दल मला कळलें. अशी बातमी खोटी तरी कशी होणार? जर वाईट बातम्या खोट्या ठरायला लागल्या, तर या पृथ्वीवरील मर्त्यपणा नाहींसा नाहीं का होणार?

शाळेंतून मी वसंताच्या घरीं आलों. तेथील दृश्य पाहतांच माझ्या हृदयांत चर्र झालें. इतका वेळपर्यंत मी आपल्या दुःखावेगांत यमूच्या दुखण्यांची हकीकत पार विसरून गेलों होतों. यमू आजारी असली तरी तें दुखणें विमलेनें लिहिल्याप्रमाणें क्षयावर गेलें नसेल अशी मला आशा होती. माजघरांत गेल्यावर यमूचा चेहरा पाहतांच माझ्या डोळ्यांतून भरकन टिपें गळायला लागलीं; इतकी ती अशक्त व फिकट दिसत होती. बांगड्या कोंपरापर्यंत गेल्या होत्या. निजल्या निजल्या चलनवलन करण्याचीसुद्धां तिला फारशी शक्ति राहिली नव्हती. वसंत जवळच एका आरामखुर्चीवर सचिंत बसला होता. काकू एकीकडे घोंगडीवर निजल्या होत्या. हा सर्व प्रकार पाहून विमलेच्या पत्राची सत्यता मला कळली, व तिच्यासारख्या प्रेमळ व उदार हृदयाची ओढाताण कशी झाली असेल याची मला योग्य जाणीव झाली. मी आंत गेलों तेव्हां यमूचे डोळे मिटलेले होते; पण माझी चाहूल लागल्यामुळें तिनें डोळे उघडले. माझ्याशीं दृष्टादृष्ट होतांच त्या तशा स्थितींतही तिच्या चेहऱ्यावर आनंदाची छटा दिसूं लागली. मुद्रा

किंचित् हंसरी झाली. थोडीशी लाजून मला 'कधीं आलांत?' म्हणून तिनें हळूच मानेनें विचारलें? मी उत्तर देणार इतक्यांत वसंताचेंही लक्ष मजकडे गेलें. तो उठून उभा राहिला. आम्हीं एकमेकांचा हात घट्ट धरला; तेवढ्यानें प्रत्येकाचें हृद्गत दुसऱ्याला कळून चुकलें. बोलण्याची जरूरीच उरली नाहीं.

मी तेथेंच दुसरी खुर्ची घेऊन बसलों. बालिकेचें मुख माझ्या येण्यानें प्रफुल्लित झालें होतें. स्त्रीच्या हृदयांत किती गाढ प्रेम वसत असतें, याची मला नीट कल्पना झाली. प्रेमाच्या बाबतींत पुरुष फार खालच्या दर्जाला लागेल असें मला वाटलें. आमचें प्रेम नेहमींच स्वार्थी व परिस्थितीच्या भोंवऱ्यांत सांपडलेलें! स्त्रीचें-मात्र स्वतंत्र व स्वर्गीय वातावरणांत वाढलेलें असतें अशी माझी खात्री झाली. खरें प्रेम कुठे राहतें असा जर मला कोणीं प्रश्न केला, तर तें स्त्रीच्या हृदयांत राहतें, असें उत्तर बिनधोक मी कोणालाही देऊं शकेन.

मी किती वेळ तरी यमूकडे पहात स्वस्थ बसलों होतों. माझ्या मनांत विमलेच्या शेवटच्या इच्छेविषयीं विचार चालले होते. यमूची स्थिति माझ्या नजरेसमोर दिसतच होती. तिची इच्छा सफल न झाली तर ती वांचणार नाहीं, हें मला कळून चुकलें. त्याच ठिकाणीं, त्याच मनःस्थितींत यमूबरोबर आपल्या आयुष्याची सांगड बांधण्याचा मीं निश्चय केला. मला कोणी हृदयशून्य म्हणतील, विमलेवर माझें खरें प्रेम नव्हतें असेंही कोणी ठरवतील; पण

मी त्या सर्वांना हेंच सांगतों कीं, हे तर्क निराधार आहेत. माझें विमलेवर प्राणापेक्षांही अधिक प्रेम होतें, व अजूनही आहे. पण ईश्वरानें माझ्या हृदयाला कोमलता दिली आहे, ती मीं गमाविली नसल्यामुळें यमूशीं लग्न करावें. असेंच मला ठरवावें लागलें. मीं यमूशीं लग्न लावण्याचें ठरविलें, यांत कदाचित् कोणाला नवल वाटणार नाहीं; पण इतक्या लवकर माझ्या मनाची अशी तयारी झालेली पाहून ते नाकें मुरडतील. कारण विमलेच्या मृत्यूमुळें मनाला झालेली जखम अजून ताजीच होती. पण याचें उत्तर मी एकच देऊं शकेन,—" **दुःखाच्या भूमींत सहानुभूतीच्या जलानें प्रेमाचें बीज झपाट्यानें उगवतें.**" हेंच त्या प्रश्नाचें उत्तर!

मीं यमूचा हात आपल्या हातांत घेतला. माझ्या हातांतून आपला हात सोडवून घेण्याचा तिनें थोडासा प्रयत्न केला, पण तो वरपंगीच होता. मीं तिचा हात तसाच आपल्या हातांत धरून म्हटलें, "यमू! काय ही तुझी दशा? तूं बरी कधीं होणार?" 'मला बरें होऊन काय करावयाचें आहे?' असें उत्तर आलें. मी हळूच म्हणालों, "पण माझा मागचा विचार बदलला असला तर— माझें मन जर डळमळलें असलें तर? मनुष्याचें मन सदा सारख्या स्थितींत राहत नाहीं." असें म्हणून मी वसंताकडे वळलों, पण तो केव्हांच तेथून चालता झाला होता.

"देवा! हें स्वप्न तर नाहींना? कां ही माझी फसवणूकच आहे? कारण माझें भाग्य इतकें कुठचें उदयास यायला बसलें आहे!" असें म्हणून यमूनें दीर्घ निश्वास टाकला.

माझ्या डोळ्यांतून अश्रु टपाटप गळूं लागले ! मीं म्हटलें, "यमू ! तुला फसविण्याइतका निर्दय मी खास नाहीं. मी सर्वस्वीं तुझा आहें. तुझ्याबरोबर माझें भावि आयुष्य कंठण्याचा मीं विचार केला आहे. आतां तूं बरी होशील ना ? जर माझ्या शब्दावर तुझा विश्वास नसेल तर हें घे वचन." असें म्हणून मीं तिच्या हातावर हळूच चापट मारली. यमूला अत्यानंद झाला. तिच्या मुद्रेवर समाधानाचें मधुर हास्य चमकूं लागलें. ती हळूच म्हणाली, "आतां मला जगलेंच पाहिजे. पण गडे ! आई काय करीत आहे ? अन् इकडच्या स्वारीचा असा एकाएकीं निश्चय तरी कसा ढळला ?"

"यमू ! तूं बरी झालीस, म्हणजे तो प्रकार तुला स्वस्थतेनें सांगेन. सध्यां मीं जेवढें सांगितलें, तेवढ्यानें तुझें समाधान नाहीं का होत ?"

यमू हासूं लागली. तिच्या गालावर मीं हळूच एक चापट मारली. माझी प्रेमाची पहिली खूण हीच !

कांहीं वेळानें काकू जाग्या झाल्या. यमूच्या आजारामुळें त्यांना रात्रभर जागरण होत असे. त्यामुळें दिवसा त्यांना वसंत झोंप घेण्यास लावी व आपण यमूजवळ बसत असे. मी यमूच्या अंथरुणाजवळ बसलों होतों. त्यांची माझ्याकडे दृष्टि जातांच त्यांनीं माझ्याकडून यमूकडे पाहिलें. यमूच्या प्रफुल्लित मुद्रेवरून त्या सर्व समजल्या. त्या माझ्याकडे पाहून थोडयाशा हंसल्या, व चहा करण्याकरितां आंत निघून गेल्या.

चहा झाल्यावर काकूंनीं वसंताला हांक मारिली. तो आंत आल्यावर आम्ही सर्व चहा प्यावयास बसलों. वसंताची मुद्रा-देखील आनंदपूर्ण दिसत होती. घरांत जिकडे तिकडे आनंद खेळूं लागला.

मानसिक रोगावर इष्ट तें औषध मिळाल्यामुळें यमूचें दुखणें बरें होण्याला फारसा वेळ लागला नाहीं. एक महिन्याच्या आंतच यमू हिंडूं फिरूं लागली. मी नेहमीं तिच्याजवळच तिच्या आजारीपणांत बसून असें. कुठल्या कुठल्या गोष्टी वाचून दाखवून मी तिचें व तिच्याबरोबर आपलेंही मनोरंजन करून घेत असें. मी यमूजवळ असलों म्हणजे काकू व वसंत तिकडे येण्याचें होईल तितकें टाळीतच; यामुळें आम्हां दोघांना मन मोकळें करून बोला-यला हवें तेवढें सांपडे. यमूच्या प्रेमळ स्वभावाची माहिती मला हळूहळू होत चालली. मी हळूहळू आपलें दुःख विसरूं लागलों. माझ्या हृदयावर यमूचें स्वामित्व बसूं लागलें. यमूचा स्वभाव फारच गोड असल्यामुळें तिच्या संगतींत वेळ कसा निघून जातो, याचें मला भानदेखील राहत नसे.

यमू थोडी बरी झाल्यावर तिनें मला थट्टेनें पुन्हा पूर्वींचाच प्रश्न केला. ती म्हणाली, " पण आपल्याला एकदम इकडे कशासाठीं यावेंसें वाटलें ? आपल्याला मी आजारी असल्याबद्दल तर दादानें कांहीं लिहिलें नव्हतें." यमूच्या गालावर माझ्या प्रीतीचा लेख मुद्रित झाला. ती भरकन बाजूला सरून म्हणाली, " इश्श ! हें

काय ? " मीं म्हटलें, "हें तुझ्या प्रश्नाचें उत्तर ! मला यासाठींच येथें यावेंसें वाटलें "

पहिल्याच मुहूर्तावर आमचें लग्न लागलें. यमू माझी झाली. आमच्या लग्नाचा समारंभ विशेष गाजावाजा न करितां पार पडला. माझ्या लग्नाबद्दल मी नरसोपंतांना कळविलें होतें. ते येऊं शकले नाहींत. पण आपला प्रेमळ आशीर्वादमात्र त्यांनीं मला पाठविला. मनःपूर्वक त्यांनीं माझें अभीष्ट चिंतिलें होतें. ज्या दिवशीं लग्न झालें त्या दिवशीं माझी मुद्रा बरीच दुःखी कष्टी दिसत होती. कारण विमलेची स्मृति माझ्या मनांत पूर्णपणें जागृत होती. त्या उदात्त बालिकेच्या प्रेमाचा व अनुपम स्वार्थत्यागाचा मला विसर पडणें शक्य नव्हतें. माझ्या हृदयांत काय कालवाकालव चालली होती, याची यमूला अंधुकदेखील कल्पना नव्हती. आपल्याला योग्य असा पति मिळून आपल्या जन्माचें सार्थक झालें, या आनंदांत बिचारी गर्क होती !

माझ्या मनांत कांहीं तरी प्रचंड खळबळ होत आहे, हें वसंताच्यामात्र लक्षांत आलें. रात्रीं मला एकांतांत गांठून त्यानें मला माझ्या उदासीनतेचें कारण फारच प्रेमानें विचारलें. मनांतल्या दुःखभारामुळें माझें हृदय जड झालेंच होतें. कोणाजवळ तरी मन मोकळें करण्याची मला इच्छा झाली होती, कारण त्याशिवाय माझ्या मनाला शांति लाभली नसती. अशा स्थितींत वसंतानें प्रश्न करतांच माझ्या हृदयाचा बांध फुटून नेत्रांतून अश्रु यावयास

लागले, यांत नवल तें कोणतें? दुःखाचा पहिला उमाळा गेल्या-नंतर मीं हळुहळू आपली प्रेमकहाणी त्याला निवेदन केली. माझी हकीकत ऐकतांच त्याचें अंतःकरण अगदीं गहिंवरलें. त्याच्याही नेत्रांतून अश्रु वहात होते; एकमेकांच्या गळ्यांत हात घालून आम्हीं किती वेळ तरी अश्रु गाळले, तेव्हां आमचें समाधान झालें! अश्रूंत अशीच शांतवनपर जादू भरली आहे. अश्रूंची मोहिनी माहीत नाहीं असा मनुष्य विरळा!

दोन वर्षांपूर्वी वसंतानें मला आपली प्रेमकहाणी सांगितली होती. दोघांचीही प्रेमाच्या बाबतींत निराशाच झाली होती; पण दोघांच्याही आयुष्याला किती निराळें वळण लागलें, याची जाणीव त्या वेळीं माझ्या मनांत झाली. माझें हृदय किती दुबळें आहे, याची मला पूर्ण कल्पना झाली. प्रेमाची निराशा झाल्याबरोबर आजन्म ब्रह्मचर्यव्रतानें राहून मातृभाषेची सेवा करण्यास वाहून घेणारा वसंत कोणीकडे, व विमलेच्या मृत्यूची दुःखद हकीकत ऐकली, त्या दिवशींच यमूशीं लग्न लावण्याचा निश्चय करून तिच्या अल्लड प्रेमांत गुरफटून जाणारा मी कोणीकडे! ही तुलना माझ्या हृदयाला दारुण यातना देऊं लागली. माझ्यानें राहवेना. मी वसंताला म्हणालों, "तुझ्यासारख्या थोर मनाच्या गृहस्थाशीं मैत्री करण्याला मी लायक नाहीं. माझ्या मनाचा कमकुवतपणा तुझ्या नजरेस आलाच असेल. माझ्या प्रेमाचा फोलपणा साऱ्या जगाला स्पष्ट दिसेल. हाय हाय! हेंच का माझें हृदय?"

वसंतानें माझें समाधान केलें. तो म्हणाला, "नाना, तूं उगीच भ्रामक समजुतीनें आपल्या मनाला वाईट वाटून घेत आहेस. झालेल्या प्रकारानें तुझें मन किती कोमल व दयापूर्ण आहे, हें नाहीं का दिसत ? आपलें दुःख बाजूला सारून यमूच्या सुखासाठीं तूं स्वार्थ-त्याग नाहीं का केलास ? परदुःखानें द्रवणाऱ्या मनुष्याला हृदय-शून्य म्हणणें म्हणजे ईश्वराच्या सृष्टीचा अपमान करण्यासारखें आहे. तुझें हृदय खरें हृदय आहे ! सृष्टींतील बरींवाईट चित्रें पाहून ज्याच्या अंतःकरणावर बऱ्यावाईट लहरी उमटतील तोच खरा कवि, तोच खरा थोर ! नाहीं तर आम्ही पहा. एका बाबतींत आमची निराशा झाल्याबरोबर आमचें हृदय दगडासारखें कठिण झालें. सृष्टींतील सौंदर्याचा आमच्या हृदयावर कांहींच परिणाम होत नाहीं ! आम्ही राक्षसाहूनही राक्षस झालों आहों ! नाना! तूंच श्रेष्ठ आहेस. तुझ्यासारखें—गंगाजलासारखें निर्मळ व कोमल —अंतःकरण मला देवानें दिलें नाहीं, याबद्दल मला तुझा हेवा वाटतो. तुझी कल्पना चुकीची आहे. तूं मुळींच दोषी नाहींस."

मी यावर कांहीं बोललों नाहीं, तरी पण माझ्या मनाची तळ-मळ चालूच होती. अखेर मीं माझ्या प्रिय विमलेसंबंधानें वसं-ताला कांहीं माहिती विचारली. वसंत म्हणाला, "नाना, तूं मला सांगितली, यापेक्षां विशेष माहिती मला नाहीं. आम्ही तिला कम-लाबाई या नांवानें ओळखीत असूं. यमूमुळें माझी तिच्याशीं थोडी-बहुत ओळख झाली. तुझ्यासारखाच कोमल तिचा स्वभाव होता.

प्रेमानें तिचें हृदय परिपूर्ण होतें. माझी निराशा झालेली पाहतांच तिचें हृदय कळवळलें. अलीकडे, गेल्या वर्षांत ती सदोदित विचारमग्न व उदास दिसे. त्या वेळीं आम्हांला त्याचा अर्थबोध झाला नाहीं. आम्हीं तिला पुष्कळ आग्रह केला, पण तिनें आम्हांला मुळींच दाद लागूं दिली नाहीं. तिचें कांहीं घरगुती दुःख असेल, या भावनेनें आम्ही स्तब्ध राहिलों. पण आज मला कळून आलें. असल्या देवीला स्वतांच्या खासगी दुःखाची जाणीव कोठून असणार? परदुःखानें ती इतकी कळवळत होती! यमूसाठीं तिनें केलेला स्वार्थत्याग, आत्मसुखावर दिलेली तिलांजलि खरोखरच मानवी स्वभावाच्या इतिहासांत अपूर्व आहे! तिच्या मृत्यूनें पृथ्वीवरील सौंदर्य बरेंच कमी झालें, यांत संदेह नाहीं. अशीं मानवी रत्नें या जगावर चमकत आहेत, म्हणूनच याला स्वर्गाची योग्यता आली आहे!"

वसंत स्तब्ध राहिला. विमलेचें चिंतन करीत, तिच्या पवित्र नांवाचा उच्चार सहस्र वेळ करून मी झोंपीं गेलों. त्या रात्रीं मला विचित्र स्वप्न पडलें. स्वर्गीय तेजानें चमकत असलेली विमला मजजवळ येऊन म्हणाली, "प्राणनाथ! आपण उगीच कष्टी कां होतां? मी अनुपम सुखांत आहें. मी भेटल्यानें बाबांना व आईला किती आनंद झाला म्हणून सांगूं! मला आतां मानवी दुःखें शिवूं शकणार नाहींत. याशिवाय दैवी सामर्थ्य माझ्या अंगीं किती तरी आलें आहे! आपल्याला मी वाटेल तेव्हां पाहूं शकेन. आपल्या

आनंदानें मी आनंदित होईन. मी नित्य आपल्याबरोबरच आहें, असें समजा. माझ्या प्रिय यमूला सुख द्या. तुम्हीं जर हा वृथा शोक केला, तर तिच्या कोमल हृदयाला यातना होतील व त्या बघून मला आहे या स्थितींतदेखील रडूं येईल. प्राणनाथ ! आपलें प्रेम मी ओळखून आहें. आपलें मन अत्यंत थोर आहे. आपली सर्वांची लवकरच भेट होईल. आपण पृथ्वीवर रहा. आपल्या-सारखे लोक पृथ्वीवर राहिल्यानें पृथ्वीची शोभा वाढणार आहे. यमूसारख्या लता जर या मानवी उद्यानांतून नाहींतशा झाल्या, तर तें भेसुर अरण्यच होईल. आपल्या हातून या उद्यानाला रमणीयत्व यावें, या हेतूनें मी ईश्वराची नित्य प्रार्थना करीत असतें. वसंत-रावांच्या मनाचा दृढनिश्चय पाहून तुम्हांला तुमच्या मनाबद्दल तुच्छता वाटावयास नको. हीं सृष्टीचीं दोन स्वरूपें आहेत. दोन्हीं सारखींच रम्य आहेत. सौंदर्यानें चकाकणारा हिरा थोर असला, तरी त्याच्या तुलनेनें, लहानशा पवनाच्या झुळकेबरोबर डुलणारें पारिजातकाचें फूल तुच्छ ठरत नाहीं !" मी तिचें भाषण ऐकून मंत्रमुग्ध झालों. पाहतां पाहतां विमला अंतर्धान पावली.

'मनीं वसे तें स्वप्नीं दिसे' ही म्हण कांहीं खोटी नाहीं. पण त्या स्वप्नांतील शब्दांनीं माझ्या मनाला शांति लाभली, एवढें-मात्र खरें !

---

# प्रकरण २१ वें.

## उपसंहार.

वसंतरावांची वाङ्मयसेवा जोरानें चालली आहे. त्यांच्या पवित्र वाणीनें महाराष्ट्रांत त्यांचें नांव सर्वतोमुखीं झालें आहे. 'बोले तैसा चाले' असल्या थोर विभूतींपैकीं ते एक आहेत, असें सर्व म्हणतात. वसंतरावांनीं आपली प्रतिज्ञा खरी केली. ते ब्रह्मचर्य-व्रतानेंच राहत असतात. संसाराचा मायापाश त्यांनीं तोडला खरा, पण वाङ्मयाचा पाशमात्र हल्लीं त्यांच्यावर पडला आहे.

'एव्हरी इंडियन्स ब्यांके'ची एकसारखी भरभराट होत आहे. नरसोपंतांच्या देखरेखीखालीं ब्यांकेचा उत्कर्ष न झाला तरच तें नवल! ते आपल्या सर्व मंडळीसह मुंबईसच असतात. दामूमात्र देशसेवेच्या वल्गना करीत हातानें कांहींही न करतां टवाळा-सारखा गांवभर हिंडत असतो. अस्मादिकांची स्वारी अमरावतीला वकिली करीत असते. माझी वकिली चांगली चालली आहे. चालली नसती तरी मला त्याची कांहीं काळजी नव्हती. कारण, एव्हरी इंडियन्स् ब्यांकेंत माझ्या नांवाची बरीच मोठी रक्कम ठेव म्हणून पडली आहे. यमूच्या प्रेमळ सहवासांत माझें आयुष्य सुखानें जात आहे. काकू हल्लीं मजजवळच असतात. मुलाचा संसार पाहण्याचें नशिबीं लिहिलें नव्हतें, तरी मुलीचें सुख पाहून त्या आनंद मानून घेतात.

द्रव्य, पत्नी, विद्या, मुलें या सर्व दृष्टींनीं माझी सुखी लोकांत गणना होत आहे. मला कोणतीच कमतरता नाहीं, असें सर्वांना

वाटतें. ‘ जगीं सर्व सूखी असा कोण आहे? ’ या समर्थांच्या उक्तीला मी अपवाद आहें म्हणून माझ्याकडे बोट दाखविण्यांत येतें. पण रात्रीं विमलेच्या तसबिरीवर मी व यमू मिळून तासचे तास अश्रु ढाळीत बसतों, हें गौप्य बिचाऱ्या जगाला काय ठाऊक? विमलेच्या स्वार्थत्यागाची हकीगत यमूला कळली असल्यामुळें तिचें अंतःकरण भरून यावें यांत कोंणतेंच नवल नाहीं. विमलेचें पवित्र नांव घेऊन तिच्या लॉकेटावर प्रेमाश्रु गाळल्यानें आमच्या हृदयाला जी शांति लाधते, ती अवर्णनीय होय !

माझ्या जीवनांतील रहस्य मी आजपर्यंत यमू व वसंत यांशिवाय कोणालाच कळविलें नव्हतें. पण या जगांतील सौख्य कोणत्या तऱ्हेचें असतें, याची कल्पना होण्याकरितां मीं आपले आयुष्यांतील रहस्य आज वाचकांना प्रेमानें सांगितलें आहे. आमच्या आयुष्यक्रमावर कोणत्या तरी उच्च शक्तीचा प्रभाव चालत असतो, अशी माझी पूर्ण खात्री झाली आहे. वाचकांना काय वाटेल तें खरें !



# तोतयाचें बंड.

——:o:——

## ( नवीन ऐतिहासिक नाटक. )

हें नवीन गद्य नाटक केसरी पत्राचे सुप्रसिद्ध संपादक रा. **नरसोपंत केळकर** यांनीं लिहिलेलें आहे. पानिपतच्या प्रसिद्ध लढाईंत सदाशिवराव-भाऊ पेशवे हे गर्दींत नाहींसे झाले; त्यांचें काय झालें हें निश्चितपणें कोणास कळलें नाहीं. या गोष्टीचा फायदा घेऊन एका कनोजी ब्राह्मणानें भाऊसाहेबांचा तोतया बनून पेशवाई मिळविण्याचा यत्न केला; पण नाना फडणविसांच्या चातुर्यामुळें तोतयाचें कारस्थान बाहेरं पडून अखेर त्याचें पारिपत्य झालें. तथापि ह्या तोतयाला खरा समजून सदाशिवरावभाऊंच्या बायकोनें---पार्वतीबाईनें---नाना फडणविसांच्या तोतयाविषयक राजकारणांत जो निष्कारण अडथळा उत्पन्न केला, त्यामुळें तोतयास फाजील महत्त्व येऊन त्यास बंड करतां आलें. हा जो कांहींसा अप्रसिद्ध परंतु काव्याच्या दृष्टीनें अत्यंत रमणीय असा प्रसंग, त्यास रा. केळकरांनीं नाटकाचें रूप देऊन तो महाराष्ट्रसमाजाच्या डोळ्यासमोर ठळक रीतीनें मांडला आहे. रा. केळकर यांचें हें पहिलें नाटक आजपर्यंतच्या सर्व ऐतिहासिक नाटकांत ऐतिहासिक दृष्ट्या विशेष महत्वाचें व जास्त योग्यतेचें आहे. इतिहासाचा विपर्यास अगर नसता फेरबदल न करितांही काव्याच्या दृष्टीनें मनोहर व हृदयंगम असें नाटक कसें लिहितां येतें, हें ज्यास पहावयाचें असेल, त्यानें प्रस्तुत नाटक अवश्य वाचावें. चांगुलपणाचा अतिरेक झाला असतां त्याचा परिणाम किती अनिष्ट होतो, हें या नाटकांतील पार्वतीबाईच्या पात्रावरून चांगलें लक्षांत येईल. राज्यतृष्णा मनुष्याच्या हातून केवढीं घोर कृत्यें करविते, हें तोतया 'सुखनिधान' या पात्रावरून स्पष्ट

निदर्शनास येईल. नाना फडणवीस व पार्वतीबाई यांच्यामधील संभाषणें वाचून वाचकांच्या मनांवर विलक्षण परिणाम झाल्यावांचून रहाणार नाहीं. तसेंच असलेचें निस्सीम पतिप्रेम व त्याकरितांच अखेर तिचा पडलेला बळी हीं पाहून वाचकांच्या मनोवृत्तींत परस्परविरोधी अशा विकारांनीं खळबळ उडाल्यावांचून रहाणार नाहीं. नाटकांतील शेवटचा अंक व विशेषतः शेवटचा प्रवेश तर ग्रंथकारानें इतक्या खुबीनें रचिला आहे कीं, तो वाचून संपतांच क्षणभर तरी जिवास चटका लागल्यावांचून रहात नाहीं. या नाटकांत प्रसंगानुसार अनेक चित्रें घातलीं असून छपाई व बांधणी सुंदर केली आहे. पृष्ठसंख्या २४०, किं. १ रुपया. ट० खर्च निराळा.

---

## अभिप्राय.

उषाः—'तोतयाचे बंडा-'ची उभारणी इतक्या कुशलतेनें कधींही झाली नव्हती व 'तोतयाच्या बंडा-'ची अखेर इतक्या अकल्पित तऱ्हेनें झालेलीही क्वचितच आढळण्यांत येत असेल. ह्या नाटकाचा आरंभ व अखेर, आदि व अंत, अतिशय खुबीदार आहे व त्यामुळें हें नाटक नाट्यग्रंथांत वरिष्ठ स्थान पटकावील ह्यांत मुळींच शंका नाहीं. नाटक म्हणजे काय व त्याचा प्रधानहेतु काय असावा, ह्यासंबंधानें अलीकडे फार चर्चा ऐकूं येते. परंतु नाटक म्हणजे त्यांत योजलेल्या पात्रांची खुबीदार, समप्रमाणांत व अन्योन्यपोषक योजना असा जर अर्थ असेल तर त्या दृष्टीनें ह्या नाटकांतील पात्रांची 'ठेवण' फार पहाण्यासारखी आहे. जर उत्तम उत्तम कल्पनांचा व्यवस्थित संगम असा 'नाटक' शब्दाचा अर्थ असेल, तर त्याही दृष्टीनें ह्या नाटकाची प्रत्येकास स्तुतिच करावीशी वाटेल. उगीच शिरा ताणताणून आणलेल्या उसन्या आवेशाच्या भाषणापेक्षां ज्यांस मृदु, कोमल, साधी व परिणामकारक भाषा नाटकांत आवडत असेल त्यांची हौस पुर-

ण्यासारखे अनेक मनोरम प्रसंग त्यांस ह्या नाटकांत आढळून येतील. तोतयाचें बंड मोडण्याकरितां नानाफडणिसांस कोणकोणत्या युक्त्या योजाव्या लागल्या, तें प्रत्यक्ष आतां समजण्याचा मार्ग उरलेला नाहीं. तें रहस्य गत इतिहासानें आपल्या हृदयांत गुप्तपणें सांठवून ठेवलेलें आहे. परंतु नानाफडणिसांच्या मनोवृत्तीशीं आपलें तादात्म्य करून घेऊन विचारी मुत्सद्यांच्या अनुमानें बांधण्याच्या बिकट पद्धतीचें सुंदर दिग्दर्शन ह्या नाटकांत झालेलें असल्यामुळें नानाफडणिसांनीं कोणत्या प्रकारच्या युक्त्या योजल्या असतील, त्यांचें स्वरूप प्रस्तुत नाटकावरून चाणाक्ष वाचकांच्या सहज लक्ष्यांत येण्याजोगें आहे. पतिप्रेमामुळें क्षणोक्षणीं आंदोलन पावणारें चित्त, पतिमुखावलोकनाकरितां क्षणोक्षणीं उत्कंठित होणारें हृदय, पतिवियोगामुळें पावलोपावलीं वाटणारी खिन्नता, पतिसमागमाकरितां व्याकूळ झालेल्या चित्तामुळें स्फूर्ति पावलेलें साहस, पतिगुणांचा ध्यास, पतिमूर्तीचें चिंतन, उदार परंतु भीरु हृदय, कठोर परंतु कातरत्वानें हीनसत्व झालेला शब्दप्रहार, संकटांमुळें उत्पन्न झालेला संशयीपणा, अवश्यकतेमुळें आंगीं आलेला भोळेपणा ह्या सर्वांचें मिष्टमिष्ट संमिश्रण ज्या कोणास पहावयाचें असेल त्यानें हें नाटक वाचल्यावांचून कधींही राहूं नये. ह्या नाटकांतील मुख्य दोन स्त्रीपात्रें—खऱ्या सदाशिवरावभाऊंची पत्नी पार्वतीबाई व खोट्या सदाशिवरावभाऊची स्त्री अमला—ह्यांचें स्वभावचित्र ह्या नाटकांत इतकें बहारीचें उठविलें आहे कीं, थोर मनाच्या स्त्रियांच्या हृदयाचें नाजुक मर्म इतक्या अचुक रीतीनें ओळखल्याबद्दल सर्व प्रमदावर्ग श्रीयुत केळकरांची पाठ थोपटल्यावांचून कधींही राहणार नाहीं. त्याचप्रमाणें खरे सदाशिवरावभाऊ मेले कीं जिवंत आहेत, ह्याचें कोडें नानाफडणिसांस पडलें असतांना पुराव्याचा एक एक हप्ता इतक्या खुबीदार रीतीनें त्यांच्यापुढें येऊन पडलेला आहे व त्याची सांखळीही त्यांनीं इतक्या

चतुरतेनें जोडली आहे कीं, इतका हुषार वकील आपणांस न लाभ शूद्रक राजाप्रमाणें, नाटकें लिहीत बसला ह्याबद्दल अनेक फांशीं गेले गुन्हेगारांना हळहळ लागली असेल ! नाटकांतील भाषेविषयीं तर बोल यास नको. कारण सरस्वतीदेवीचें आजन्म आराधन करून तिचा कृपाप्र प्राप्त करून घेण्यांतच ज्यांनीं इतिकर्तव्यता मानली, त्यांनीं लिहिलेली राठी भाषा नुसती सुंदरच नव्हे तर ' किस्तेवजाही ' असली तर त नवल कोणतें ?

नाटकाचें ' संक्रमण ' क्रमवार होऊं देणें हा प्रत्येक नाटकांत म गुण असावा लागतो; नाहींतर नाटक तुटकें तुटकें दिसतें, अथवा म संपलें असें वाटतें. प्रस्तुत नाटकाचें संक्रमण समक्रम व छानदार अ आहे व त्यामुळें शेवटपर्यंत वाचकांची उत्सुकता व दर्शनलालसा का राहते. शेवटचा ' सीन ' तर फारच बहारीचा आहे. ज्याप्रमाणें देशपर्य करित असतां एकदम एकाद्या प्रियजनाची गांठ पडावी, जुने कागद ळीत असतांना ज्याप्रमाणें एकदम एखादी शंभर रुपयांची नोट आढळ औषध म्हणून घेत असतांना चुकून ' थंडाई सरबत-' च हातीं लागावें, प्रमाणें ' तोतयाचे बंडा-'तील शेवटचा प्रवेश पाहून प्रेक्षकवर्ग आनंद आश्चर्यानें व अनपेक्षतेनें इतका थक्क होऊन जातो कीं, शेवटचा प पडून नाटक संपलें ह्याचें त्यास भानही राहात नाहीं. आरंभीं अथवा वटीं प्रेक्षकांस चकित करण्याची नाटककारांस नेहमींच इच्छा असते, ती इच्छा श्रीयुत केळकर ह्यांस इतक्या सुरेख रीतीनें पूर्ण करितां आ याबद्दल आम्ही त्यांचें अभिनंदन करितों. नाटकांत जे इतर सरस प्र आहेत, त्यांत राजमाची किल्ल्यावरील हैबतराव व तोतया ह्यांच्याही स दाचा प्रमुखत्वानें उल्लेख केला पाहिजे. ह्याशिवाय नानाफडणीस व पार्व बाई, विठाई व बगंभट वगैरे प्रवेशही चटकदार झाले आहेत. अमल

पार्वतीबाई ह्यांच्या स्वभावचित्रांचा वर परिचय करून दिलाच आहे, पण त्याशिवाय नानाफडणीस, रामचंद्र नाईक किल्लेदार व खुद्द तोतया ह्यांच्या स्वभावाचेंही यथार्थ चित्र ग्रंथकारांनीं रेखाटलें आहे. रामचंद्रनाईक किल्लेदार खोट्या स्वामिभक्तीला कसा बळी पडतो, व नानाफडणीस त्यांस प्रामाणिक बुद्धीनेंच फितुरी कसें समजतात हें पाहिलें म्हणजे परमेश्वराचें सर्व क्रीडाकुतूहल परस्परांच्या गैरसमजुतीवर कसें चाललेलें आहे हें लक्ष्यांत येऊन सृष्टीच्या व्यवहाराचें थोडेंसें गूढ उकलल्यासारखें वाटतें. तोतया ह्यास राज्यतृष्णा आहे, परंतु विषयतृष्णा नाहीं; त्यास सदाशिवरावभाऊंच्या राज्यलक्ष्मीची आवड आहे, परंतु त्यांच्या पवित्र पत्नीस कलंकित करण्याची त्याची छाती होत नाहीं, म्हणून त्याच्या त्या स्वनिर्मंत्रित आपत्तींतही त्याचेविषयीं आदर वाटूं लागतो व त्यास हत्तीच्याच पायाशीं केवळ देऊं नये असें वाटतें. पण ह्यास आपला काय उपाय ? पेशव्यांनीं त्यास हत्तीच्या पायाशीं देऊनही टाकलें. आतां त्याचा शोक करावयास वेळ आहे कोणाला !

हें 'तोतयाचें बंड' नाट्यवाङ्मयांतील उच्च मंजूषेमध्यें मोठ्या आनंदानें आम्ही ठेवून देतों व नाटकवाङ्मयाचें विशुद्ध स्वरूप ह्या दृष्टीनें त्याचें वाचन करण्याविषयीं वाचकांस शिफारस करितों.

---

**पंचम-जॉर्ज-विजयः**—उत्तम गोड भाषा, हें या पंचांकी ऐतिहासिक नाटकांतील विशेष होय. नाट्यशास्त्राच्या दृष्टीनेंही रा. केळकर यांची ही कृति बरीच सरस आहे. परवां परवां अस्तंगत झालेल्या स्वराज्यसूर्याची विस्मृति महाराष्ट्रभूला अद्याप पडली नसली तरी अंतर्बाह्य संकटरूपी केतूंनीं तो सूर्य ग्रस्तास्त होण्याची अखेर अखेर कशी स्थिति आली होती व त्या वेळच्या नानाफडणीसादि खंद्या मुत्सद्यांना बुद्धिसर्वस्व

खर्च करून स्वराज्य राखण्याची कशी शर्थ करावी लागत होती, हें या 'बंडा-'नें अगदीं डोळ्यापुढें उभें राहील. आम्हां मराठ्यांची दौलत बुड-वून टाकूं पहाणाऱ्या पेशवाई दौलतगिरांचाही आदर्श सध्यांच्या महाराष्ट्राला झाला तर हितकरच होईल. एकंदरींत विद्यमान नाटकग्रंथात हा प्रयत्न बऱ्याच वरच्या प्रतीस येईल यांत शंका नाहीं. आतां सर्वांगपूर्ण असें काय आहे? तरी लेखकाच्या लौकिकाप्रमाणेंच त्याची ही कृति उठली आहे यांत शंका नाहीं.

---

**ज्ञानोदय:**---ह्या नाटकाचे कर्ते रा. रा. नरसिंह चिंतामण केळकर, 'केसरी'चे संपादक हे महाराष्ट्रांतले एक अग्रगण्य लेखक आहेत. ह्यांच्या ह्या प्रयत्नानें ऐतिहासिक मराठी नाटकांच्या परिमित संख्येंत एका चांग-ल्या नाटकाची भर पडली आहे. दोष असले तरी ते किरकोळ असून ग्रंथकर्त्याला ते सहज काढून टाकितां येण्यासारखे आहेत. आमच्या मतें ह्या नाटकाचें संविधानक चांगलें रंगविलें असून, त्यामुळें हें वाचनीय व प्रेक्षणीय झालें आहे....यांत नाना फडणीस व पार्वतीबाई हीं मुख्य पात्रें कल्पि-लीं असून तीं फार चांगलीं उतरलीं आहेत. तोतयाची पत्नी अमला हिची करुणमूर्ति नाटक वाचीत असतां मनाला चटका लाविते, पण ही कल्प-नेच्या मुशींतून बाहेर पडली आहे, हा विचार मनांत आला कीं थोडा विरस होतो. तोतयाचें पात्रही चांगलें साधलें आहे. एकंदरींत हें नाटक आम्हांला आवडलें; व तें मनाला चटका लावण्यासारखें उतरलें आहे असा तें वाचून आमचा ग्रह झाला.

---

**लोकमित्र:**—हें शब्दचित्र असून तें श्री० केळकर यांच्या योग्यतेस शोभण्यासारखेंच वठलेलें आहे. सुसंगतता, स्वाभाविकता व मार्मिकता हे

गुण नाटकांत सर्वत्र व सारखेच दृगोचर होतात. नानासाहेबांची मुत्सद्देगिरी त्यांच्या भाषणावरून उत्तम रीतीनें व्यक्त होत असून इतर सर्व पात्रेंही आपआपल्या दर्जास शोभण्यासारखीं वठलेलीं आहेत. यामुळें नाटक सर्वांगसुंदर झालें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

---

**करमणूक:**—पानिपतच्या लढाईत सदाशिवरावभाऊ धारातीर्थी पडले, परंतु त्याबद्दल खात्री नव्हती. क्वचित् ते नुसते नाहींसे झाले असतील असा पुष्कळांस संशय होता. त्या संशयाचा फायदा घेऊन उत्तर हिंदुस्थानांतला एक कनोजा आपण भाऊसाहेब म्हणून पुढें आला. हा प्रसंग हृदयंगम वाटून व त्यास हृदयंगम स्वरूप देऊन हें नाटक रचलें आहे. यांत मुख्य पात्रें नानाफडणवीस, पार्वतीबाई, तोतया व त्याची बायको हीं सर्व फार चांगलीं रंगविलीं आहेत. विनोदाच्या मिश्रणाकरितां कांहीं गौण पात्रें घातलीं आहेत, त्यांचाही उठाव बरा आहे. पुस्तक अवश्य संग्रहणीय व वाचनीय झालें आहे.

---

**मराठा-मित्र:**—नाटकांतील कथाभाग हृदयंगम असून ऐतिहासिकदृष्ट्या आजपर्यंतच्या ऐतिहासिक नाटकांमध्यें याचा पहिला नंबर लागेल. पार्वतीबाई व अमला यांची विलक्षण पतिभक्ति आर्यस्त्रियांच्या उज्ज्वल गुणांची साक्ष पटविते. संविधानक ऐतिहासिक सत्यास तिळमात्रही न सोडतां जुळविलें आहे. निरनिराळ्या पात्रांचे स्वभावगुणधर्म रेखाटण्यांत लेखकानें बरेंच चातुर्य खर्च केलें आहे. भाषा प्रौढ, शुद्ध व चटकदार आहे. अवश्य वाचून पहावें.

---

**इंदुप्रकाश:**—नाना फडनवीस व पार्वतीबाई या मुख्य पात्रांचें स्वभाववर्णन नाटकांत चांगलें उतरलें आहे. इतर पात्रेंही बऱ्याच समाधानकारक

रीतीनें नटाविण्यांत आलीं आहेत. गेल्या दहा वर्षांत प्रसिद्ध झालेल्या ऐतिहासिक नाटकांत भाषा, विचार, रसपरिपोष आणि स्वभाववर्णन या चारी दृष्टींनीं या नाटकाचा नंबर पहिला दुसरा लागला पाहिजे, असें आमचें मत आहे. शेवटच्या अंकाचा शेवटचा प्रवेश लिहितांना रा. नरसोपंत यांनीं जी कुशलता व्यक्त केली आहे, ती अर्वाचीन मराठी वाङ्-मयांत दुर्मिळ आहे. नाटकांतील निरनिराळ्या प्रसंगांस अनुलक्षून जीं चित्रें दिलीं आहेत, तींही प्रेक्षणीय आहेत.

---

**वंदे जिनवरम्**—केळकरांसारख्या विद्वान् व कसलेल्या लेखकाच्या लेखणींतून हें पुस्तक उतरलेलें आहे एवढ्यावरूनच या पुस्तकाचें महत्व सहज समजून येणार आहे.

---

**प्रकाश ( सातारा )**—या पुस्तकांत ऐतिहासिक भाग मोठ्या खुबीनें वाढून हें नाटक तयार केलें आहे. कांहीं चित्रेंही आहेत. नाटक उत्तम साधलें आहे. एकदां हें पुस्तक वाचण्यास सुरवात केली म्हणजे शेवट झाल्याशिवाय हातांतून तें खालीं ठेववत नाहीं.

---

**शुभसूचक ( सातारा )**—ऐतिहासिक सत्यास न सोडतां या नाट-काची रचना केली असून निरनिराळ्या पात्रांचें स्वभावचित्र रेखाटण्याचे कामीं रा. केळकर यांनीं बरेंच कौशल्य दाखविलें आहे. भाषाही भार-दस्त व चटकदार आहे. त्यामुळें हें नाटक प्रसिद्ध असलेल्या ऐतिहासिक नाटकांत बऱ्याच वरच्या दर्जाचें झालें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. शोकपर्यवसायी नाटकांत याचा नंबर बराच वरचा लागेल, असा आम-चा अभिप्राय आहे. हृदयभेदक कथानक, शुद्ध भाषेची मांडणी व मा-र्मिक विचारसरणी या तिन्ही गुणांनीं हें नाटक मंडित असल्यानें विदग्ध-

वाङ्मयाला ललामभूत होणारें झालें आहे. नाट्यलेखनाच्या कामीं रा. केळकरांनीं दाखविलेली कळकळ पाहून महाराष्ट्ररंगभूमीवर उत्तम उत्तम स्वभावचित्रें प्रेक्षकांना दृग्गोचर होऊं लागतील, असें आम्हांस वाटतें. आमच्यांतील होतकरू नाट्यलेखकांनीं या हृदयंगम नाटकाचा मार्मिक अभ्यास करावा, म्हणजे त्यांच्याही लेखनप्रतिभा उज्ज्वल होऊन त्यांना बराच फायदा होईल असें आमचें मत आहे.

---

**धर्मदीपिकाः**—नाटकाची भाषा रा. रा. केळकरांच्या कसलेल्या लेखणीला साजेशीच आहे. विशेषेंकरून अंक ३ रा, प्र० २ रा, ह्यांत पार्वतीबाई व नाना ह्यांचीं भाषणें फारच खुबीदार साधलीं आहेत. नाना हे ‘ नाकापेक्षां जड झालेलें मोतीं ’ असें पार्वतीबाईंना वाटत आहे; तरी स्वतःची इभ्रत कायम ठेवून नानाला तर टोंचावें पण बाहेरून सहजगत्या ओघाओघानें बोलल्यासारखें दिसावें, अशीच बाईच्या भाषणांतील शब्दयोजना साधली आहे.

---

**प्राचीप्रभाः**—( फोंडा गोवें ) नाटकाचें संविधानक चित्ताकर्षक आहे. भाषा प्रौढ व सभ्य असून सरळ व सोपी आहे. विचारसरणी भारदस्त आहे. किंचित् हास्य आणि बराचसा करुणरस वाचकांच्या मनाला चटका लावून पुष्कळ वेळपर्यंत उद्विग्नता उत्पन्न केल्यावांचून सोडीत नाहीं. हें सर्व नाटक या वस्तूला अनुसरून यथायुक्त आहे.

---

**के. व्ही. के. ( ज्ञानप्रकाश )**—अमलेचें पातिव्रत्य व स्वार्थत्याग हे अश्रूतपूर्व आहेत; अशा प्रकारच्या पातिव्रत्याचें चित्र, अस्पष्ट कां होईना, पण मोहकपणानें रेखाटल्याबद्दल रा. केळकरांचे धन्यवाद गावेसे वाटतात; परंतु बिचाऱ्या अमलेला तिच्या तपश्चर्येचा मोबदला देहांत-

शासनांत मिळावा, हें सात्विक वृत्तीच्या माणसास निर्घृण व अन्यायाचें वाटल्याशिवाय राहणार नाहीं. तिसऱ्या अंकांतील नाना व पार्वतीबाई यांच्या प्रवेशांत नानांची भूतदया, तसेंच त्यांचा करडा अम्मल व पेशव्यांविषयीं विशेषतः भाऊंच्याविषयीं त्यांची कृतज्ञताबुद्धि हीं नाटककारांनीं अप्रतिम रेखाटलीं आहेत. नानांच्या कीर्तीच्या डंक्यानें अमलेचें पुण्यास येणें व तिचा पार्वतीबाईबरोबर वास इत्यादि गोष्टी नानांच्या कीर्तीची व अक्कलहुशारीची चांगलीच साक्ष पटवून देतात. रा. केळकरांसारख्या लोकमान्य पुढाऱ्यांनीं सवडींत सवड करून रंगभूमीकडे लक्ष द्यावें ही गोष्ट त्यांस व मराठी रंगभूमीसही भूषणावह आहे.

---

**चित्रमयजगत्**—इतिहासाचा विपर्यास न होऊं देतां रा. केळकर यांनीं हें संविधानक अत्यंत हृदयंगम केलें आहे. नाना फडणवीस यांची सद्बुद्धि, मुत्सद्दीपणा व पेशव्यांच्या घराण्याविषयींची त्यांची निष्ठा, सात्विक व भोळ्या पार्वतीबाईच्या मनाची प्रेमामुळें झालेली ओढाताण, राज्यतृष्णेच्या पायीं महत्त्वाकांक्षी माणसांकडून होणारीं पातकें, खऱ्या प्रेमाबद्दल मिळालेला निव्वळ दुःखाचा मोबदला, या गोष्टी रा. केळकर यांनीं या नाटकांत फारच कुशलतेनें दाखविल्या आहेत. खरें आणि खोटें यांची निवड करणें किती कठीण असतें, सद्बुद्धीनें कित्येक लोक खोट्यास खरें समजून कसे चिकटतात आणि खरें जाणणाऱ्या व त्याप्रमाणें आचरणाऱ्या सज्जनासही सद्बुद्धीच्या पण मूर्ख लोकांच्या अपवादास कसें पात्र व्हावें लागतें, हें या नाटकांत अत्युत्कृष्ट रीतीनें दाखविलें आहे. अतिशयोक्ति, असंभवनीय प्रसंग, खोटा आवेश, ओढून ताणून आणिलेला विनोद, फाजिल शृंगार किंवा बोजड अगर नाटकास अननुरूप अशी भाषा या नाटकांत कोठेंही आढळत नसून यांतील निरनिराळीं माणसें आपल्या दर्जा-

प्रमाणेंच बोलतांना आढळतात. चिकटंभट व पिकटंभट, बगंभट व हैबतराव, आणि हैबतराव व तोतया यांच्या प्रवेशांत मार्मिक विनोद साधला आहे. सोदा तोतया व पाजी बगंभट यांनीं नाना फडणवीस यांची स्थिति कशी बिकट केली व दूरदर्शी नानांनीं पार्वतीबाईचा मान ठेवून योग्य तेंच धोरण कसें स्वीकारिलें व राखिलें हें फारच समर्पकपणें यांत दाखविण्यांत आलें आहे; आणि विशेष हा कीं, रा. केळकर यांची लेखणी स्वाभाविकतेपासून बिलकूल ढळलेली नाहीं. मार्मिक पण सभ्य विनोद, हृदय हालवून सोडणारा पण अगदीं अकृत्रिम दुःखावेग, कर्तव्याकर्तव्याचा लढा व लोकमताला कित्येकदां लागणारें चुकीचें वळण, परस्परविरोधी मनोविकारांचें रण किंवा गुंतागुंतीचे प्रसंग, हें सारें या नाटकांत रा. केळकर यांनीं इतकें उत्कृष्ट दाखविलें आहे कीं, त्यावरून ते 'केसरी-' चे संपादक या नात्यानें जशी आपली कामगिरी उत्कृष्ट बजावूं शकतात त्याप्रमाणें ते अत्युत्कृष्ट नाटकही लिहूं शकतात, हें सिद्ध झालें आहे. पार्वतीबाई व बगंभट, विठी व बगंभट, पार्वतीबाई व नाना फडणवीस यांच्या प्रवेशांतील भाषणें हे अत्युत्कृष्ट मराठी भाषेचे मासले असून, नानांचीं भाषणेंही सन्मनोविकारांनीं व प्रेमळ विचारांनीं रसपूर्ण व अंतःकरण सद्‌गदित करून सोडणारीं झालीं आहेत. नाना व पार्वतीबाई यांचे संवाद व वेशीवरच्या शिपाईगड्यांची मौज, अमलेशीं-तोतयाच्या बायकोशीं-बोलतांना झालेली पार्वतीबाईच्या मनाची स्थिति, हे निरनिराळ्या प्रकारचे प्रसंग असून ते रा. केळकर यांनीं सारखेच चांगले वठाविले आहेत. सारांश, शुद्ध भाषा, स्वाभाविक प्रसंग, मार्मिक कोटिक्रम, रसिक विनोद, सत्यासत्याचा जगांत उडणारा घोटाळा, व सद्‌बुद्धि आणि अज्ञान यांच्या संयोगानें उत्पन्न होणारी परिस्थिति, यांचें यथार्थ दर्शन करून देणारें हें नाटक असल्यामुळें अत्यंत वाचनीय व प्रेक्षणीय झालें असून तें मनो-

रंजन आणि बोध यांचा लाभ एकसमयावच्छेदेंकरून करून देणारें व आबालवृद्ध स्त्री-पुरुषांस पहाण्यास योग्य असें झालें आहे.

---

" I like your play very much on the whole. The plan.... is ingeuious. Nana's character is well conceived. Parvatibai's faith in her delusion is indeed touching. The scene in which she rebukes Nana is perhaps the best in the whole play. You have attacked superstition out with weapons borrowed from modern armoury. The three entities will, I daresay, please the andience. I liked the play so much that when the clerks of pleaders came to me the other day to ask what play they should perform, I mentioned your play." R. B. V. M. Mahajani, M. A.

---

I have read your drama with great interest and think it to be a first class production. The sentiments, with which it is interspersed, the unfolding of the plot, the delineation of character, all these mark it out as one of the greatest contibutious to Marathi dramatic literature."

R. G. Pradhan, B. A. LL. B.



